# दुधारा सुरा :

( गुप्तपोलिसांच्या चातुर्यावरील कादंबरी. )

लेखक

श्री. विठ्ठल कृष्ण नेरूरकर, बी. ए.

संपादक 'प्रमोद'.

(राधाकृष्ण रहस्य, हिंदवासीयांचें आजचें प्रातःस्मरण, सिंहगड, पर्वत
हिंद प्रबोधकाचें स्वर्ग-निर्याण, सृष्टीचे कारागीर, मेघप्रभाव,
कवीची भेट इत्यादि काव्यें; शीलाचें मोल, सापत्न माता,
इत्यादि कादंबऱ्या; सौभाग्य-लाभ नाटक व
आत्मविकास वगैरे पुस्तकें यांचे कर्ते )

मुद्रक व प्रकाशक

पांडुरंग नारायण जव्हेरी,

श्री विनय प्रिंटिंग प्रेस, प्रफुल्लता कचेरी,

नवरोजी स्ट्रीट, ठाकुरद्वार,

मुंबई.

१९२३.

किंमत रुपया दीड.

# प्रास्ताविक.

'ललितवाङ्मय' हा वाङ्मयाचा एक महत्वाचा भाग आहे. मानवजातीला उन्नतावस्थेला नेणें हें वाङ्मयाच्या मुख्य ध्येयांपैकीं एक अवश्य अंग आहे. अर्थात 'ललितवाङ्मय' हें थकल्या भागल्या जीवाला करमणूक करणारें असलें तरी ती करमणूक सात्विक, निरुपद्रवी अशी असली पाहिजे. मनुष्य जातीला अवनतीला नेईल असें तरी त्यांत कांहींएक असतां कामा नये. ही मुख्य गोष्ट लक्षांत ठेवून जर ललितवाङ्मय निर्माण होईल, तर त्याच्याविरुद्ध वेळी अवेळीं होणाऱ्या निष्कारण हाकाटीला भीक घालण्याचें मुळींच कारण नाहीं.

कादंबरी ही ललितवाङ्मयाचा एक भाग असें मानण्यांत येते. अशा ललित-वाङ्मयाचा दर्जा कमी असला तरी तें आवश्यक आहे. गहन विषयांचें आकलन ज्यांना होण्यासारखें नाहीं अशा वर्गाला आपली वाचनलालसा असल्या वाङ्मयावर भागवावयास मिळते. स्वतःच्या पायावर चालतां येईपर्यंत बालकाला जसा पांगुळगाडा, तसेंच गहन विषयाचें ग्रहण करण्यास समर्थ होऊं शिकणाऱ्या अथवा असमर्थ असलेल्या बुद्धीला हें वाङ्मय उपयोगीं पडतें. ही बुद्धि अथवा अशा बुद्धीचा वर्ग समाजांत नेहमीच असावयाचा, आणि ह्मणूनच ललितवाङ्मयाच्या या भागाची उपयुक्तता व आवश्यकता सिद्ध होते.

राजकीय, शैक्षणिक, औद्योगिक, सामाजिक विषयांचा खल करणाऱ्या नियतकालिकांत केवळ मनाची सात्विक करमणूक करणाऱ्या नियतकालिकांची भर पडावी हें वरील नियम लक्षांत घेतल्यास उचितच ठरतें. कै. वा. हरिभाऊ आपटे यांच्या सार्थ नांवाच्या 'करमणुकी' नंतर तें पवित्र कार्य करण्यास 'प्रफुल्लता' पुढें सरसावली आहे. प्रस्तुतची 'दुधारी सुरी' ही कादंबरी प्रफुल्लतेचे व्यवस्थापक व माझे मित्र श्रीयुत पां. ना. जव्हेरी यांच्या प्रोत्साहनामुळेंच पुरी होऊन पुढें येत आहे. त्यांचे हे मजवर मोठे उपकारच आहेत.

खेळगडी मासिकाच्या संपादकांनीं माझी पहिली 'शीलाचें मोल' ही कादंबरी प्रसिद्ध केल्यानंतर आज महाराष्ट्र रसिकांपुढें येण्याचा हा माझा

दुसरा प्रयत्न आहे. ' **शीलाचें मोल** ' अगदीं स्वतंत्र पण केवळ मुलांकरितां म्हणून लिहिलें होतें. प्रस्तुत पुस्तक प्रफुल्लतेच्या प्रौढ वाचकांकरितां एका इंग्रजी पुस्तकाच्या आधारें लिहिलेलें कथानक आहे. वर लिहिलेल्या नियमांच्या कसोटीस तें कितपत उतरतें हें ठरविणें रसिकांचें काम आहे.

शेवटीं वाङ्मयसेवेस प्रवृत्त करून स्फूर्ति देणाऱ्या वाग्देवतेस, प्रोत्साहन देणाऱ्या जनताजनार्दनास, आणि यश देणाऱ्या मंगलमय महेशास मनोभावें नमन करून शिणलेल्या हताश मनास संजीवन देणाऱ्या वाङ्मयांतील या **संजीवनाकडे** अंगुलिनिर्देश करितों.

मालवण,
ता. १५।९।२३.

वि. कृ. नेरूरकर.

# दुधारी सुरी !

## प्रकरण १ लें.

### संजीवन.

“तुझा आपला जेव्हां तेव्हां विनोदच चालू असतो ! ” किंचित् त्रासून मी ह्मटलें.

“ कां बरं ? ” माझा मित्र संजीवन ह्मणाला, “ तुझ्या हकीगतीवरून मला एवढें कळून चुकलें कीं, प्रथम त्या क्षुल्लक गोष्टीचा तूं साशंक वृत्तीनेंच विचार केलास, पुढे विचार करतां करता त्या विषयाचें स्वरूप अधिकाधिक उग्र दिसूं लागलें, आणि आतां तर तुझ्या ध्यानींमनीं दुसरा विचारच नाही असें झालें आहे. पण तू असल्या गोष्टींना मनांत थारा देऊन चिंता करीत का बसावें हेंच मला कळत नाहीं. तूं कांहीं आमच्यासारखा ऐतखाऊ नाहीस. डॉक्टर नियोगीच्या सहकारित्वानें तुझी पुढें कितीतरी भरभराट होईल. सध्यांच तुझें नांव बरेंच झालें आहे. केवळ कल्पनेनेच भलभलत्या शंका उपस्थित करून मग त्यांच्या निवारणार्थ उपाय योजीत बसणें असल्या काल्पनिक खुळांनीं आपल्याच जिवाला विनाकारण मी तर कधींच धुगधुग लावून घेतली नसती. आतां कस्तुरविषयीं—”

“ कस्तुरविषयीं कांहीं नाही ! ” मी चटकन् खुर्चीवरून उठून ह्मटलें. “त्या विषयासंबंधीं कांहींच न बोलशील तर बरें. ” मी नवीन सिगार शेल्फवरील सिगारबॉक्समधून घेऊन शिलगावली.

“ तरी हरकत नाहीं, ” माझ्या उल्हसित वृत्तीच्या मित्रानें अगदीं शांतपणें ह्मटलें, “ तसें का होईना; बाकी ह्या सर्व घोटाळ्याचें मूळ कटें आहे तें उलगडून दाखविण्याचा माझा विचार होता. ”

" मला नाहीं तिची शंका येत नाहीं. " मी पुन्हां सांगितलें.

" मी तरी कुठें तसें ह्मणतों आहे ? " पूर्वीपेक्षांहि संथपणानें सिगारचे एक दोन झुरके मारून त्या धुराकडे विचारपूर्वक पाहत असतां तो एकदम ह्मणाला, " मोहन, आतां अगदीं खरें सांग मला, तुला संशय कोणाचा येतो आहे ? "

मी कांहींच उत्तर दिलें नाहीं. खरें सांगावयाचें तर त्याच्या ह्या प्रश्नावर मला कांहींच उत्तर देतां येईना. मला कसल्या तरी भयंकर गोत्यांत गुंतविण्या-करितां माझ्या सभोंवतालच्या व्यक्तींपैकीं काहीं माणसांचें कोणाचे तरी अटो-काट प्रयत्न चालले आहेत, अशी मला जबरदस्त शंका होती. पण ह्या व्यक्ती अमुकच असें कांहीं मला निश्चयात्मक सांगतां येत नव्हतें. आणि ह्याच गोष्टी-मुळें तर माझी काळजी दिवसेंदिवस बळावत होती.

" हं, तेंच मला कळत नाहीं. नाहींतर मी कशाला इतका घोटाळ्यांत पडलों असतों ? " मी उत्तर दिलें.

संजीवन खूपच हंसला. तो ह्मणाला, " यावरून वेड्या ! तूं केवळ काल्प-निक शंका उभारल्या आहेस हेंच सिद्ध होत नाहीं का ? "

" असेल तसें तूं म्हणतोस तर; पण नाहींरे, " मी विशेष उत्सुकतेनें त्याची खात्री करण्याकरितां ह्मटलें, " मी ह्मणतों हें खरें आहे; कसें तें मला सांगतां येत नाहीं. माझ्या मनांत ज्या गोष्टींनीं काहूर उत्पन्न केलें आहे त्या अत्यंत गुप्त असतांहि मी तुला आज सांगून टाकल्या आहेत. तूं माझा जिव्हाळ्याचा मित्र आहेस. आतां माझ्यावर कसली तरी आपत्ति कोसळणार अशा ओंचणींत मी नेहमीं असतों. ही आपत्ति कोणत्या प्रकारची असेल याचा माझ्यानें अंदाज करवत नाहीं. माझी ही काळजी निराधार आहे तरी खरी आहे. काल्पनिक नव्हे. तुला तर प्रत्येक गोष्टीचा आधारच लागतो. पण मी असें विचारतों मनु-ष्याच्या स्वाभाविक मनःप्रवृत्तीला काय ह्मणशील? How can you define in tuition?"

ह्या माझ्या प्रश्नानें तो जरासा विचारांत पडला. माझ्याकडे त्यानें लक्षपूर्वक पाहतांच त्याचाहि नूर पालटला. तो नेहमींच निष्काळजी असायचा. कोण-त्याहि गोष्टीला विशेष महत्व द्यायचें नाहीं असा स्वभाव. माझ्या आतांपर्यंतच्या

शंकाकडे तो अशाच दृष्टीनें पाहत होता. पण आतां सिगारेटचा धूर काढीत असतां त्याची अर्थशून्य दृष्टी फक्त माझ्याकडे लागली होती; पण मन क्षणभर विचारांत गढलें. नतर तोंडांतील सिगार काढून तिच्या टोंकावर आलेली राख झाडीत तो ह्मणाला, " मी सागतों तुला; त्याला तू साहजिक प्रवृति ह्मण किंवा दुसरें कांहीं ह्मण—तरी तूं नुसता डॉक्टरच आहेस, फिलॉसफी घेऊन एम्. ए. झाला नाहींस—पण असल्या गोष्टी मनांत घोळवून त्याचा रात्रंदिवस धोका बाळगणें हें मात्र फार घातुक होईल; हें तुझ्या लक्ष्यात असूं दे. माझें ऐक; मोहन ! मी तुझा स्नेही आहे तूं, माझा जिवलग मित्र आहेस. ह्या गोष्टीतून जर कांहीं निष्पन्न झालेच, जर तुला वाटत असलेली भीती साधार आहे असें मला आढळून आलें, मी तर तुला जिवापाड मदत करीन. अगदीं निश्चित राहा; समजलास. "

"हरकत नाहीं." मी त्याचा हात माझ्या हातांत घेऊन कृतज्ञतेनें ह्मटलें. तुझी मदत असली ह्मणजे झालें; पण तूं आपल्या व्यवहारांत गढलेला. त्यात आणखी माझ्या काळजीचे लकडें तुझ्यामागें कसें लावावें या विचारांत मी होतों. "

" अरे ! माझा स्वभाव तुला माहीत नाही मोहन ? जिथें कसलें तरी गूढ रहस्य असेल तिथेंच माझें मन अधिक रमतें हें तुला ठाऊक आहेना ? "

" तें मला ठाऊक आहे. पण सध्यां मला कांहीं गूढ रहस्य दिसत नाही. फक्त बळकट शंका आहे. "

संजीवन म्हणाला तें खरें होतें. गुंतागुंतीचीं रहस्यें उकलण्यांत त्याला मौज वाटे. रहस्याच्या गुंतागुंतींतच त्याचें जीवन असें ह्मटलें तरी चालेल. एरवीं तो नेहमीं निष्काळजी असे. पण एखाद्या गुंतागुंतीच्या प्रश्नांत गढलेला असला ह्मणजे त्याची वृत्ति पालटे. तो एक सुखी प्राणी होता. वडिलार्जित इस्टेट पुष्कळशी होती; आणि त्यांतलें बरेंचसें भांडवल त्यानें भागीच्या व्यापारांतें घातलें होतें, किंवा भांडवल ह्मणून व्यापाऱ्यांस दिलें होतें. ह्मणजे तो फक्त भांडवलवाला. त्या व्यवहारांतला कार्याचा बोजा तो आपल्यावर विशेषसा घेत नसे. रहस्यमय गुन्ह्यांचा तलास लावण्यांत गुप्तपोलिसानां व त्याच्या अधिकाऱ्यांना संजीवनची फार मदत होई. कोणत्याहि गुप्त गोष्टीचा मार्ग हुडकून

काढण्यांत लागणारी दूरदृष्टि आणि चिकाटी हे डिटेक्टिवांच्या धंद्यास जरूरीचे असणारे गुण त्याच्या ठिकाणीं जन्मतःच होते. गुप्तपोलिस खात्यांत शिरलेल्या लोकास देखिल त्याच्या हुषारीबद्दल हेवा वाटे.

गुप्तपोलीसचें काम सोपें नाहीं. त्या कामास लागणारी बुद्धि त्याला जन्मतःच असावी लागते. शरीर प्रकृति मजबूत, खरें शोधून काढण्याची हौस, शिकारी कुत्रा श्वापदांचा वास काढतो त्याप्रमाणे गुन्हेगारांचा पाठलाग करण्याची चलाखी, वारंवार येणाऱ्या अडथळ्यांनी निराश न होतां हातात घेतलेली केस शेवटास नेण्याची चिकाटी, नवीन नवीन क्लृप्ती योजण्याचें चातुर्य, मिळणाऱ्या प्रत्येक संधीचा उपयोग करून घेण्याची हुषारी व तत्परता; व समयसूचकता इतके गुण तरी अवश्य असतातच; पण त्याने आपलें डोकें नेहमींच शांत ठेवलें पाहिजे. मिळालेल्या माहितींत ज्या कित्येक खऱ्या खोट्या—गोष्टी असतात, त्यांतल्या खऱ्या तेवढ्याच निवडण्याचें ज्ञान पाहिजे, हे व ह्याशिवाय आणखीहि कित्येक गुण गुप्त पोलीसाच्या अथवा तें गुप्तपोलीसाचें काम करणाऱ्याच्या आंगीं असले पाहिजेत.

संजीवन अशाच प्रकारचा चतुर, धोरणी व यशस्वी गुप्तपणें गुन्ह्यांची तपासणी करणारा होता. सिगार ओढीत अर्धवट डोळे मिटून तो माझ्या आर्मचेअरवर स्तब्ध पडला होता.

माझें वय अजमासें तेहतीस वर्षांचें होतें. मी एडिंबरोहून प्रथम M. B. C. M. व नंतर M. D. होऊन आलों होतों. माझें ठीक चाललें होतें. पण माझ्या मित्रमंडळींला माझी स्थिति होती त्याहूनहि किती तरी जास्त चांगली वाटे. माझ्यातील जे काय थोडेसे दोष असत, तिकडे त्यांचें साहजिक दुर्लक्ष होई व माझ्या गुणांची ते फार चहा करीत.

मुंबईतल्याच एका हॉस्पिटलांत माझी असिस्टंट् फिजिशन, ह्मणून नेमणूक झाली होती. माझी स्वतःची प्रॅक्टिस वास्तविकपणें कांहीं अधिकशी नव्हती, आणि याचसाठीं मी डॉक्टर नियोगी यांच्या आश्रयानें राहत होतों. मी ज्या हॉस्पिटलांत होतों त्याच हॉस्पिटलचे डॉ. नियोगी हे कन्सल्टिंग् फिजिशन होते.

डॉ. नियोगी हे स्नायु संबंधीच्या सर्व प्रकारच्या रोगांची ( Nurvous disorders ) चिकित्सा करणारे ह्मणून मुंबई शहरांत व मुंबईच्या बाहेरहि प्रख्यात होते.

डॉ. नियोगी यांचा दवाखाना फोर्टमध्यें होता. परंतु रात्रीबेरात्रीं येणारीं बोलावणीं ( calls ) चुकविण्याकरितां ह्मणून मुद्दाम ते दुसरीकडेस राहत. त्यांच्या डिस्पेन्सरीपासून थोड्याच अंतरावर मी राहत होतों. त्यांच्या अवाढव्य प्रॅक्टिसीच्या गिऱ्हाइकांचीं रात्रौ येणारीं बोलावणीं मलाच पत्करावीं लागत व त्यांच्या गैरहजीरींतहि त्यांचें काम मला सांभाळावें लागे.

माझी स्वतःची प्रॅक्टिस, हॉस्पिटल्चें काम व डॉ. नियोगींची गिऱ्हाइकी सांभाळणें इतकीं कामें मला करावीं लागत; ह्मणून माझी स्थिती अत्यंत त्रासाची होती असें नाहीं. एवढे खरें की मला कधीं कधीं रात्रौचीं बोलावणीं येत, रात्रीं व्हिजिटला जाणें हें केव्हांहि त्रासाचेंच असतें. परंतु डॉक्टरी पत्करल्यानंतर असले त्रासहि पत्करावेच लागतात. संध्याकाळचे चार वाजल्यानंतर कधीं कधीं डॉ. नियोगी जेव्हां बाहेर जात, तेव्हा त्यांच्या जागीं मला राहावें लागे. नाहीं तर एरवीं संध्याकाळचा वेळ माझाच होता.

माझी स्थिति पुष्कळांनी हेवा करण्यासारखी होती. डॉ. नियोगी जरी कांहींसे आंखडल्या हाताचे होते तरी त्यांची बुद्धि उदार असून त्यांची माझ्यावर प्रसन्न मर्जी असे. परंतु जगांत जें जें ह्मणून कांहीं चांगलें आहे त्यांत देखिल दोष काढण्याची सर्वांचीच प्रवृत्ति असते. मी देखिल या नियमास अपवाद नव्हतों. केव्हां केव्हां डॉ. नियोगींचा मला राग येई व त्यांचेबद्दल एक प्रकारचा अंदेशाहि येई; परंतु तो बारीकसारीक कारणावरूनच ! खरं सांगावयाचं तर आज कित्येक महिने मी आहे त्या ठिकाणीं सुरक्षित नाहीं असें मला वाटू लागलें होतें; आणि हल्लीं तर फारच ! माझ्या मनांत ही भीति कां, कशी व कोठून उत्पन्न झाली हें मला समजत नव्हतें. बहुतेक नेहमी संध्याकाळीं माझ्याकडे येणाऱ्या संजीवनकडे मी माझें मन मोकळें केलें होतें, परंतु त्याचा विशेषसा कांहीं उपयोग होणार नाहीं अशीहि माझी खात्री होती.

---

## प्रकरण २ रें.

## किळसवाणें गुपित !

ज्या ठिकाणीं रोग्यांना तपासून वेड्या वांकड्या अक्षरानीं भिरकटलेल्या प्रिस्क्रिप्शन्सबद्दल डॉक्टर नियोगी लोकांस जड वाटणाऱ्या आपल्या फीचे पैसे वसूल करीत ती त्यांची कन्सल्टिंग रूम फोर्टमधल्या तशाच प्रकारच्या इतर डिस्पेन्सरींप्रमाणेंच होती. ही कन्सल्टिंग रूम ह्मणजे एक लहानसा दिवाणखाना होता. भिंतींना तेलातल्या हिरव्या रंगानें सुशोभित केलें होतें. डॉक्टरसाहेबांचें रायटिंग टेबल बरेंच मोठें असून त्याच्यावरील सर्व सामान नीट नीटके आणि सुव्यवस्थितरीतीनें ठेवलेलें पाहावें तेव्हां दिसे, तें इतकें कीं तेथें येऊन जाणाऱ्या रोजच्या शेंकडों पेशंट्स्‌नांदेखिल आश्चर्य वाटे. टेबलाच्या एका बाजूला एक कोच होता, दुसऱ्या बाजूला कांचेच्या दरवाजाची एक सुंदर बुककेस असून त्यांत थोडींशीं बुकें पण बरीचशीं यंत्रें, शस्त्रें व डॉक्टरनां वारंवार शस्त्रक्रियेला उपयोगी पडणारी साधनें होतीं. परंतु या कांचेच्या झांकणाला आंतून हिरव्या रेशमाचे पडदे लावले असल्यामुळें आंतील कांहींच वस्तू दिसण्यात येत नसे.

आठवड्यांतून ठराविक तीन दिवस डॉक्टरसाहेबांकडे स्नायूसंबंधीं विकार जडलेले रोगी येत. या रोग्यांत शेंकडा नव्याण्णव स्त्रीरोगी असत आणि डॉ० नियोगी हे देखिल विशेषेंकरून स्त्रियांच्या नर्वस् डिसार्डर्स नाहींसे करणारे ह्मणूनच प्रख्यात होते. दिसण्यांत कठोर पण प्रामाणिक व गंभीर कल्लुराम नांवाचा त्यांचा नोकर या रोग्यांस जागा दाखविणें, बसविणें वगैरे कामें करीत असे.

एके दिवशीं दुपार नंतर सुमारें पावणे चार वाजतां डॉक्टरनां भेटण्याकरितां ह्मणून मी गेलों.

मला आंत आलेला पाहतांच धंदेवाइकी गंभीर मुद्रा जराशी सोडून व खुर्ची मागें रेलून डॉक्टरसाहेबानीं विचारलें—

" काय मोहनराव, कांहीं नवल विशेष ? "

" कांहीं नाहीं, " रोग्यांकरितां ठेवलेल्या एका खुर्चीवर बसून मी म्हटलें. " हॉस्पिटलमध्यें आज फारच काम पडलें. तुम्हीहि नेहमींप्रमाणेंच गर्दीत असाल ? "

" तें कांहीं विचारूं नको. ह्या स्त्रीरोग्यांनीं तर मला अगदीं भंडावून सोडलें आहे; एका मिनिटाचीदेखिल विश्रांती मिळत नाहीं. नेहमीं तेंच—एक्साइट्मेंट्—कित्येकांच्या मनाला नवऱ्यांच्या दुर्वर्तनापासून धक्के बसून त्याचा परिणाम झालेला–एक ना दोन हजार तऱ्हा; पण शेवटीं आपलें एकच—एक्साइट्मेंट् ! कोणताहि रोगी येऊन बसला आणि जरा स्थिरस्थावर झालें कीं त्याच्याकडे पाहूनच मला बरोबर त्याची स्थिति ओळखतां येते, मोहन. "

डॉक्टरसाहेबांचें वय अजमासें साठीच्या बाजूलाच झुकत होतें. मध्यम उंचीचा बांधा, चेहरा किंचित् वाटोळा व त्याचप्रमाणें एकंदर शरीराची ठेवणहि गोलसरच, केस मात्र सर्व पिकून पांढरे झालेले; आंखूडशीच दाढी आणि नजर अत्यंत तीव्र होती. एकंदरींत चेहरा कांहीं वाईट असा दिसत नसे. जेव्हां त्यांना कसल्याहि गोष्टीचा विचार पडे तेव्हां डावा कान खाजवण्याची विचित्र खोड त्यांस जडली होती; आणि नेहमींच बहुतकरून बुद्धिमत्तेबरोबर वास करणाऱ्या कांहीं अशाच विलक्षण संवयीहि त्यांच्या ठिकाणीं होत्या.

पेशंटसमोर त्यांचा हात हवा तितका लांब होई पण एरवीं ते ओढत्या हाताचेच होते हें सर्वांस ठाऊक होतें.

थोडासा वेळ गेल्यावर डॉक्टरसाहेब आपणच म्हणाले—" बाबांसाहेबाकडून कोणी बोलवावयास आलें होतें काय ? "

" नाहीं, " मी उत्तर दिलें. " कां बरं ? "

" कारण त्यांची स्थिति जरा निराळीच दिसते आहे. "

" इतकी बिघडली आहे ? "

" होय. " डॉक्टर नियोगी म्हणाले. " मी त्यांच्याबद्दल फिकिरींतच आहें. मला वाटतें त्यानां आणखी कित्येक दिवस आंथरूण सोडतां येणार नाहीं. "

मलाहि याबद्दल तिळमात्र शंका नव्हती. बाबासाहेब देशपांडे हे एक अत्यंत श्रीमंत परंतु लहरी वृद्ध गृहस्थ असून त्यांचा बंगला गांवदेवीस गवालिया टँकच्यां

पुढें बाजूला होता. हे डॉक्टर नियोगींचे कायमच्या पेशंटपैकीं एक होते. त्यांना तपासण्याऱ्या अथवा औषध देणाऱ्या डॉक्टरला त्याच्या वाजवी फीपेक्षां जास्त पैसे आग्रहाने देण्याची त्यांच्या अनेक लहरींपैकीं एक लहर होती! असें करण्यापासून त्या डॉक्टरचें लक्ष आपल्याकडे अधिक लागून तो आपली जास्त काळजी घेईल अशी एक त्याची खुळी समजूत होती. कित्येक वर्षांच्या सीकपणाने अनेक डॉक्टरांशीं संबंध येऊनहि त्यांना डॉक्टरांचा स्वभाव कळला नसावा!

काय असेल तें असो. याच्यापूर्वीं डॉ. नियोगींनी बाबासाहेबांचें नांव कांहीं थोडे थोडके वेळ घेतलें नव्हतें. पण या खेपेस—याच क्षणीं बाबासाहेबांचें नाव डॉक्टरसाहेबांच्या मुखातून निघाल्याबरोबर माझ्या मनांतील शंकेच्या निरसनाला हवें होतें तें मिळालें असें मला वाटलें. जें कांही तरी संकट येणार असें मला वारंवार वाटे तें याच बाबासाहेबांसंबंधीं असलें पाहिजे असें मला या क्षणापासून वाटूं लागलें. त्या नांवाचा डॉक्टरानीं उच्चार केल्याबरोबर मला त्याच्याबद्दल जास्त सहानुभूति उत्पन्न होऊन आपण जास्त सावधगिरीने वागले पाहिजे असे मी मनाशीं ठरविलें; व पुढे गुदरणाऱ्या अनर्थाचा या कुटुंबाशीं अगदीं निकटचा संबंध असणार असे माझें मन मला त्या क्षणापासून सांगूं लागले.

याच कारणामुळें बाबासाहेबाच्या प्रकृतीबद्दल डॉक्टरसाहेब बोलत असतां माझें लक्ष त्यांच्या बोलण्याकडे लागलें होतें; आणि म्हणूनच मी त्यांस मुद्दामच त्यांच्या प्रकृतीबद्दल व त्यांच्या रोगाबद्दल डॉक्टरसाहेबांचें काय मत आहे असा त्यांस प्रश्न केला.

" बिचारे बाबासाहेब दिवसेंदिवस क्षीण होत चालले आहेत, मला फार वाईट वाटतें, " डॉक्टरसाहेब हलक्या आवाजानें बोलले. " आणि आपणाला काय रोग आहे याची खरी जाणीव त्यांना नसल्यामुळें त्यांचें दुखणें किती वाढलें आहे हेंहि त्यांना कळून आलेलें नाहीं. बाकी ते स्वत: समजतात असे मात्र नाहींत. काय करावे? तुम्ही त्याला अलीकडे केव्हां पाहिलें होतें काय ? "

" हल्लींच चार दिवसापूर्वीं मी त्यांस तपासले. मला त्यांच्यांत बराच फरक पडत चालला आहे असें वाटलें. त्यांची प्रकृति सुधारत आहे अशी माझी आतांपर्यंत समजूत होती ! "

"छे ! छे ! छे ! परंतु–हं–बरोबर !" डॉक्टरसाहेबांच्या बोलण्यांत व चेहऱ्यांत एकदम फरक पडला. "माझ्या लक्ष्यांतच नाहीं, तुह्मी तेथें वारंवार जात असतां ते. तेथें असणारी एक प्रकारची आकर्षण शक्ति तुह्मांला ओढीत असते." हे शब्द बोलतानां डॉक्टरसाहेबांनीं आपले वाटोळे गरमरीत डोळे मिचकावले; ते मला त्यांच्या चष्म्यांतूनहि दिसले "परंतु, मोहनराव, भयंकर, खरोखर अशाप्रकारच्या स्त्रीच्या नादीं लागणें फार धोक्याचें आहे हो ! मी आपलें तुह्मांला सांगून ठेवतों. तुह्मीं तरुण आहांत. तुमच्यापेक्षां मला जास्त अनुभव आहे. याबद्दल मी पूर्वीच तुह्मांला जागृत केलें होतें. पण तुह्मी तिकडे लक्ष दिलें नाहींसें वाटतें, अं ?"

"होय. तसे खरें. कारण मला कस्तुरशीं बोलणे चालणे बंद करण्यास विशेष महत्वाचें योग्य कारण आढळलें नाहीं."

"मोहन, मोहन ! मला बायकांच्या स्वभावाची जास्त पारख आहे."

'मोहन' हे डॉक्टरसाहेबांनीं उच्चारलेले शब्द एकादा बाप आपल्या मुलाला उपदेश करतानां जसे वात्सल्यानें निघतात, तसें निघाले होते. माझ्याशीं बोलतांना डॉक्टरसाहेब या पद्धतीचा उपयोग केव्हां केव्हां करीत असत. कारण त्यांचा माझ्यावर परिणाम होतो असें त्यांच्या ध्यानात येऊ चुकले होतें. बोलण्याच्या घाईत ते मला केव्हां केव्हां एकेरी नांवानेहि पुढे संबोधूं लागले

"हजारो स्त्रीरोग्याशीं माझा परिचय झाल्यामुळें मी स्त्री जातीला कोणाहिपेक्षां जास्त ओळखूं शकतों. माझ्या पेशंट्सपैकीं तर मी बहुतेकानां चांगल्याच ओळखतों. या स्त्रिया बहुतांशीं बऱ्याचशा वर्थलेस्—अटर्ली वर्थलेस असतात ! आतांपर्यंत मी स्त्रीस्वभावावर कधींच बोललों नव्हतों हें तुमच्या लक्ष्यांत असूं द्या. आणि आतां ह एखाद्या स्त्रीविषयीं—विशेष करून तिच्याशीं संबंध ठेवूं इच्छिणाऱ्या तरुणाशीं—बोलण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. परंतु मी फक्त मोहन, तुह्माला बजावीत आहें कीं हा नाद तुह्मी सोडा. माझ्या हें कित्येक दिवसांपूर्वी लक्षांत येऊन चुकलें आहे. अझून तुमचा नुसता आरंभ आहे. अझून तुह्मी तो नाद सोडून द्या—सोडून देतां येण्यासारखा आहे. नाहींतर

मात्र, खात्रीनें सांगतों; तुह्मांला मागून कडक पश्चात्ताप करण्याची पाळी येईल. जन्मभर पस्तावा करीत बसाल ! झालें ! इतकेंच ! ”

“ तर मग तिच्या मी ऐकलेल्या पूर्व हकीगतींत कांहीं तरी रहस्य—गुह्य—असेल; कांहीतरी गुपित—गूढ—असलें पाहिजे, आणि तें ती माझ्यापासून लपवीत असली पाहिजे. ” मी डॉक्टरनांच उद्देशून पण गात असल्यासारखे शब्द ओढीत अर्धवट स्वतःशीच असें ह्मटलें. हेतू हा कीं, डॉक्टरसाहेबांचा आणि देशपांडे मंडळींचा बऱ्याच दिवसांचा परिचय असल्यानें त्यांना तें ठाऊक असेल व त्यांच्याकडून तें मला कळावें.

“ आहेच, ” डॉक्टरसाहेब लगेच उत्तरले. त्यांनीं मिचकावलेले डोळे त्यांच्या चष्म्यांतून मला पुन्हां दिसले. “ आहेच मुळीं तसें गुपित; आणि तेंहि अत्यंत किळसवाणें घाणेरडें आहे ! ”



## प्रकरण ३ रें.

### बाबासाहेब देशपांडे.

त्या दिवशीं संध्याकाळचा वेळ मी बाबासाहेबांकडे घालविण्याचा बेत केला. बाबासाहेबांचा बंगला टुमदार आणि हवाशीर होता. बाबासाहेब मूळचे देशावरचे राहणारे. त्यांचे पूर्व वय देशावरच गेलें होते. त्यांची स्थावर इस्टेट सारी तिकडेच होती. परंतु आतां त्यांनीं नेमलेल्या व्यवस्थापकाशिवाय तिकडे त्यांच्या कुटुंबापैकीं कोणीच राहत नव्हतें; अथवा राहण्यासारखे नव्हतें. मुंबईतल्या स्नेह्यांबरोबर व ओळखीदेखीच्या लोकांबरोबर उतार वयाचे दिवस चैनीनें घालविण्याकरितां ह्मणून आपण मुंबईस आलों आहो असें ते सांगत. परंतु खरें पाहतां बाबासाहेबांचें ह्मातारपणचें तरुण कुटुंब अंबूताई ह्या देशावर खेड्यांत राहण्यास तयार नव्हत्या. त्यांचे सारें पूर्व वय मुंबईतच गेलेलें व त्यांच्या नात्याचीं माणसें देखिल सारीं मुंबईतच. तेव्हां अंबूताईच्या अत्याग्रहानें व बाबासाहेबांच्या सीकपणानें बाबासाहेबांस मुंबईत आणलें होतें असेंच ह्मणावयास हरकत नाहीं.

गंगाराम नांवाच्या नोकरानें मी जाण्याबरोबर मला आपल्या धन्याच्या खोलींत नेले. मला तेथें अर्धा तास राहावें लागलें. बाबासाहेब आंथरुणावरच परंतु तक्क्याला टेंकून बसले होते. ते साधारण ठेंगणेंच असून केंस सारे पांढरें शुभ्र झाले होते. गाल फिक्कट होऊन बसले होते, परंतु डोळ्यांचा पाणीदारपणा मात्र किंचित्‌हि कमी झाला नव्हता! मी त्यांची नाडी तपासण्याकरितां हात धरला, तो अस्थिमय व गार लागला, तथापि एकंदर प्रकृतिमान पाहतां मागच्या खेपेपेक्षांहि ते या खेपेस जास्त सुधारलेले दिसले. मी तपासल्यावर थोड्या वेळानें ते आपण ह्मणून उठून उभे राहिले. त्यांची प्रकृति सुधारत असल्याबद्दल मला तर आतां शंकाच राहिली नाहीं. मी त्यांना तपासून पाहिलें, निरनिराळे प्रश्न विचारले, आणि माझी पुरेपूर खात्री करून घेतली. डॉक्टर नियोगींचें मत मला पटेना. माझें मत भिन्न झालें. बाबासाहेबांची प्रकृति किती तरी सुधारली होती.

खरोखरच, आज बाबासाहेबांच्या बोलण्यांत एक प्रकारचा तरतरीतपणा होता. मला त्यांनी चहा आणून द्यावयास लावला; व नंतर वर्तमानपत्रांतली व शहरांतली ताजी खबर विचारली. बाबासाहेबांस एकच रोग नव्हता. पण सध्या गळ्याशीं आलेला Cancer of the tongue जिव्हा व्रण हा त्रासदायक रोग होता. आणि त्यापासून त्यांना Peri pheral neuritis नांवाचा रोग झाला होता. सर्व डॉक्टरांनीं ऑपरेशन् करून घेण्याबद्दल आपलें स्पष्ट मत दिले होतें. परंतु ऑपरेशनची भीति वाटत असल्यामुळें त्यांनीं नुसतें औषधच चालविले होतें. तथापि त्यांना वेदना सहन करवत नव्हत्या; आणि त्याकरितां दुसऱ्याहि बाटलींतल्या औषधाचा (डॉक्टरच्या दवाखान्यांतल्या नव्हे) त्यांनी आश्रय धरिला होता. या सर्व गोष्टींबद्दल त्यांची मला कीव येई. मनुष्य डॉक्टर बनून प्रॅक्टिस चालवूं लागल्यानंतर इतका धोरणी व चाणाक्ष बनतो कीं एखाद्या कुटुंबांत खरें गृहसौख्य नांदते कीं नाहीं हें तो थोड्याच परिचयानें व सरावानें तेव्हांच ओळखू शकतो. बाबासाहेबांचें वय अजमासें बावन वर्षांचें आणि त्यांच्या पत्नीचें बावीस वर्षांचें ! कोणत्याहि बाबनींत त्यांच्यांत साम्य फारच थोडें होतें ! यावरून मी बरेंच धोरण बांधले होतें.

आतां ती त्यांची शुश्रूषा ममताळूपणानें करीत होती हें मला दिसून आलें होतें. परंतु हा ममताळूपणा खरा नसून केवळ नवऱ्याला खूष ठेवण्याकरितां ओढून आणलेला होता; आणि वास्तविकपणें त्यांची तिला ममता नव्हती हे मी केव्हांच ओळखलें होते. आणि यांत नवल करण्यासारखेंहि कांहींच नाहीं. चैनीची व मंडळींत मिळून मिसळून वागण्याची हौस असलेल्या साधारण शिकलेल्या व शहरांत वागलेल्या तरुणीची, बाबासाहेबांसारख्या नेहमीं कोणत्या ना कोणत्या तरी रोगानें आजारी पडणाऱ्या वृद्धाचे पत्नीच्या ठिकाणीं स्थापना करणें माझ्या मतें केव्हांहि अयोग्य व चुकीचेंच होतें. जशी जशी मला बाबासाहेबांच्या घरची गृहस्थिति कळून येऊं लागली तसतसें मलाहि त्यांचा विजोड पाहून बाबासाहेबांबद्दल मनापासून वाईट वाटे.

मला थोडीशी गुणगुणत राहण्याची संवई होती. या दांपत्यास पाहून माझ्या

क्षीर सुधेसम तीं क्षुधिताला
परि न पचे त्या क्षुधा न ज्याला
तरुणी सुखदा तरुणाला—

ध्या मनी यांतील सार—

पण मी तें गुणगुणण्यांची इच्छा दाबून ठेवी. घरीं आल्यावर मात्र बाबासाहेबांची आठवण झाली असतां मोठमोठ्याने देखिल ह्मणत असे. बाबासाहेबांच्या बाईटावर असलेले कांहीं लोक होते ते ह्मणत कीं बाबासाहेब श्रीमंत होते ह्मणूनच हें लग्न जुळलें ! ह्मणजे अंबूताईंना केवळ बाबासाहेबांच्या द्रव्यनिधीवरच दृष्टि ठेवून त्यांस देण्यात आलें होतें; असा त्यांच्या ह्मणण्याचा भावार्थ होता. हे लग्न चार वर्षांपूर्वीं झालें होतें. अशा स्थितींत त्या दोघांमध्यें एकमेकाबद्दल प्रेम कितपत असेल तें देव जाणे. परंतु लग्नाच्या वेळेस जर कांहीं प्रेमाचा आभास उत्पन्न झालाच असेल असें मानलें, तर मात्र त्याचा देखिल आतां लय झाला होता !

बाबासाहेबांच्या दुखण्यास दिवसामागून दिवस, महिन्यामागून महिने आणि वर्षेंहि लोटूं लागलीं तशी अंबूताईची शुश्रूषा करण्याची पद्धतहि बदलूं लागली. तिचें हळू हळू तिकडे दुर्लक्ष होऊं लागलें. तिला आपल्या मैत्रिणींकडें केव्हां केव्हां स्त्रियांच्या सभेस, मधून मधून केव्हां तरी मैत्रिणीच्या भिडेखातर ह्मणून नाटकास अथवा सिनेमास जाणें भाग पडूं लागलें. अंबुताईच्या वर्तणुकींत पडलेला हा फरक पाहून बाबासाहेबानीं नर्स ठेविली होती. बाबासाहेबांच्या दिमतीस नोकरमाणसें व नर्स वगैरे होतीं व त्यांच्यावर नजर ठेवण्याचें काम कस्तुरकडे असे. घरातली ही स्थिति ठाऊक असता बाबासाहेबाचें निर्विकार मन पाहून मला आश्चर्य वाटे.

देशावरून येऊन मुंबईत राहिल्यावर अंबुताईंनी आपणास एकटीस एवढ्या मोठ्या बंगल्यांत करमत नाहीं, कसेंसेंच वाटतें असें टुमणें लावलें; तेव्हां त्यानीं आपल्या धाकट्या बहिणीस—कस्तुरीस—आपल्याबरोबर आणून ठेवण्याच्या तिच्या आग्रहास संमति दिली. ही अंबुताईपेक्षां दीडएक वर्षानें लहान होती.

रोग्यांना कांहीहि गुप्त न ठेवतां सर्व खऱ्या खुऱ्या गोष्टी आम्हां डॉक्टरांस कबूल करणें बऱ्याचशा बाबतींत भाग पडल्यामुळें आम्हांला किती तरी कुटुंबांतलीं कांहीं चमत्कारिक व दुसऱ्यांस कधींकाळीं कांहीं केल्यास न समजण्यासारखीं रहस्यें कळून येतात. अंबुताईंना हळू हळूं बाबासाहेबांच्या शुश्रूषेचा विसर पडत चालला आणि त्यांचें बाहेर जाणेंहि वाढूं लागलें. पांच वर्षांपूर्वी जिनें लग्नाच्या वेळीं वेदीवर पतीच्या हातात हात देऊन त्याच्यावर प्रेम करणें, त्याचा सन्मान राखणें व त्याच्या आज्ञेंत राहणें सर्वांसमक्ष कबूल केलें होतें तीच आता त्यांची हेळसांड करू लागली. हा सर्व प्रकार माझ्या मनास लागून राही. परंतु त्या बाबतींत जास्त लक्ष घालण्याचें मला तिसऱ्या माणसास कांहींच प्रयोजन नव्हतें. या एकंदर प्रकाराबद्दल कस्तुरला मनांतून वाईट वाटत असलें पाहिजे असें मला वाटे; पण तिनें माझ्याशी बोलतानां तिच्याबद्दल कधींहि कोणत्याहि प्रकारचा उल्लेख केला नाहीं.

सुमारें अर्धा तास झाल्यावर मी बाबासाहेबांचा निरोप घेतला. औषध देणें वगैरे काय काय करावयाचें, कसकसें वागावयाचें तें नर्सला समजून सांगितलें आणि नंतर खालीं दिवाणखान्यांत येतों तर माझीच वाट पाहत असलेली कस्तुर मला भेटली.

मला पाहतांच ती उठून उभी राहिली व तिच्या मुखावर आनंदाचें स्मित चमकलें.

" इकडे आल्याचें मला आतांच गंगाराम बोलला. वर किती तरी वेळ लागला. सर्व ठीक आहे ना ? " तिनें उत्सुकतेनें विचारलें.

" ठीक आहे. काळजी करण्यासारखें विशेष कांहींच नाहीं " असें म्हणत मी तेथील एका खुर्चीवर बसलों. " अंबुताई आहेत का ? "

" अंहं. बाहेर गेली कुणीकडेशी—एखाद्या मैत्रिणीकडे असेल. "

" मग येथील सर्व तुम्हींच पाहायचें ? "

" म्हणून कांहीं वाटायला नको. मी मुळींच आळस करणार नाही. " कस्तूर म्हणाली.

" बरं; अंबुताईंच्या ह्या वागणुकीबद्दल बाबासाहेब तरी काय म्हणतात ? "

" खरं सांगायचं तर, अंबुताई बाहेर असल्याचें बाबासाहेबांना कित्येक वेळां ठाऊकच नसतं. ती घरांत आहे असेंच त्यांना वाटतं. आणि मीहि पण त्यांची ती समजूत घालवीत नाहीं. "

मी नुसतें ' हुं ' ह्मटलें. कारण आपल्या बहिणीच्या अयोग्य वर्तनाकडे कानाडोळा करण्याची कस्तुरची ही रीत मला पसंत पडली नाहीं. परंतु माझा हुंकार कानीं पडतांच तिनें मजकडे एकदम आश्चर्यानें पाहिलें.

" कां माझे असें करणें चुकीचें वाटलें ? " तिनें विचारलं.

" तसं नव्हें कांहीं. परंतु पत्नीची पतीशीं अशा प्रकारची वागणूक मला पसंत नाहीं. " मी ह्मणालों.

ती यावर कांहीं बोलली नाहीं. किंचित् पाडुरतेची छटा तिच्या चेहऱ्यावर येऊन गेली. क्षणभऱ्यानें तिनें ह्मटलें—" पण हा विषयच पाहिजे कशाला ? तिच्या वर्तणुकीचा आपल्याला कांहीच संबंध नाहीं. तिच्या आड येणें अथवा त्या दोघांमध्ये गैरसमजूत उत्पन्न करणें बरं नव्हे. "

मी उत्तर दिले नाहीं. परंतु बसल्या बसल्याच मधून मधून तिच्याकडे पाहत तिच्या सौंदर्यामृताचे घुटके प्राशन करूं लागलों. मला तिच्या सौंदर्याचें वर्णनच करतां येणार नाहीं. सौंदर्य तिच्या प्रत्येक अवयवांत खेळत होतें. मुखमंडल मधुराकृति असून तें अत्यंत सुंदर जादूच्या मोहनीनें भारल्यासारखें होतें. ज्याची तिच्यावर नजर पडे तो तिच्या सौंदर्यानें थक्क होऊन जाई.

माझ्यावर तसाच परिणाम होऊन माझे मन तेथें गुंतल्यास आश्चर्य कसले ? सायंकाळच्या वेळीं पश्चिम बाजूला धवलाकाशांत चमकणाऱ्या तारकांप्रमाणे त्या नेत्रयुगुलाच्या मोहनीचा परिणाम मजवर झाल्यास नवल कसले ? मस्तका वरील पुढच्या लहानग्या, वाऱ्याबरोबर हालणाऱ्या व बारीकच्या केशभारांत न सांपडणाऱ्या स्वतंत्र अल्लड वृत्तीच्या आपल्या मालकीणीचा स्वभाव व्यक्त करणाऱ्या कुरळ्या केशांनीं माझें मन आंदोलित केले होतें. सुन्दर तरुणीच्या मोहनीची छाप तरुणाच्या हृदयावरच पडायची !

ती उभी होती, तिनें वाचावयास सुरू केलेलें एक पुस्तक तिच्या हातांत होतें, त्यांत तिनें बोट घातलेलें होतें; मी धिटाईनें पाहत होतों, पण तें माझें पाहणें तिला अप्रिय नव्हतें, परंतु माझ्या नजरेस नजर भिडविणें मात्र तिला शक्य नसल्यामुळें ती चुकवावयास पाही. पण एकवार तो प्रसंग अचानक

घडला. त्याक्षणीं तिच्या कपोलस्थलावर विलसलेल्या रक्तिम्यानें संध्यारागालाहि लाजविलें असतें. एका पाय वर उभी राहून खालीं अथवा मागें पुढें पाहत असलेली कस्तुर मला सरस्वतीपेक्षांहि रम्य दिसली.

परंतु त्या स्थितींत तिच्यानें अधिक वेळ कसचें राहवतें. तिनें इकडे तिकडे पाहिलें आणि बोलण्यास आरंभ केला. परंतु त्या वेळी तिची जी चलबिचल उडाली ती मला आतांच प्रथम दिसली. यापूर्वी कांहीं बोलतांना असा एकदम तिच्यां चेहऱ्यात पडलेला फरक मला कधींच दिसला नव्हता.

" डॉक्टर नियोगी कालच येथें आले होते, आणि बाबासाहेबांबरोबर ते एकटेच सुमरें एक तासा वर होते. नर्सेला देखिल त्यानीं तिथून खालीं पाठविली. नर्स ह्मणते कीं ते कांहीं गुप्त गोष्टीबद्दल पुष्कळ—पुष्कळ वेळ बोलत होते. डॉक्टर खालीं आले तेव्हा त्यांनीं बाबासाहेबांची प्रकृति फारच क्षीण झाली असून ती बिघडत आहे असें मला सांगितलें."

"माझ्याकडे देखिल डॉक्टरसाहेब असेंच बोलले," मी ह्मटलें; " परंतु मी आजच्या मानावरून खात्रीपूर्वक सांगतों कीं बाबासाहेब सुधारत आहेत. आज तर बसले होते—नव्हे उठून देखिल उभे राहिले."

" मला देखिल तसेंच वाटतें. एक महिन्यापूर्वी गंगारामाला पहाटे तीन वाजतां बोलवायाला पाठवलें त्यापेक्षा आता बरें आहे " कस्तुर ह्मणाली.

" त्या वेळीं तर माझी त्याच्याबद्दल निराशाच झाली होती. त्यांचा तो पुनर्जन्मच झाला."

" खरोखरच असं वाटतं कां ? " हा तिचा प्रश्न इतका उत्सुकतेनें व काळजीनें तिनें विचारला होता कीं त्याचें मला नवल वाटलें. " त्यांच्या स्वतःबद्दलच्या शंकाकुशंकात कांहीं अर्थ नाहीं असं वाटतं का ? "

मी तिच्याकडे चमकून पाहिलें. बाबासाहेबांबद्दल इतकी काळजी, उत्सुकता आणि आत्मीयता तिच्यांत पूर्वी केव्हांहि दिसली नव्हती.

" मला कांहींच सांगवत नाहीं. " कांहींच बोलावयास सुचेना तेव्हां हे शब्द माझ्या तोंडांतून आपोआप सहज निघाले.

खरोखरच तिच्या त्या प्रश्नानें माझ्या मनांत खळबळ उडविली. तथापि मी प्रेमपाशांत अडकलों होतों. आणि अशांच्या मनांत तेव्हांच मत्सर उत्पन्न होतो.

# प्रकरण ४ थें.

## अपरात्रींचें बोलावणें !

“परंतु कशाबद्दल तरी त्रास आल्यासारखा दिसतो आहे.” कस्तुर अडखळत ह्मणाली “ कशाबद्दल बरं ? मनमोकळेपणांन कशाबद्दल तें मला कळलं पाहिजे ”

“ त्रास आल्यासारखा ? ” मी हमत ह्मणालो. “ मुळींच नाहीं. वास्तविक पाहतां डॉक्टरचें आयुष्यच त्रासमय असतें परंतु मी आतां त्रासल्यासारखा नव्हतों आज हॉस्पिटलमध्यें बरेंच काम पडल्यामुळ जरा शीण आला होता. माझें बोलणे तुला भांडल्यासारखें वाटलें काय ? ”

“ भांडल्यासारखे नाही; परंतु संशय येत असावासा वाटतों ”

“ संशय ? कशाचा तो ? ”

अंतःकरणांतील अगदीं गुप्त गोष्टीचा देखिल ठाव घेण्याची स्त्री जातीची हातोटी तिच्याटिकाणी पूर्णपणें वास करीत होती

‘ माझ्याविषयी असेल ? ”

“ काय ह्मणावें याला ? ” मी आश्चर्यानें म्हटलें. “ पण मला संशय कां बुवा यावा ? आणि कशाबद्दल ? ”

“ तें काही मला कळत नाही, ” तिनें हांसून म्हटलें ‘ आताच्या बोलण्याच्या रीतीवरून मला तसें वाटलें. पण एकंदरीत मनाचा मोकळपणा मात्र दिसत नाही एवढें खरें. असें काय घडलें माझ्याकडून ? ”

“ मुळीच नाही, खरच नाहीं, माझें मन अगदी मोकळें आहे. ”

“ तर मग कशाचा राग आला आहे ? ”

मी विरमलों. खऱ्या प्रेमीजनापासून कोणतीहि गुप्त गोष्ट चोरून ठेवावीशी वाटत नाहीं. कस्तुरी तर माझ्या मनांत काय घोळतें तें अचूक ओळखील.

“आजच्या एका अवघड केसचा विचार मात्र आज माझ्या डोक्यात सारखा घोळतो आहे. ” मी तिच्या प्रश्नांला टाळाटाळ करण्याकरिता म्हणून म्हटलें.

" पण डोक्यांत घोळणारा गोप्याबद्दलचा विचार, त्रासिकपणा अथवा संशयीखोरपणा उत्पन्न करीलसें–वाटत नाहीं. "

आतां माझी लपवालपवी मुळींच टिकण्यसारखी नव्हती. माझ्या मनांत उत्पन्न झालेल्या प्रकारामुळें पडलेला फरक तिनें ताडला होता; आणि त्याबद्दल तिची समजूत घातल्याशिवाय मला गत्यंतरच नव्हतें.

आमचें एकमेकावर जडत चाल्लेले प्रेम अंबुताईस कळले होतें. व माझ्याशीं कस्तुरचा विवाह झाल्यास आपल्याला अत्यंत आनंद होईल असेंहि तिनें आपले मत बोलून दाखविले होतें इतकेंच नव्हे तर ही गोष्ट–समाधानाची व आनंदाची गोष्ट आईला व मावशीला वगैरे कळवून विवाह देखिल लवकरच व्हावा असेहि ठरलें होते. परंतु बाबासाहेबाचें दुखणें मधून मधून उचल खाई परंतु पुढें पुढें खुद्द अंबुताईचेच प्रकरण बिघडत चाललें. पण ती गोष्ट एव्हाच नको–ओघाओघानें कळेलच सर्व कांहीं.

" ताईला आपल्या नवऱ्याबरोबर संबध दिवस घालविणें जर किंचित् जड जात असले तर त्याबद्दलचा दोष मजवर येऊं नये. " तिने अगदीं हळू स्वरांत व लीनपणें म्हटलें.

" पण असें म्हणतो कोण ? सगळी गैरसमजूत झालेली आहे तुझ्यावर दोष मुळींच नाहीं. परंतु तिला स्वतःची स्थिति अद्याप पूर्णपणें कळून येत नाहीं, हें बरोबर नाहीं. नवरा जर अंथरूणास खिळून आहे तर तिनें निदान घरीं तरी राहावें, नाहीं कां ? "

" तशी ती केव्हां केव्हां राहते, केव्हां केव्हा त्रासतेहि. ती करते तें बरें जरी नाहीं तरी तिला—" इतकेंच बोलणें तिनें अर्ध्यावर सोडलें. पण तें मी पुरें केलें.

" दूषणहि देतां येणार नाहीं. असेंच ना तुझें ह्मणणें ? पण निदान तिनें आपल्या मैत्रिणींबरोबर चैनींत ख्यालीखुशालींत तरी मिसळूं नये. मला तिच्या वर्तणुकीचा अचंबा वाटतो. "

" मला देखिल तसंच वाटतें. पण मी काय करूं ? मन मानेल तशी ती वागते. आणि बाबासाहेबहि तिच्याबद्दल फारसा विचार करीत नाहींत; किंवा

तिच्या करणीच्या आड़हि येत नाहींत. ती लहानपणापासूनचीच मनाला येईल तशी वागणारी आहे. ”

तिने आपल्या बहिणीची तरफदारी केली असेंहि ह्मणतां येत नाहीं; परंतु ती सर्वथैव तिलाच दूषण देण्यासहि कबूल नव्हती. मला तर हें एक कोडेंच वाटत होतें. आपल्या ताईची तिला कशाबद्दल तरी भीति वाटत असल्यामुळें तिला नाखूष करण्यास ती तयार नव्हती; अथवा तिच्याकडून होणारी नवऱ्याची हयगय तिच्या पथ्यावर पडत होती. या दोहोंपैकी कांही तरी एक खरें असलें पाहिजे असें मला वाटलें

“ तुझ्या ताईची ही अप्रशस्त वर्तणूक आता लोकांच्या नजरेस येऊं लागली आहे व त्याबद्दल त हवीतशी टीका करतात ही गोष्ट तूं तिला कां सुचवीत नाहीस ? सागतांना मात्र मी असे ह्मणत होतों ह्मणून सांगायचं नाहीं हो ! बोलतां बोलता प्रसंग पाहून बोलायचं. ”

“ बोलेन तसें आतां केव्हा तरी. ” ती लगेच उत्तरली. मी सांगितलेलें ऐकण्यास ती केव्हांहि अगदी तयार असे.

“ आणि तुझ्या पूर्वीच्या विचारांत फरक पडलेला नाहीं ना ? ”

“ कांहीं तरीच विचारणं. ” तिनें झट्कन् मान फिरवून ह्मटलें.

मी इंग्लंडांत कांही दिवस काढले होते तिकडच्या व आपल्या हिंदु स्त्रियांतील प्रेमाच्या व्यक्तीकरणांतील भिन्नता मला गमतीची वाटली. तिकडील तरुण कुमारिका खाद्यावर मान ठेवून, आलिंगनहि देऊन मी तुमच्यावर प्रेम करतें, प्रेम करतें ( I love you, ) ह्मणून हजार वेळां सांगतील पण तोच मनाचा हेतू हिंदू कुमारी बाहेरून फक्त दिसणाऱ्या नकारानेंच होकार कळविते. मला ह्या दुसऱ्या प्रकारांतच अधिक गोडी व गंमत वाटली. हिंदू सुशिक्षित कुमारी कितीहि धीट झाली तरी निर्भीडपणें बोलेल, वादविवाद करील, परंतु असल्या नाजूक प्रसंगीं ती पक्की हिंदूच राहील; ती अति प्रसंग करणार नाहीं, किंवा कौमार्यास न शोभणारा निर्भीडपणाहि करणार नाहीं. हेंच हिंदू तरुणीचें किंवा कुमारीचें वैशिष्ट्य.

मीहि तिला आपला निश्चय न ढळविल्याबद्दलचें अप्रत्यक्षपणें कळविलें. शेवटीं तिनें विचारिलें—" माझ्याविषयीं पुन्हां कधी शंका येणार नाहीं ना ?" ती अडखळतच ह्मणाली. "आजच्यासारखं मन गढूळ होऊं देऊं नये. त्याचें मला कितीतरी वाईट वाटतें."

मनापासून कळवळ्यानें निघालेले हे शब्द माझ्या मनाला लागले. मी लगेंच ह्मटलें "चूक झाली खरी माझी ही. मी असे पुन्हां घडूं देणार नाहीं माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे."

" आणि तो तसाच कायम राहावा "

' राहणारच. "

" काही झाले, शंका उत्पन्न होण्यासारख्या कितीहि गोष्टी घडल्या तरी मन स्थिर व निर्मळ ठेवावं एवढीच माझी विनति आहे "

मी यावर कांही उत्तर न देतां फक्त अशारीतीनें पाहिलें की त्यावरून माझी तिच्या मागणीला कबुली असल्याचें उघड व्हावें.

त्या दिवशीं माझ्या शंकेखोर मनाबद्दल व मत्सरी स्वभावाबद्दल मी स्वतः-लाच किती तरी दूषणें दिलीं. तिची माझ्यावरची निष्ठा व प्रीति हीच तिच्या प्रामाणिकपणाबद्दल साक्ष देत होती. मी कांही धनिक नव्हतो किंवा स्वरूपानें मदनहि नव्हतों तिलाहि माझ्यापेक्षां अनेकपटीनें श्रेष्ठ पति तिच्या सौंदर्य-संपन्नतेवरच मिळविता आला असता.

मी घरी परतलों. पाऊस लागतच होता. घरीं जातो तों व्हिजिट्ला बाहेर जाण्याबद्दलचा योग होताच. डॉक्टर नियोगींच्या एका कायमच्याच कुळाकडून हें बोलावणे आलें होतें. ही एक विचित्र बाई होती. स्वतःला ती होती त्यापेक्षा जास्त आजारी मानी. आपल्या दुखण्याचा उगीच बाऊ करून घेई. त्यामुळें मला तेथें बारा वाजून गेले. पुन्हां मी घरीं परतलों आणि त्या दिवशींच्या कस्तूरशी झालेल्या एकंदर बोलण्या चालण्याचा विचार करीत मी आंथरुणावर पडलों.

मी अंथरूणावर पडणार तोंच माझ्या हातांत नोकरानें एक टेलिग्रॅम आणून दिला. डॉक्टर नियोगी बाहेर गेले होते. दुसऱ्या दिवशीं आपणास मुंबईत

यावयास मिळण्यासारखे नसल्यामुळें एक केस पाहण्याविषयीं मला त्यांत लिहिलें होतें डॅक्टर नियोगींची सही पाहिल्यावर मला टेलिग्रामविषयीं कांही विशेष वाटत नसे. कारण नुसत्या पत्राने भागणाऱ्या कामास देखिल ते तारे-चाच उपयोग करीत मी ती वाचली आणि चोळामोळ करून फेकून दिली. निदान आतां तरी मला झोंप मिळेल अशी आशा होती. डॉक्टर नियोगींची कायमची ग्राहकें होतीं ती अशा विकाराची कीं जरासें अपचन जरी झाले तरी देखिल डॉक्टरला बोलावीत, आणि दुर्दैवाची गोष्ट कीं यांत अपरात्रीं देखिल क्षुल्लक कारणास्तवहि बोलावणारीं काहीं थोडीं नव्हतीं.

मला अंथरूणावर पडून दोन तास झाले असावेत मला कस्तुरच स्वप्नांत दिसत होती. कानांत इलेट्रिक घंटेचा आवाज पडून मी जागा झालों. ही घंटा माझ्या नोकराच्या खोलींत वाजत होती असे मला भासलें. थोड्याच मिनिटांत नोकर मजकडे आला; व देशपांड्याकडून माणूस आला असून तो मला भेटणार आहे असे त्यानें मला सांगितले.

" देशपांड्याकडून? इतक्या अपरात्री?" मी चट्कन् आंथरुणावरच उठून बसत असतां आश्चर्यातिरेकाने विचारले. " सोड बरे त्याला आत लवकर. "

थोड्याच वेळात तो माणूस माझ्या समोर उभा राहिला. तो भयभीत झालेला होता.

" काय गंगाराम, कायरे ? ह्या वेळी कां आलास तूं ? "

" काय सांगू डॉक्टर ! " तो अडखळूं लागला त्याच्या तोंडातून शब्दच निघेना.

" अरे झाले काय ? "

" धनी—धनीसाहेब—धनीसाहेबांचा खून ! "



# प्रकरण ५ वें.

## गहन कोडें !

गंगारामाच्या त्या शब्दांनी मी थिजून गेल्यासारखा झालों. " खून ! खून होणें अशक्य " माझी जीभ ताब्यांत आली तेव्हां मी ह्मणालो.

" पण—पण झाला खरा. "

" खूनच झाला कशावरून ? त्याच्या नेहमीच्या रोगानें त्याचा घात झाला असेल, त्यामुळेंच त्याना मृत्यु आला असेल. "

" नाहीं. डॉक्टरसाहेब, धनीसाहेबांचा कुणी तरी दुष्टाने खूनच केला आहे."

" पण हें खरें कशावरून ? मला सर्व हकीगत मूळपासून सांग बरें. "

बाकी त्याची बावरलेली वृत्ति, धडधडणारी छाती, फार घाबरून गेल्यामुळे चेहऱ्यावर उमटत असलेला फिकटपणा, व येता येतां घाईतच कसा तरी पोषाख करण्याची ती विचित्र रीत, यावरून खरोखरच कांही तरी फार भयकर प्रसंग ओढवला आहे हें मला उघड दिसत होतेंच.

" कशावरून तें मला कसे सागतां येणार ? आह्माला अझून कळलेलें नाही " त्यानें लगेंच उत्तर दिलें. " हकीगत मात्र मी सांगतों. नेहमींच्या रिवाजाप्रमाणें दोन वाजतां मी धनीसाहेबांच्या खोलींत गेलों. ह्या वेळी त्यांची जाग होण्याची वेळ असते व ते आपणास काही हवें नको असल्यास सांगत. तेंच विचारण्यास ह्मणून मी गेलों होतों. पण ते नेहमीप्रमाणें जागे नसून स्वस्थ झोंपले आहेत असें मला वाटले. दिवा मिणमिणत होता, ह्मणून मी जवळ जाऊन पाहिलें तों बिछान्यावरील पलंगपोसावर लहानशी लालसर रेघोटी दिसली. मी अधिक जवळ जाऊन बघितलें, तर तें रक्त होतें ! पुढें तोंड नेऊन मी अधिक बारकाईनें पाहू लागलों तो छातीच्या अगदी जवळ एक लहानशी जखम झाली असून तीतून हळूहळू रक्त बाहेर पडत होतें. तें सर्व पाहून मला फार भीति वाटली. "

" तर मग त्यांच्या छातींत शस्त्र खुपसले आहे, असेंच तुला वाटतें ना ?" मी झट्कन उठून कपडे चढवीत असता ह्मटले.

" होय. आह्मांला असेंच वाटतें. "

" अरे बापरे ! एकंदर भयंकर स्थिति दिसते. " गंगारामाची हकीगत ऐकून मी देखिल किंकर्तव्यमूढ होऊन गेलो होतों.

" बरं इतक तुला कळल्यावर पुढें तू काय केलस ? "

" मी नर्सीसला उठवल. तिची निजण्याची खोली धनीसाहेबांच्या खोलीला लागूनच शेजारी होती. मग मी कस्तुरबाईना उठवलं. त्या तर माझ्याहिपेक्षां घाबरून गेल्या कुठल मी त्यांना उठवलं असं मला होऊन गेलं. ह्मणजे धनी-साहेबाना वर जाऊन पाहिल्याबरोबरच त्यांनी आपल रडच सुरू केलं. त्यांनी रडत रडतच मला तुमच्याकडे पाठविल. "

' जवळपास कांही हत्यार, शस्त्र पडलं आहे काय ? "

" मला नाहीं दिसलं बा ! "

" पोलीसला ही हकीगत कळवली काय ? "

" नाहीं. तुह्माला बोलावून आणवून, सर्व हकीगत कळवून, तुमचें मत घेतल्याशिवाय पुढचे कांहीच करावयाचे नाहीं असे कस्तुरबाईनीं ठरविलें आहे."

" आणि धनीनबाई काय करताहेत ? "

" त्यांना चागले कांहीच माहीत नाही ! "

" ह्मणजे ! तिला तू उठवलीसच नाहीं ? "

" त्या आज घरी नाहीत ! "

" काल मैत्रिणीकडे की मावशीकडे गेलेल्या अंबुताई अद्याप परतल्या नाहीत ? '

" नाहींत. "

मला या वेळीं कसेंसेच वाटलें. कदाचित् कांहीं आकस्मिक अडचणींमुळें अडून राहिली असेल असेंहि मला वाटलें.

एकंदर हकीगत ऐकून कोणाच्याहि अंगावर शहारेच यावेत ! पहाटेला दोन वाजतां उठून धन्याला काय हवें नको तें विचारण्याचा गंगारामाचा प्रघात

होता. बहुतकरून बाबासाहेबांना रात्रौ झोप चांगली लागे. त्यामुळें नर्सला जवळ जागत राहण्याचे कारण नव्हतें.

अगदी दोघे बरोबर निघालों. जात असतां आमच्या याच विषयावर गोष्टी चालल्या होत्या; कारण मला गंगारामाच्या स्वभावाचा चांगला परिचय करून घ्यावयाचा होता. ह्मणून मी त्याच्याशीं आज कितीतरी बोलत होतों. असा पूर्वी मी कधी त्याच्या धन्याबद्दल बोललों नव्हतों आणि आतांहि बोललो नसतो.

गंगाराम चागला वहिवाटलेला, चतुर, बोलका व थोडें शिकलेला—लिहावयास वाचावयास येणारा असा—हुषार नोकर होता. आज तर त्याच्या अंतःकरणाला धक्का बसल्यामुळे तो अधिकच बोलत होता.

गंगाराम बाबासाहेबाकडे आज दहा वर्षे होता त्याच्या बोलण्याच्या एकंदर झोंकावरून धनिनीचा स्वभाव त्याला आवडत नसावासे दिसून आलें कस्तुरच्या व माझ्या प्रेमसंबधाची त्याला माहिती होती; आणि ह्मणूनच आपल्या धनिनीबद्दल बोलताना तो काळजीपूर्वक व जपून बोलत होता. माझी खात्री झाली की त्याला आपल्या धनिनीबद्दल तिरस्कार वाटेच, पण कस्तुरचा स्वभाव देखिल त्याला आवडत नव्हता

" अशी सबध रात्रीची रात्र तुझी धनीन आपल्या मैत्रिणीकडे बाहेर नेहमी काढते काय ? "

" कधी कधी नेहमीच काढतात असे नाही. "

" हे तुझ्या धनीसाहेबांना कळतें ? "

" कधी कधी कळतें. केव्हां तरी तेच मला त्या घरी आहेत की काय ह्मणून विचारीत, आणि मी चौकशी करून खर सागत असे "

या गंगारामाच्या सांगण्यावरूनच उघड आहे की गंगाराम अबुताईच्या नेहमी बाहेर जाण्याची बाबासाहेबांना माहिती देई. कस्तुरचे जे विचार होते त्याच्या विरुद्धच हें गंगारामाचे वर्तन होई. अबुताईची तर चहाडी केल्यासारखेंच होत होते. बाबासाहेबांचा हा विश्वासू नोकर असल्याचें मला मूळपासून ठाऊक होते. परंतु असले चाळेटवळे तो करीत असेल असें मला वाटलें नव्हते. अबुताईकडून शुश्रूषेत होणारी टाळाटाळ ह्मातान्यास लागून राहिली

असली पाहिजे यांत संशय नाही. ते तिची प्रत्येक इच्छा पुरवीत. अंबुताईची हरएक प्रकारची हौस पुरविण्यात बाबासाहेबाकडून कधींहि कसूर झाली नाही. आणि त्याचा मोबदला अशा प्रकारचा मिळाल्यावर कोणाला वाईट वाटल्यावांचून राहील ?

माझ्या मनात आजपर्यंत जी सकटाची धास्ती भरून राहिली होती ती हीच असे मला आता वाटू लागले. सजीवनने माझी धास्ती थट्टेवारी नेली होती पण आतां ? केवळ सत्याकरिता उद्यां सकाळीच बातमी कळण्याबरोबर तो ह्यांत डोके घालणार—नव्हे स्वतः खटपट केल्याशिवाय राहणार नाही, याची मला पक्की खात्री होती. ही सर्व गोष्ट वर्तमानपत्रवाल्याना कळल्याबरोबर जगजाहीर होणार होती. कुठे काहीं सुट् फुट् झाले तरी येवढेंच छापून टाकून तितकी जागा भरून काढण्यास भुकेलेले वर्तमानपत्राचे एडिटर आणि त्याचे बातमीदार असल्या महत्वाच्या व भयंकर बातमीच्या प्रसिद्धीकरिता असतील तेथून वास काढीत धांवत यावयाचेच हे ठरलेलें !

गंगारामाकडून मला बऱ्याच गोष्टी कळल्या, पण त्यात लक्ष्यांत ठेवण्यासारखी ह्मणजे तो आपल्या धनिनीच्या विरुद्ध होता. परंतु याचें मला मोठें आश्चर्य वाटले. कारण अबुताईनी आतापर्यंत त्याला किती तरी चांगल्याप्रकारें वागविले होते. ती त्याला बक्षिशी देई, पोस्त देई, सुटया देई, आणि तिनें त्याचा पगारहि वाढविला होता. असें असूनहि तो तिच्या विरुद्ध हें कसे ?

हे इतके विचार माझ्या मनांत येत होते तरी माझें सारें चित्त कस्तुरकडे गुंतले होते. ती किती तरी घाबरून गेली असेल ! अबुताई घराकडे नव्हत्या; नर्स, नोकर व त्यांच्याबरोबर एकटीच कस्तुर असल्यामुळे तिची बोबडीच वळली असेल !

आह्मी तेथें पोंचल्याबरोबर मी घरांत गडबडीनेंच शिरलों. वर जात असतां कस्तुर वाटेंतच मला भेटली आमचीच वाट पाहत ती राहिली होती. अंथरुणावरून उठल्यामुळें तिनें पांघरावयाची शाल तशीच अंगावरून पांघरून घेतला होती. तिची बावरलेली मुद्रा तिची घाबरलेली स्थिति दाखवीत होती.

" मला—वाटलं आतां दुसऱ्या कोणालातरी बोलवावं लागतं. किती वेळ हा ? आणि कसला तरी प्रसंग हा ! " ती कांपऱ्या स्वरांत ह्मणाली.

" इकडे ये, " मी घाईघाईनें तिला एका बाजूस नेऊन ह्मटलें. " तुला टाऊक असलेली सर्व हकीगत सांग बघूं मला. "

" दोन वाजल्यानंतर गंगाराम नित्याप्रमाणें वर गेला. तेव्हां त्याला सर्व कांहीं आटोपलेलें आढळून आलें. "

" कदाचित् अझूनहि कांहीं धुगधुगी असेल. " आठवल्यासारखें करून मी एकदम ह्मटलें आणि तिला तेथेच एकटी सोडून धांवत गेलों तो सरळ बाबासाहेबांच्या खोलींत शिरलों. आजच सकाळीं ते ह्याच ठिकाणी माझ्याशीं गप्पा मारीत बसले होते !

मी खोलींत पाऊल टाकलें. दृष्टि पडल्याबरोबर खरा प्रकार कळून आला. बाबासाहेबांनीं इहलोकची यात्रा संपविली होती. मानवी प्रयत्नाच्या आटोक्यांत आतां कांहीं राहिलें नव्हतें. त्या सुरकुत्या पडलेल्या चेहऱ्यावरील प्रेतकळा खरा प्रकार दर्शवीत होती.

गंगारामानें सांगितल्याप्रमाणे पांढऱ्या स्वच्छ चादरीवर रक्ताचा डाग पडला होता खरा. पण अधिक रक्त दिसलें नाहीं. लगेच माझी दृष्टि त्या जखमेवर गेली. ही जखम सुमारें पाउण इंच लांब असून ती अति तीक्ष्ण शस्त्रानें सफाईदार केली होती. खून करणाऱ्यानें आपलें काम चाललें असतांना ह्याताऱ्यानें ओरड बिरड करूं नये ह्मणून तो गाढ झोपेत असतांना योग्य संधि साधून आपले काम उरकलें होतें. त्यानें आपलें कार्य संपवून तें शस्त्रहि नेलें होतें.

मी मागे वळून पाहिलें तों शाल पांघरलेली, फिक्की पडलेली व माझ्याकडे बारकाईनें पहात असलेली कस्तुरी मला दिसली. ती उंबरठ्यावरच कांपरें भरल्यासारखें करीत होती. मृताच्या खोलींत प्रवेश करण्यास ती भीत असावी.

मी चट्दिशीं उठलों व त्या खोलीच्या सर्व खिडक्या तावदानें वगैरे तपासून पाहिलें. खिडक्या बंद होत्या; सर्व ठाकठीक होतें. कोणतीहि वस्तु जाग्यावरून हालली नव्हती.

मी बाहेर गेलों व खोलीचा दरवाजा झांकून घेतला आणि कस्तुरला ह्मटलें " गंगारामाला पोलिस चौकीवर जाऊं दे. आपल्याला पोलीसला वर्दी दिली पाहिजे "

" पोलीसला वर्दी दिल्याशिवाय चालणार नाहीं का ?" ती भीत भीत काळजीनें ह्मणाली. " तसें केल्यासवर्तमान पत्रांतून केवढा बोभाटा होईल ! जेथल्या तेथें हें प्रकरण समवतां येणार नाहीं का ? माझ्याकरितां याचा विचार करावा. "

" पण खून झालेला मला धडधडीत दिसत असतां साहजिक मृत्यु आल्याचें सर्टिफिकिट मला कसें देतां येईल ? "

" तर मग हा खूनच झाला आहे असंच ह्मणण ना ? "

" निःसंशय ही आत्महत्या देखिल नव्हे "

माझ्या ह्या चौकशीचा तिच्या मनावर परिणाम होऊन ती शेवटीं पुतळ्या-सारखी निश्चल झाली. आकस्मिक प्रसगाने भित्र्या स्त्रियाची अशीच स्थिति होते. अशा चमत्कारिक प्रसंगी नेहमीची भीडभाड, लज्जा, विनय, नेहमींच्या आचारांत पाळण्याच्या नियमाचा विसर पडतो त्या वेळीं माणसाचें लक्ष व्यग्र झालेलें असतें मी तिला खाली येण्यास खूण केली ती तिला समजली नाही; ह्मणून हांक मारून खालीं बोलावलें; तरी देखिल ती जाग्यावरून हलेना. शेवटीं शिष्टाचाराचा मला भंग करावा लागला. मी तिला हातास धरून खालीं नेलें व तेथून जेवावयास बसावयाच्या हॉलमध्यें घेऊन गेलों. मी ओढीत होतों आणि ती निमूटपणें पावलें टाकीत माझ्या मागून येत होती. मी त्या बाजूस जात असतां मध्येच मला गंगाराम भेटला; त्याला मी पोलीस स्टेशनावर वर्दी द्यावयास जायला सांगितलें.

आंत नेल्यावर मी तिला " अगदी शांतपणें जें कांही घडलें तें तुला जसें ठाऊक असेल तसें, अगदीं बिनचूक, काहीं एक मागें न ठेवतां बरोबर सांग. " असें सांगितलें.

" म—मला—मला कांहींच ठाऊक नाहीं. माझ्यापेक्षां जास्त आपणाला कळलें आहे. गंगारामानें दरवाज्याला धक्का दिल्यावर मी घाबरून उठलें आणि त्यानें सांगितलेली गोष्ट ऐकून माझी बोबडीच वळली. "

" तोंपर्यंत मागील पुढील सर्व दरवाजे बंद होते ना ? "

" होय. बंदच असावेत. गडीमाणसं बरोबर सांगतील "

" परंतु, अबुताईनीं रात्रीच्या रात्री बाहेर काढाव्या, हें जरा चमत्कारिकच नव्हे का ? "

" तिला काय माहीत कीं आपल्यामागें आजच असा प्रसंग ओढवेल ह्मणून ? तिला कधी कधी असें सबध रात्र राहावें लागे.

आतां दुसऱ्यांदा ती आपल्या बहिणीचीच बाजू घेत असल्याचें माझ्या नजरेस आलें.

"हा सर्व प्रकार कसा घडून आला हें एक कोडेंच आहे." कस्तुर ह्मणाली. " मला रात्रीं झोंप गाढ लागलीच नाही. कारण मी एकाचा टोका ऐकला. तोंपर्यंत मी जागीच होतें. तोंपर्यंत मला कसलाच आवाज खडबड वगैरे कसलीच गडबड ऐकू आली नाहीं. माझ्याप्रमाणें नर्सला देखिल कांहीं ऐकू आलें नव्हतें "

ह्या नर्सला मी पुरी ओळखीत होतों. ती एक सदाचरणी आणि सुस्वभावी व कर्तव्यतत्पर बाई होती. डॉक्टर नियोगीहि तिला ओळखीत होते. दोन वर्षांपूर्वी आह्मीं दोघानीच तिला बाबासाहेबांकडे नेमलें होतें.

तिनें ह्मटल्याप्रमाणें हें एक कोडेंच होतें आणि तें सोडविण्याचें काम आतां पोलीसावरच संपविणें भाग होतें. मी कस्तुरला ह्मटलें:

" गंगारामाला तिकडून आल्यावर प्रथम अंबुताईकडे पाठवावा. पण ती नक्की कोणाकडे आहे; तें मात्र कळलें पाहिजे. त्यानें खरी गोष्ट न सांगतां बाबासाहेब अत्यावस्थ आहेत एवढेंच सांगितले पाहिजे. नाहीं तर भलताच परिणाम होईल. "

" तिनें वास्तविकपणें बाहेर जायलाच नको होतें. निदान रात्रीं परत तरी आलें पाहिजे होतें. आतां जन्मभर पश्चात्ताप ! "

" पश्चात्ताप जन्मभर केला ह्मणून आतां गेलेला प्राणी थोडाच परतणार ! खून करणारा शोधून काढून त्याचा खून करण्यांत काय हेतु होता हेंहि आह्माला आतां जलद पाहिलें पाहिजे. कांहीं तरी हेतू असलाच पाहिजे. कारण जो चार

दोन महिन्यानीं आपोआपच मेला असता अशा रोग्याला इतक्या उतावीळ-पणानें आजच ठार करणें ह्मणजे यांत कांहीं तरी हेतू हा असलाच पाहिजे. अर्थात् त्या खून करणाऱ्याला उद्यांचा मृत्यु आज, इतका जवळ आणण्याची आवश्यकता भासली आहे. या गोष्टीचा पोलीसला बराच फायदा घेतां येईल."

" हा खून करणारा कोण असावा ?"

"हेंच तर कोडें—गूढ तें आणखी ह्याच्याशिवाय कोणतें आहे ? तूं ह्मणतेस त्याप्रमाणें घराचे सर्व दरवाजे वगैरे जर यथायोग्य बंद असले तर खून कर-णारा घरातलाच कोणी तरी असला पाहिजे असें नाहीं का ठरत ?"

" आँ भलतेंच ! घरांत मी आणि नोकर माणसें ! आणि आमचा तुम्हाला संशय येतो काय ?"

" मला सध्यां कोणाचाच संशय नाहीं. पोलीसच्या ताब्यांत ही केस द्यायची एवढेच मला कळतें आहे. म्हणजे मग काय तें आपोआपच बाहेर पडेल."

तेथील टेबलावर टेलिग्रॅफचे फॉर्मस् होते. त्यातील एकावर डॉक्टर नियो-गीना ही हकीगत लिहून तो फार्म खिशांत ठेवून दिला. सकाळीं मी त्यांना तार करावयाचें ठरविलें.

थोड्याच वेळांत पोलीस इन्स्पेक्टरची स्वारी येऊन दाखल झाली. त्यांच्या-बरोबर साधा पोषाख केलेला दुसरा एक ऑफिसर होता.

थोडक्यांत मी त्याला एकंदर हकीगत कळविली, आणि नंतर त्यांला वर बाबासाहेबांच्या खोलींत घेऊन गेलों.

त्यांनीं इकडे तिकडे नजर फिरविली; आणि पुन्हां ते बाहेर आले. खालीं कोणी येतें कीं काय हें ते पाहत होते. इतक्यांत साधाच पोषाख केलेले दोन असामी आंत आले. त्यांतील एक सी. आय्. डी. खात्याचे सार्जंट होते. त्या तीन डिटेक्टिवांनीं कान्स्टेबलला कांहीं सांगितलें आणि त्याला घराचे सर्व दरवाजे बंद असल्याची खात्री करून मुख्य दरवाजावर राहावयास बजाविलें अशासाठीं कीं आंतल्या कोणी बाहेर; अथवा बाहेरच्यानें आंत येऊं नये.

---

## प्रकरण ६ वें.

### गहन कोडें उलगडलें !

तदनंतर मी कोण काय वगैरे त्यांस सांगून त्यांच्या मदतीकरितां त्यांच्या; बरोबरच राहिलों.

ज्या शस्त्रानें जखम करण्यांत आली; त्याकरिता केलेला शोध फुकट गेला. यावरून तें खुनी इसमानें बरोबर नेलें असेंच ठरलें. दोघामध्यें धडपड अथवा तशाप्रकारचें कांहीं घडल्याचें कसलेंच चिन्ह दिसत नव्हतें; किंवा तो खुनी इसम चोर अगर धनलोभी दरवडेखोर असून त्यानें तोंड दाबून खून केला असावा असें अनुमान काढण्यासहि कांहीं मार्ग नव्हता.

ती खोली ऐसपैस असून तिला दोन खिडक्या व प्रवेश करण्यास एक दरवाजा होता. ह्या दोन्हीं खिडक्या बंद होत्या. म्हातारा विलासी स्वभावाचा होता. त्याच्या खोलींत योग्य व आवश्यक अशा सर्व वस्तू होत्या. आंथरुणाच्या जवळच एक ईझीचेअर होती. बरें वाटे तेव्हां बाबासाहेब या खुर्चीवर बसून विश्रांति घेत. त्या खुर्ची समोर एक फूट अंतरावर स्टूलहि ठेविलें होतें टबलाचे खण उघडून पाहिले परंतू काहींच सांपडलें नाहीं.

" घरांतल्याच कोणी तरी हें कृत्य केलें आहे. " दार बंद आहे कीं काय ही खात्री करून घेण्याकरितां तिकडें एकवार नजर फेंकून इन्स्पेक्टर गंभीरपणानें माझ्या कानांत बोलला.

" आतांपर्यंतच्या शोधावरून मलादेखिल तसेंच दिसतें. " मी म्हटलें.

" मघां वर येतांना दाराजवळ जी तरुण स्त्री दिसली ती कोण बरं ? " आपलें नोट्‌बुक काढून डिटेक्टिव्ह सार्जंटनें विचारलें.

" ती अंबूताईची बहीण कस्तुरी. "

" आणि अंबूताई घरांत आहेत का ? " वरील नांव टिपून घेत असतां त्यानें हा दुसरा प्रश्न केला.

" नाहीं. तिला आणण्याकरितां आम्ही आतांच बोलावणें पाठविलें आहे. ती कोणा मैत्रिणीकडे गेली आहे काल. "

"अहो ! ही येथें लोखंडी सेफ् आहे !" सगळीकडे शोध करीत असणाऱ्या डिटेक्टिवांपैकी एक ओरडला. ही सेफ भिंतींत बसविली होती.

"ती सेफ बंद आहे काय ?" इन्स्पेक्टरनें विचारलें.

त्यानें कुलुपाची जागा पाहून होकारार्थी उत्तर दिलें.

"त्यांनी आपले महत्वाचे कागदपत्र व जडजवाहीर त्यांत ठेविले असतील." दुसरा डिटेक्टिव म्हणाला. "एकदर खिडक्याचा बंदोबस्त व ही सर्व व्यवस्था पाहिली म्हणजे यांना चोरांची फार भीति वाटत असावीसें वाटतें."

"ते जरासे लहरी होते. बहुतेक म्हाताऱ्या माणसांचें असेंच असतें." मी म्हणालो "त्यांच्या गावीं पूर्वी एकदा घर फोडून बरड आंत शिरले व बरीच चीजवस्त त्यानीं लांबविली त्या वेळेपासून त्यांना धक्का बसला. त्यामुळें अशा बाबतींत ते जास्त सावधगिरी घेऊं लागले."

आम्ही सर्वांनी ती सेफ बाहेरून तपासून पाहिली. तिला चावी देखिल लावल्याचें चिन्ह दिसलें नाहीं. सेफ् आंतच्यास कुलुपाची होती व किल्ली घालण्याच्या भोंकावरील पितळी आच्छादनाला किंचित गंज चढूं लागला होता. कित्येक आठवडेपर्यंत त्याला किल्लीचा स्पर्श झाला नव्हता.

खोली तपासण्यांत डिटेक्टिव गुंतले असतां मी बाबासाहेबांकडे जरा लक्ष पुरविले. उजव्या कुशीवर ते पडले होते. निजतांना जसा घ्यावा तसाच त्यानीं आपला एक हात किंचित उचलून डोकीवरून घेतला होता. चेहऱ्यावरून पाहतां मरणसमयीं मृताला कसल्याहि वेदना अथवा आघात सोसावे लागल्याचें चिन्ह दिसत नव्हते. खुनी इसमानें एकाच वारानें आपलें कार्य साधलें होतें. आणि तो घायहि अगदीं काळजापर्यंत गेला होता; म्हणूनच काम बेमालूम फत्ते झालें. अत्यंत त्वरेनें कार्य साधून खुनी माणूस कोणासहि मागमूस लागू न देतां पसार झाला होता. बिछान्यावरच्या पलंगपोसावरील रक्ताच्या डागाशिवाय या भयंकर खुनाची कसलीच खुण मागें राहिली नव्हती.

बिछान्याजवळ सतरंजीवर मी उभा होतों. सर्व स्थिति लक्षांत घेतां तो खुनी इसमहि याच ठिकाणीं प्रथम उभा राहिला असावा. त्याच ठिकाणीं सत-

रंजी आणि माझ्या पायांतील बूट यांच्यामध्ये कांहीं तरी कठीण वस्तू लागली; परंतु शोधांत माझें लक्ष पूर्ण गुंतल्यामुळें ती माझ्या ध्यानातच आली नाही. परंतु त्याच जागेवर माझा परत पाय पडला. तेव्हां मी खालीं वाकून पाहिलें; मला एक पांढरी वस्तु दिसली. मी ती झट्कन् उचलली.

तिच्यावर माझी दृष्टि जाण्याबरोबर कोणाच्या दृष्टीस पडूं नये म्हणून मी ती मुठींत घट्ट दाबून ठेविली. नंतर माझ्याकडे कोणाचें लक्ष्य आहे कीं काय तें इकडे तिकडे वळून पाहिलें आणि तदनंतर आपल्याला कोणी पाहिले नाहीसें पाहून मी ती जाकिटाच्या खालच्या खिशांत ठेवून दिली. आणि इतकेंहि करून कोणी माझी ही चळवळ पाहिलीच असली तर संशय येऊं नये ह्मणून त्याच खिशांतले घड्याळ बाहेर काढून किती वाजले तें पाहिले.

माझी नाडी जलद चालूं लागली, छाती देखिल धडधडूं लागली, चेहरा कावराबावरा झाला. कारण आकस्मिकपणें मला खुनाचा तपास करण्यास उपयोगी पडणारी मुद्दयाचीच वस्तु सांपडली होती !

मुद्देमालांतील वस्तु म्हटल्यावर मी ती तेथल्या तेथेंच तपासावी कीं नाहीं ? पण त्या वस्तुकडे पोलीसांचें लक्ष जावें असें अद्याप माझ्या मनांत नव्हतें. शक्य तितक्या लवकर संजीवनकडे जावून त्याच्या समोर सर्व हकीगत ठेवून त्याच्या मदतीनें आपण स्वतंत्रपणें खुनाचा तपास करावा असा माझा इरादा होता.

मी ती वस्तु लपवून ठेविली आणि तितक्यांतच इन्स्पेक्टरसाहेब बाहेर जाऊन त्यांनीं एका कॉन्स्टेबलास बोलाविलें.

"नंबर ४६२ ! दरवाजाला कडी लावून चट्दिशीं वर ये."

"होय." असें घर्घरित आवाजांत म्हणून तो कॉन्स्टेबल दरवाजा बंद करून एका क्षणांत वर आला.

"नंबर चारशें बासष्ट ! आजच्या रात्रींत या घरावरून तूं किती वेळा गस्त घातलीस ?" इन्स्पेक्टरसाहेबांनीं विचारिलें.

"अजमासें आठ वेळां."

"कांहीं दिसलें नाहीं ?"

" मी ड्युटीवर हजर [illegible] घरातून [illegible] घरानें बाहेर [illegible]डताना मला दिसलें, खाली उभ्या असलेल्या बाईनीं त्याला [illegible] व [illegible]क्टरला बोलवून आणावयास सांगितले "

" हं, तो गंगाराम !" मी म्हटलें

" तो आहे कुठे ?" इन्स्पेक्टरनी विचारलें डिटेक्टिव्हाने नाव तत्काळ आपल्या नोट बुकात लिहून घतलें

" तो मलाच आणण्याकरिता गेला होता आता कस्तुरबाईनी त्याला अबु[illegible] नाईना आणण्याकरिता पाठविला आहे त्यालाच प्रथम ही गोष्ट कळून आली "

"असं काय ?" साशंक होऊन डिटेक्टिव सार्जंटने आश्चर्यानें विचारलें "तर त्याला ह्या वेळी पुन्हा बाहेर पाठविता नये होता त्याच्याकडून बऱ्याच गोष्टींचा उलगडा करून घेतां आला असता ?"

" एका तासाच्या आतच तो परतेल मला वाटत "

" खरी गोष्ट पण अशा गोष्टींत प्रत्येक तास किंनी तरी महत्वाचा असतो बाबूराव, बाबूराव, " तो साध्या पोषाखवाल्या एका इसमास म्हणाला 'असाच स्टेशनवर जाऊन आणखी पोलीस मदत मिळण्याकरिता तार कर पव हकीगत थोडक्यात कळिव इथें जें काय प्रत्यक्ष दिसत आहे, त्यापक्ष [illegible]ितीतरी गूढ गोष्टी आहेत असें मला वाटतें त्याला मदत पाहिजे "

बाबूराव आज्ञेप्रमाणें तावडतोब निघून गेला

" येथील चाकरनोकराविषयीं तुम्हाला काय माहिती आहे ?" इन्स्पेक्टरनी कॉन्स्टेबलला विचारलें

" विशेषशी नाहीं नंबर ६४८ ची सैपाकिणीवर नजर असते ती चांगली बाई दिसते तिच्या बापाचीहि माहिती मिळालेली आहे मी येथे अजमासे आठ वर्षे काम करीत आहे परंतु त्या मंडळीविषयीं कांहींच संशय [illegible]ारखें नाहीं "

" बरं, त्या गड्याविषयीं काय—काय त्याचं नाव ? गंगाराम—गंगारामा[illegible] [illegible]द्दल काय माहिती ?"

" त्याला मी त्याच बाजूच्या दारू दुकानांत केव्हां केव्हां निकदवरी नाक्याच्या कोंडावरच असलेल्या नवीन स्थापन झालेल्या दुकानांतहि पाहिले आहे "

" दारुड्या आहे ?"

" इतका शिवया नाहीं बाला नावाचा एक माळी त्याचा दोस्त आहे मला दिसण्यात चांगला दिसतो "

" तर मग इतक्यात वहिमी कोणासच ठरविता येत नाहीं ना ? "

इन्स्पेक्टरसाहेब निराश होऊन म्हणाले मुद्द्याच्या चौकशीच्या बाबतींत पोलीसची बहुतेक वेळां प्रथमपासूनच चूक होते, आणि खरा गुन्हेगार सुखरूपपणे निसटला असता दुसऱ्या कोणामागे मारून मुटकून गुन्हेगार बनवावा लागतो ? काय करणार बिचारे ? नोकरी तर बजावली पाहिजे ? ड्युटीच ती त्यांची ! शिफारस तर मिळविली पाहिजे ? नाहीं तर प्रमोशन कसें मिळणार ? याची समजूत देण्याची हातोटी इतकी अजब असते की एखादा मनुष्य नसला तरी स्वखुषीनें गुन्हेगार बनतो !

इतक्यांत माझा हात जाकिटाच्या खिशावर गेला त्या वस्तूचा स्पर्श होताक्षणींच मला मनातल्या मनांत आनंद व समाधानहि झाले या वेळीं मला तर किती तरी वाटत होतें कीं पांचच मिनिटाचा एकांत मिळावा आणि मी ती वस्तु बाहेर काढून पाहावी

इन्सपेक्टरसाहेबांनीं बाहेर पडणाऱ्या कॉन्स्टेबलला दार उघडून देण्याकरितां सांगून दिलें आणि नंतर उरलेल्या सर्व घराची व नोकर माणसांची झडती घेण्याचे ठरविलें त्याचसाठीं आम्ही सारे खालीं जेवणाच्या हॉलमध्यें उतरलों

पूर्वीप्रमाणेंच खांद्यावरून शाल घेतलेली कस्तुर मला दादराच्या खालीं भेटली तिनें हळूच विचारलें– ' काय झालें ? काय सापडलें ? "

" काहीं एक नाहीं " मी उत्तर दिलें आणि जेवण्याच्या हॉलमध्ये नोकरमाणसें व नर्स होतीं तिकडे गेलों

नर्स ही साधी, सरळ स्वभावाची व उघड्या मनाची एक स्त्री होती तिलाच इन्स्पेक्टरसाहेबांनीं प्रथम गांठली तिनें साडे अकरा वाजतां ब्लॅंकेटचा औष-

धाचा डोस बाबासाहेबाना आपण दिला व तदनंतर कस्तुरबाइनीं आपणास झोंपावयास जातो म्हणून सांगितलें व नंतर आपण आपल्या खोलीत जाऊन निजलो तत्पूर्वी आणि दिवाणखाण्यात कस्तुरबाईशीं गप्पा मारीत बसलों होतो आणि गंगाराम वर वकीलसाहेबाकडे होता वगैरे हकीगत सांगितली

"अबूताई घरी नसल्याचे बाबासाहेबास कळले होतें काय ?" इन्स्पेक्टर-साहेबांनीं नर्सला प्रश्न केला

"होय कारण बिछाना झाडताना 'इतक्यांत तो घरीं यावी' असे उद्गार त्यानीं स्वतःशीं पण अर्धवट मलाच उद्देशून काढले मी तिकडे लक्षच दिले नाहीं गंगारामाने त्याना अबूताइबद्दल सांगितले असावें"

"किती वाजतांची ही गोष्ट ?"

"अजमासें साडे दहाचा सुमार 'इतक्या रात्रीं पावसाची नाटकास वगैरे जाइल तर सरदीबिरदी होईल' असे काळजीचे शब्दहि त्यानीं काढले होते"

"तिच्याबद्दल त्याना राग आला नव्हता ?"

"मुळींच नाहीं ! ती बाहेर असली तरी तिचा त्याना कधींच राग नसे ! ते मला वारंवार म्हणत तिचे अजून पोरवयच आहे तिला मनाची करमणूक करून घ्यावीशी वाटते मोहि तिच्या आड येत नाही चिमणाबाई"

चिमणाबाई नर्सच्या ह्या शेवटच्या जबाबाने त्या डिटेक्टिवाइतकेंच मलाहि बुचकळ्यात पाडलें ! मी तर स्वतःची अशी समजूत करून घेतली होती कीं अबुताईच्या बाहेर जाण्याबद्दल त्या दोघा नवराबायकोमध्यें तटा झाला असावा वृद्ध नवरा व तरुण स्त्री जेथे असतील तेथें अशा खडाजंगया हरहमेश घडावयाच्या ! मी डॉक्टर असल्यामुळें बऱ्याचशा गृहकलहाची बीजें कशीं रुजतात याची मला चांगलीच माहिती झाली होती डॉक्टर लोकाना बऱ्याच गुप्त गोष्टी दिसतात व दिसतातच त्याहून किती तरी जास्त कानावर येतात धंद्यात खोट येऊ नये म्हणून जी काळजी घ्यावी लागते ती जर एखादा डॉक्टर सोडावयास तयार होईल तर गृहकलहाच्या किती तरी गमतीच्या गोष्टी त्याच्यापासून ऐकावयास मिळतील

"रात्रीं निजल्यावर तुम्हांला कसला आवाज नाहीं ऐकू आला ?" इन्स्पेक्टरनीं विचारलें.

" नाहीं माझी झोप हलकी व जागृत असते; जरा कुठे सरमर झालें तरी मी जागीं होतें पण मला मुळींच कांहीं ऐकू आलं नाहीं "

" आम्हांला वाटतें कीं खुनी माणूस मृताच्या खोलीकडे जाताना तुमच्याच खोलींतून गेला असला पाहिजे "

" होय पण त्या खोलींतला दिवा जळतच होता आणि ह्या खोलीचें दारहि उघडेच ठेविलं होतें बाबासाहबानी मध्येच केव्हा कांहीं सांगितलें तर कळावें म्हणून मीं माझ्या खोलीचा दरवाजा नेहमी असाच ठेवित असते "

" तर मग खुनी जेव्हा घरांत शिरून ह्या बाजूस परतला असल तेव्हा त्याला तुम्ही दिसलाच असाल "

' मी नाही त्याला दिसणार ! कारण माझ्या बिछान्याच्या टोंकास पडदा आहे पण रात्रीं इतक्या जवळ माझ्या शेजारीं खुनी आला होता हें ऐकून आता मला अधिकच भीति वाटतें आहे "

नर्सकडून कांहीच निष्पन्न होत नाहीं असें पाहून इन्स्पेक्टरानी थरथर कापणाऱ्या बाकीच्या चार नोकराकडे आपला मोर्चा फिरविला

एकाशिवाय बाकी सर्वांनीं आपण कांहीं ऐकलं नाहीं असेंच सांगितले ही गगू नांवाची एक मोलकरीण होती ती म्हणाली कीं रात्रीं आपण वाहाणांचा करकर असा होणारा आवाज ऐकला आपल्या निजावयाच्या जागेपासून जवळच तो आवाज होत होता हे ऐकून प्रथम आम्हाला तिकडे लक्ष द्यावेंसें वाटलें पण जो कोणी खून करायला येणार तो करकर वाजणाऱ्या वाहाणा, चढाव अगर जोडा अथवा बूट वापरील हें शक्यच नव्हते गगूला झालेला हा भास होता असल्या भयंकर प्रसंगीं स्त्रियांच्या भीतीमूलक कल्पनेच्या खुळानीं वस्तुस्थितीस भलतेंच स्वरूप प्राप्त होतें

अशी जरी आमची समजूत होती, तरी गगू मात्र तें कबूल करण्यास तयार नव्हती ती म्हणे तो करकर आवाज आपण आपल्या कानानीं ऐकला तो भास अथवा कल्पना नव्हे दुसऱ्या मजल्यावरच्या एका लहानशा खोलींत ती झोंपली होती व तेथून ती आवाज आपण स्पष्ट ऐकला असें तिचें म्हणणें होतें

" बरं तो आवाज ऐकल्यावर तू काय केलेंस ? "

" मी पडल्या पडल्याच लक्ष देऊन ऐकूं लागल्यें ! "

" किती वेळ ? "

" जवळ जवळ पंधरा वीस मिनिटें दीड वाजण्याला थोडासा अवकाश होता तो आवाज ऐकल्यानंतर थोड्या वेळानें खालील घड्याळांत दीडाचा ठोका वाजला असा आवाज पूर्वी कधीं मी येथे रात्रीचा एकला नव्हता म्हणून मला भीति वाटली परंतु मी दाराला नेहमींच आंतून चांगली घट्ट कडी लावून घेतें म्हणून मला धीर होता हळूहळू सांभाळून कोणी चालूं लागले असतां पायांतल्या जोड्याचा अथवा वाहणाचा किंवा वाजणाऱ्या बुटाचा जसा आवाज येतो तसा तो "कर्रर्र कर्रर्र" आवाज मी ऐकला "

"दरवाजा बंद असतांना तुला इतका स्पष्ट जो आवाज ऐकूं आला तो दुसऱ्या कोणींच ऐकला नाहीं हें कसें ? " डिटेक्टिव्ह सार्जटनें सर्वांस उद्देशून म्हटलें

"लोकांनी ऐकला असो—नसो, मला ऐकूं आला एवढं खरं" गंगू म्हणाली

" असा किती वेळपर्यंत हा आवाज होत होता ? "

" बराच वेळ होत होता जपून सावकाश चालतांना टाचांकडे वाहणाचा करकर होते तसाच तो आवाज गंगाराम रात्रीं दोन वाजतां धन्याकडे जातो म्हणून आम्हांला रात्रीं पावलांचा आवाज झाला तरी कांहीं वाटत नाहीं आणि रात्रीं देखिल त्या आवाजांत ' करकर' नसती तर माझें लक्ष्य गेलें नसतें मी सुमारें अर्धा तास ऐकत राहिल्यें, आणि तितक्यांतच गंगाराम आम्हांला उठवायला ओरडत सुटला ! "

" आतां मला सर्वांला एकच प्रश्न विचारावयाचा आहे " इन्स्पेक्टरसाहेब म्हणाले, आणि ह्या सरळ प्रश्नाचें प्रामाणिकपणें व मनापासून अगदीं खरें उत्तर द्यावें अशी माझी इच्छा आहे तुम्ही सर्व झोंपलांत तेव्हां एखादा दरवाजा अगर खिडकी उघडी अथवा आतून कडी लाविल्याशिवाय राहिली होती काय ? "

' नाहीं " सैंपाकीण म्हणाली, "झोंपण्याच्या पूर्वी चोंहीकडे फिरून प्रत्येक दरवाजा आणि खिडकी मी नीट तपासून पाहातें नाहीं तर मला रात्रभर झोंपच यावयाची नाहीं "

" बरं, घरांत येण्याचा मुख्य दरवाजा ? "

" कस्तूरबाईनीं सांगितल्यावर मी तो बंद केला. "

" केव्हां ? "

" एक वाजतां. धनीनबईसाहेब कदाचित् आल्याच तर वाट पाहाण्याकरितां तोंपर्यंत साफ बंद केला नव्हता. मीच वाट पाहत तोंपर्यंत जागत बसल्यें होत्यें. '

" तर मग पुढचा प्रसंग या नंतर अर्ध्या तासानें म्हणजे दीड वाजता घडला आहे. उठल्यानंतर एखादी खिडकी अगर दरवाजा फोडला आहे कीं काय ते तुम्हीं पाहिलें आहे काय ? "

" पाहिलें मी पाहिल्याशिवाय कशी राहीन ? पण मला तसें कांहीं दिसलें नाही. सर्व जशाचें तसें आहे. "

" मोठेंच आश्चर्य ! खरोखर आश्चर्याची गोष्ट " आमच्याकडे वळून इन्सपेक्टरसाहेब म्हणाले. " आम्हाला याची जास्त शोधचौकशी केली पाहिजे "

एकंदर झालेल्या झडतींत मुख्याचा प्रश्न एवढाच होता कीं, सर्व दरवाजे खिडक्या जर बंद होतीं व तशीच अद्यापहि राहिलीं आहेत, तर खुनी इसम घरांतल्याशिवाय दुसरा कोण असणार ?

सखू सैपाकणीच्या मागून ऑफिसर दरवाजे खिडक्या तपासावयाला गेले. एक ऑफिसर आणि कॉन्स्टेबल बाहेरच्या बाजूनें पाहू लागले. मी त्यांना आंतून मदत करू लागलों. माझ्याजवळ कस्तुर येत होती, तिला कांहीं माहिती विचारण्याकरिता एका डिटेक्टिवने बोलावून नेलें. आणि थोडा वेळ मीं एकटाच राहिलों. असल्याच क्षणभर एकांताची मी वाट बघीत होतों माझ्या जाकीटाच्या खिशांत काय आहे तें मला मला पाहावयाचें होतें.

मी लवकर कोनाडयाकडे गेलों बटण दाबला, त्याबरोबर इलेक्ट्रिक दिव्याचा लख्ख प्रकाश पडला. मी खिशांतून ती वस्तू काढली आणि उघडून चांगली नीट पाहिली.

माझी दृष्टि त्याच वस्तूवर खिळून राहिली. माझ्या धमन्यांतील रक्त गोठल्यासारखें झालें मस्तकाला भोंवळ आल्यासारखी झाली. गहन कोडें उकललें !

खरा प्रकार काय तो मलाच प्रथम कळून आला !

---

## प्रकरण ७ वें.

### गंगारामाची कबुली.

ती वस्तु पाहत असतांनाच माझ्या पाठीमागें कुणाचासा पावलाचा आवाज ऐकूं आला घाई घाईनें मी ती वस्तु पूर्वस्थळीं ठेविली आणि मागें पाहतों तर मला शोधीत कस्तुरीच येत होती.

" पोलीसानी काय ठरविलें ? " तिनें विचारलें—अद्याप ती घाबरल्यासारखीच दिसत होती- " कांहीं मागमूस सांपडला का ? "

' काहीं सुगावा नाहीं लागत " एवढेंच मी बोललों. आणि जणूं काय आपलें सारें लक्ष्य शोधचौकशींत गुतून गेलें आहे असें भासवून मी तिला तशीच तेथें एकटी ठेवून पुढें निघून गेलों.

सर्व पोलीस घराची झडती घेण्यांत गढून गेले होते. त्यांनीं कोपऱ्यान् कोपरा घराचा धुंडाळला. मागची पुढची बाजू शोधून पाहिली आंतून त्याच प्रमाणें बाहेरूनहि हुडकिलें. परंतु व्यर्थ. सैंपाकघरांतूनच एक दरवाजा परसांत जाण्याकरिता ठेविलेला होता मुंबईत परसूं कसलें असणार ? एक लहानशी नीटनेटकी ती बाग होती. हा दरवाजा पोलीसांना उघडा असलेला आढळला; आणि मी जों त्यांच्याकडे जातों तों त्यांच्यांत खुनी माणसानें याच दरवाजाचा उपयोग करून घेतला असेल कीं काय याबद्दल भवति न भवति चालली होती. सैपाकीण तर ह्मणत होती कीं आपण सा दहा वाजतां तें दार लावून घेतलें. त्या नंतर तें दार पुन्हा आपण उघडल्याच कोणीहि कबूल करीना गंगारामाला विचारावें तर तो अंबुताईना आणावयाला बाहेर गेला होता.

पोलीसांनीं सगळी उलथापालथ केली. जिन्यावर कोणाची पाऊलें उठलीं असल्यास पाहावीं ह्मणून एक जण ओणवा होऊन हातांत दिवा घेऊन पाहत होता. जिन्याच्या पायऱ्या ओलसर होत्या व त्याच्यावर पावलेंहि उमटलीं होतीं, पण तीं कॉन्स्टेबल व डिटेक्टिव्हव वगैरे मंडळीचींच होतीं. मिळून परिणाम तोच !

ही झडती चालू असतां भिऊन गेलेली कस्तूर आमच्या पाठीमागून होतीच. तिने अंगावरची शाल काढली नव्हती. तिचे केस किंचित् अस्ताव्यस्त झालेले होते. आणि तिच्या अंगावर ती सुंदर शाल तिला तशाहि स्थितींत खुलून दिसत होती. मी तेवढयांतल्या तेवढयांत संधि साधून तिला एक प्रश्न विचारला. पण त्यांत माझा कांहीं गुप्त हेतु होता. अशाच कांहीं हेतूनें मी तिच्या खांद्यावरून हात फिरविला—शालीवरून हात फिरविला असेंच म्हणणें माझा हेतु अधिक उघड करील. ही शाल कपली, कोणत्या प्रकारची तें बघण्याचा माझा हेतु होता. मी माझ्या मनाची खात्री करून घेतली. शाल पाहण्याकरिताच मी तिच्या खांद्यावर हात ठेवला होता एवढें मात्र मी तिला कळूं दिलें नाहीं

इतक्यांत गाडीचा आवाज ऐकूं आला. दरवाज्याकडे गाडी थांबली व अंबुताई खालीं उतरल्या. चित्त उडून गेल्यामुळें देहभान विसरलेली अंबुताई दिवाणखान्यांत शिरली आणि तेथून तिनें थेट जिन्याचा मार्ग धरिला. तिला मी एकदम आडवा आलों.

" जाऊं द्या हो मला वर जाऊं द्या. प्रकृति अत्यवस्थ आहे असे मला गंगारामानें सांगितलें. मला वर जाऊन बघूं द्या. " तिनें बेभान होऊन म्हटलें

" ताई, जरा थांबा; एवढयातच वर जाण्याची घाई करूं नका. थोडें ऐकून घ्या. " गंभीरपणें तिच्याकडे पाहत मी म्हटलें. पोलीसांनीं परत करून झडती चालविली होती. जिन्याच्या टोंकाला कस्तुर उभी होती.

" पण असं काय ? मला जायला कोणती हरकत ? " ती मोठ्यानें म्हणाली.

" त्यांची प्रकृति अत्यंत काळजी वाहण्यासारखी बिघडली होती, पण आतां ती तशी नाहीं." मी द्व्यार्थी म्हटलें. " आज रात्री आपण आलां नाहीं कशा बरं ? "

" माझा घोर अपराध झाला तो. अक्षम्य चूक ! मी कशी व कां आले नाहीं ते मग सांगेन. त्यांत कांहींच महत्व नाहीं. " नंतर तिनें आपल्या बावरलेल्या बहिणीकडे व माझ्याकडे नजर फेंकून म्हटलं, "अशीं काय दिसतां तुम्हीं दोघहि ! काय झाले तें मला अगोदर सांगा—आधीं सांगाना मला " तिने किंकाळी फोडली !

वाईट तोंड करून मी तसाच उभा राहिलों. तिनें एकंदर स्थिति ओळखली आणि क्षणभर ती निश्चल ताठ उभी राहिली; नंतर तिने पुन्हा किंकाळी मारली; आणि तेवढ्यांत धावून तिच्या बहिणीनें आणि मी तिला सांवरून धरिलें नसतें तर ती धाडकन् पडणारच होती. तिचा पोषाख देखिल अस्ताव्यस्तच होता. केंस विंचरल्यासारखे देखिल दिसत नव्हते. झालें; आता तर ती जमिनीवरच पडली होती आणि पदरसुद्धा अस्ताव्यस्तपणें पडण्याच्या बेतांत होता तो तिच्या बहिणीने सावरला.

आतांच्या तिच्या वर्तनावरून तिला आपल्या वागणुकीचा पश्चात्ताप होत होता हें उघड होतें. मला तिची करुणा आली ती उघड्या मनाची, आनंदी व हौशी स्वभावाची आणि गप्पा व करमणूक अशात वेळ घालविण्याची संवय असलेली अशी अद्यापहि अल्लडशीच तरुणी होती. कोणाहि कुमारिकेचें वृद्ध पतीशीं लग्न झाले तर तिचे आप्तसोयरे तिच्या मनाला खूष ठेवायला जपत असतात. अंबुताईच्या मैत्रिणी देखिल मनांत तिच्याबद्दल कींव करीत व तिला आपल्या मेळांत शक्य तितका जास्त वेळ घेऊन तिचें मन प्रसन्न ठेवण्याला झटत. परंतु कोणाहि स्त्रीनें आपलें कर्तव्य सोडून आळसांत व चैनीने काळ घालविणाऱ्या बायकांच्या घोळक्यांत मिसळण्याचें टाळावें हें बरें. एकमेकांच्या घरच्या नसत्या उठाठेवी करण्याची आमच्या अशिक्षित व रिकामटेकड्या बायकांस फार संवय असते. अमकीची सासू आपल्या सुनेला असंच कुंकुं लाव म्हणून शिकवीते, तर तमकीचा दीर आपल्या भावजयीला शिव्याच देतो. अमकी बाई घरांतल्या माणसांची भीड भाड न ठेवतां हार्मोनियमवर बसून गाते; तर तमकी पाहुण्यांच्या समक्ष आपल्या नवऱ्याशीं बोलायला धजते ! अशा एक ना दोन, ह्या स्त्रीपार्लमेंटांत हजारों विषय चर्चेला येत असतात. ह्या साळकाया घोळकाया स्वतःचा वेळ खर्चून लोकांच्या घरच्या खर्चाचा अंदाज ठरवितात ! आणि शिवाय त्यांतील एखादीची पाठ जरा झाली पुरे कीं तिच्यावर देखिल आपापसात कुजबुजून हवी तशी टीका करायला कमी करीत नाहींत. जिच्यावर अशी टीका होते तिला ती गोष्ट कळल्यावर तिची स्थिति विलक्षण होते. ती त्यांच्याच सारखी एक ढालगज भवानी असली तर त्यांच्या

तोंडांस खिळेलच, पण नसली तर तिला आपल्या घरातल्या माणसांचा संशय घेऊन ती स्वतःशीच कुढत बसल. अशा रीतीने या बायकांच्या 'रिकामपणाच्या कामगिरी'ने एखाद्याच्या गृहसौख्यात कलह उत्पन्न होतो ! अर्धवट शिक्षित स्त्रियांतहि अशा स्वभावाच्या बायका असतात. आणि अंबुताई ज्या स्त्रीसंघाच्या सभासद होत्या त्यांतील सर्वच सभासद ह्मणजे प्रोक्त व उदात्त स्वभावाच्या होत्या असें नाही. त्यात काही अशिक्षितहि होत्या. आणि वर लिहिल्याप्रमाणे अशांच्या संगतीपासून जो परिणाम व्हावयाचा तो घडून येतहि होता असा माझा तर्क होता.

तर्कशास्त्राच्या दृष्टीने पाहिलें तर सदा रोगी, वृद्ध व लहरी नवऱ्याच्या संगतींत एक दोन वर्षे घालविल्यावर अंबुताईसारख्या स्वछंदी स्वभावाच्या तरुणीला किंचित् कंटाळा आल्याशिवाय राहणार नाहीं असें मनुष्य स्वभावाची पारख असणाऱ्या कोणालाहि वाटेल. अंबुताई देखिल आपल्या बहिणीसारख्याच दिसण्यात सुदर होत्या. त्याचे लग्न दुसऱ्याच एका कुणाशीच ठरले होते. तें घर बरें होते. ते स्थळ कसे मोडलं कुणास ठाऊक, पण शेवटी अंबुताई बाबासाहेबांच्याच अर्धांगी झाल्या एवढे खरें.

अंबुताई आता बेशुद्ध होऊन पडल्या होत्या, त्यांना भानावर आणण्याचें सोपे नव्हतें. बेशुद्ध होण्यापूर्वी मात्र तिने आपणाला काय खरी हकीकत आहे तें सांगण्याकरितां माझी केविलवाणीपणानें प्रार्थना करून आतां ती मूक होऊन पडली होती.

बराच वेळ तिला वाचा फुटली नाहीं माझ्या मते तिला प्रथम झिट येऊन नंतर विस्मृति पडली असावी. मूर्च्छेचा मेंदूवर परिणाम होतो. नंतर ती भलभलते बरळूं लागली ! पण या बरळण्यांत अर्थ कांहींच नव्हता आणि स्पष्ट शब्दहि उमटत नव्हते !

"कपाळ माझं—कपाळ गेऽऽ,—माझं कपाऽऽळ !" मस्तकावरून दोन्ही हात चोळीत ती मोठ्याने ओरडली.

"काय होतं आहे तुमच्या मस्तकाला ? फार दुखतंय काय ?" मी विचारले.

" लोखंडाच्या पट्ट्याने माझं मस्तक कोणी का आवळून टाकल हे ! मला कांहीं आठवत नाहीसे झालंय; मला काही समजत नाही. "

असे ह्मणून ती रडकुंडीस आल्यामारखी दिसली, आणि तिने दीनवाणी-पणानें आमच्याकडे नजर लावली.

" आतांपर्यंत स्तब्ध बसलेली बहीण—कस्तुर देखिल साधारण आपल्या ताईची ही स्थिति पाहून बेशुद्ध झाल्यासारखीच झाली होती. तिने ताईचे दोन्ही हात आपल्या हातात घेतले आणि ह्मणाली—" ताई—अस काय ग करतेस! ताई—ओ ह्मण ना ? ताई—ताई " नंतर ती ' ओ ' ह्मणेना तेव्हा कस्तुर माझ्याकडे वळली " आता कसं करणार ? ताई शुद्धीवर नाही, हो ! तिला माझ्याबरोबर बोलायला लावा. "

" कोण हे कस्तुर ? डॉक्टर—मोहनराव? कशाला आले आहेत हे इथे इतक्या पहाटेस ! काहीं प्रकृतीत बिघाड झाला नाहीं ना ? चल ग आपण वर जाऊं चल. "

" आतां वर जाण्याचें काही काम राहिलेले नाहीं. " शेवटी मन दगडा-सारखें घट्ट करून मी बोललों. खून झाल्याची हकीगत मात्र मी कळविली नाही.

" हाय रे कपाळा ! " जमीनीवर आग टांकून तिने हबरडा फोडला ! "मीच चांडाळीण शेजारीं—शुश्रूषेत जवळ घरी राहायचे माझे काम ते मी केलें नाहीं. ' इतक्यांत तिने डोळे वर खाली केले; शरिर ताठलं आणि एकदम पूर्वीच्या घडघडच्या शब्दांत विचारलें—

" पण मी घरात नव्हतें तर कुठें होत्ये ? मी घरात नव्हत्यें ? मी कुठ गेल्ये होत्ये ? " हें बोलतांना तिची दृष्टि कुठें लागली होती तेंच आह्मास कळेना !

" तुह्मी बाहेर आपल्या मैत्रिणीकडे मावशीकडे गेलां होतां ना ? " मी ह्मटलें.

" हो—होय. गेल्ये होत्ये खरी ! मला विसर कशी पडली ? पण मग मी इथें कशी केव्हां आल्यें तर ? तुह्मी मला फसवतां. मी घरांतच होत्यें.

पण मला अगोदर तिकडे वर घेऊन चला. औषधाची वेळ झाली ना ? ” थोडा वेळ ती मध्येंच थांबली. पुन्हा ह्मणाली “ मला कुणी आणलं ? ”

“ गंगारामाबरोबर गाडींतून तुह्मी आलांत ” मी ह्मटलें.

“ गंगारामानें ? गंगारामाला मी बघितलादेखिल नाही.—मी निजल्यें होत्यें. दरवाजावर कोणी थाप मारली. मला सांगितलें कीं प्रकृति जरा बरीच जड झाली आहे. मी तशीच निघाल्यें, पण त्यानंतरचें मला कांही आठवत नाहीं. पण तुह्मी तपासून आला का ? ”

“ तिच्या काळजाला धडकी भरली आहे ! ” मी कस्तुरला हळूं ह्मणालों. “एका खोलींत जाऊन तिला घेऊन बैस पोलीस तिच्या नजरेला पडूं देता नये. अद्याप तिनें पोलीसला पाहिलेलें नाहीं. ती लवकरच शुद्धीवर येईल मी तिला हुंगावयाला औषध देतों. ”

असें मी ह्मणून तिला औषध हुंगावयाला दिलें सुद्धा. पण वास्तविकपणें तिच्याविषयी मला स्वतःलाच भीति वाटूं लागली. नवऱ्याची वाईट बातमी ऐकून कोणाहि स्त्रीला मूर्च्छना येईलच. पण असल्या मूर्च्छेबरोबर स्मृतिविभ्रम व वायु भरल्यासारखें कां व्हावें हें मला उमगेना. तिनें मला विचारलेल्या प्रश्नांवरून तिला स्मृतिभ्रम झाला होता हें स्पष्ट दिसत होतें. वास्तविक असें होण्याचें कारण नव्हतें. ह्मणून मला उपचार करावयाचा कसा हेंहि सुचेना. तिला चांगली विश्रांति मिळाली पाहिजे असेंच मी शेवटीं ठरविलें. आणि उजाडताच दोघीहि बायांना एकाद्या नातलगाच्या अगर मैत्रिणीच्या घरीं पाठवून देण्याचा निश्चय केला. कारण पोलीसांनीं गजबजलेल्या घरांत आता बायकांना ठेवणें सुरक्षितपणाचें नव्हतें.

अंबुताईंनी बाबासाहेबांकडे जाण्याचा सारखा अट्टाहासच घेतला होता, परंतु नर्स व सैपाकीण यांना बोलावून त्यांच्या स्वाधीन अंबूताईंना केलें व त्यांना तिला शांत करावयास सांगितलें. कारण कदाचित् तिला पुन्हा पुन्हा मूर्च्छा येण्याचा संभव होता.

“सोडा मला ! ” तिनें मोठ्यानें ओरडून म्हटलें. “मी वर तिकडे जाणार ! सोडा मला. माझा तेथें जवळ बसण्याचा अधिकार आहे. तिथें जवळ बसण्याचें माझें कर्तव्य आहे. तुम्हीं मला कां अडवितां ग ? सोडा मला .”

कस्तुरनें दीनपणें माझ्याकडे पाहिलें. आम्ही सर्वच अंबुताईची ही अवस्था पाहून भांबावून गेलों.

"तुम्हाला वर जायला कोणीहि हरकत घेणार नाहीं." तिला शांत करण्याची खटपट करीत मी म्हटले, "अगोदर जरा शांत व्हा. जरा विश्रांति घेतली पाहिजे तुम्हाला. असं पोरासारखं करून कसं होईल?"

"डॉक्टर भियोगी कुठं आहेत?" तिनें मध्येंच एकदम विचारलें. "त्यांना तुम्ही तार दिली कीं नाहीं अजून? मला ते भेटले पाहिजेत."

"करीन! आतां सकाळीं मी त्यांना तार करतों." मी उत्तर दिलें.

इतक्या अवधींत कसेंबसे करून तिला जरा ताळ्यावर आणली. नर्सनें तिची शाल नेऊन ठेवली. बुचड्यावरील आदल्या दिवसाच्या वेणींतील फुलें चुरडून गळूं लागलीं होतीं. एका खोलींत नेऊन तिला बिछान्यावर बसविली.

काहीं वेळ ती विचारमग्न असल्यासारखी स्तब्ध राहिली; पण थोड्या वेळानें तिची पूर्ववृत्ति उलटली. झोपेंतून घाबरून उठावें तसें करून तिनें खाड्‌-कन्‌ आपले दोन्ही हात जमिनीवर आदळले! पण पुढचा भाग जमिनीवर जाऊन तळहाताच्या मागील भाग बिछान्यावरच आदळला. आणि हातांतील कंकणें कचाकच फुटलीं! त्यांतील एका तुकड्याचें टोंक तिच्या हाताला लागून त्यांतून भळभळ रक्त वाहूं लागलें!

"आतां संपला माझा अवतार" ती वेड्यासारखें बरळूं लागली. "आतां आटपला बाजार. गेला—माझा माळी गेला—आतां मला फुलेंच नकोत!" असें म्हणून तिनें केंसांतलीं फुलेंहि उधळून दिलीं. "आणि—" इतकें बोलून ती दीर्घ श्वास सोडून डोळे मिटून थकवा आल्यासारखी टेंकावयास मागें ठेव-लेल्या उशीवर डोकें ठेवून निजली.

हिच्या मेंदूंत कोणत्या प्रकारची विकृति झाली याची मला कल्पना होईना. सौभाग्यचिन्हें ती आपोआपच नाहीशीं करूं लागली! असें कां? सौभाग्यचिन्हें इतकीं प्रिय असतात कीं स्त्रियांना तीं आपल्या प्राणाच्या मोलानेंहि घेऊन ठेवावीशीं वाटतात; आणि हा काय उलटाच प्रकार? मग काय हिला वेडच लागलें?

तेथून उठून मी पोलीसांकडे गेलों. वर त्या वेळी ते एका अर्धवट उघडी असलेल्या खिडकीविषयी बोलण्यांत गढले होते. ही खिडकी इतकी मोठी होती की त्यांतून सहज कोणालाहि आत शिरतां आले असते. स्वैपाकघराचा मागील दरवाजा गंगारामाने आल्यावर आपण उघडा टाकला असल्याचें सांगितलें. तेव्हां त्याबद्दलचीहि शंकानिवृत्ति झाली. कारण बाबासाहेबांकडे आपण पाहिल्यावर इतक्यात येऊन कोणी गेला असल तर त्याचा पाठलाग करण्याकरितां म्हणून आपण धावत धावत घाईनें जवळचा मार्ग गाठण्याकरिता सैपाकघराच्या दरवाज्यानेच बाहेर पडलो व आंत आल्यावर दरवाजास कडी लावावयास विसरलों असें गंगारामानें सांगितलें. त्याची ही हकीगत ऐकून त्याच्या धाडसाची मी तारीफ केली. कारण काळोख्या रात्रीं खुनी इसमाचा, एकटयानें, जवळ कांहीं हत्यार नसता पाठलाग करणें हें शौर्याचेंच काम आहे; असे मी म्हटलें. त्यावर माझ्याकडे गंगारामाने चमत्कारिकपणें पाहून पूर्वीच्याच आवाजात उत्तर दिलें.

" माझ्याकडे हत्यार होतें. दिवाणखान्यात खुंटीवर टांगलेली ती सुरी मी घेतली होती ! "

" आतां आहे कुठे ती ? " इन्स्पेक्टरनें विचारले. कारण अशा प्रसंगी आपल्याजवळ हत्यार आहे असें कबूल करण्याचा संशय येणें स्वाभाविक होतें.

" होती तेथें नेऊन मी ती ठेविली आणि मग डॉक्टरकडे गेलो. बागेच्या बाजूस मला कोणी आढळले नाहीं. " गंगारामाने अगदी शांतपणे उत्तर दिलें.

" कुठें आहे ती मला दाखव पाहू. " असे म्हणून मी दिवाणखान्याकडे निघालों. माझ्याबरोबर तो हि आला. खुंटीला लटकत असलेल्या एका सुरीकडे त्यानें बोट दाखविलें. ती लांबडी काबुली सुरी अत्यंत तीक्ष्ण होती. मी ती हातांत घेतल्याबरोबर माझी खात्री होऊन चुकली कीं बाबासाहेबांच्या काळजास केलेली जखम ह्या किंवा असल्याच शस्त्रानें केली असली पाहिजे.

वरवरच पाहत आहे—हेतुपुरःसर नाहीं असे दाखवून मी त्याला म्हटलें " हा सुरा तुझ्या हातांत होता तर एकूण ? " बाकी मीं त्या सुऱ्याचे बारीक परीक्षण चालविलेंच होतें.

" होय तर, डॉक्टरसाहेब ! शोधता शोधतां प्रथम माझ्या हातास हेंच शस्त्र सापडलें. खूप तिखट सुरी आहे ही. एकदा धूत असता तिने माझें बोट कापलें आहे. "

मीहि तिची धार पाहिली, ती वस्तऱ्याइतकीच तीक्ष्ण होती. ह्या सुरीची लांबी सुमारें दहा इंच आणि रूंदी अर्धा इंच असावी. नकशी केलेल्या हस्तिदंताची तिला मूठ होती व तिच्यावर चांदीचे कामहि मोठें खुबीदार केलें होतें. पुष्कळ वर्षांच्या ठेवणीमुळें मुळचा शुभ्र हस्तिदंत किंचित् पिवळा झाला होता. शस्त्र खरोखर भयंकर ! त्याला जांभळ्या मखमलीचें परंतु कसरीनें कुरतुडलेलें व फाटून गेलेलें असें म्यानहि होतें.

मी मागे परतून डिटेक्टिव्ह होते तेथें गेलों. आणि चक्क प्रकाशांत सुरीचें पातें चांगलें तपासलें. तें चकचकित असून नुकतेंच धुवून पुसून साफसूफ केल्यासारखें दिसलें. खून केल्यानंतर त्याला तेल वगैरे लावून ते धुतलें असेल; परंतु माझ्या दृष्टीनें ते पातें आज रात्री उपयोगांत आणलें नव्हतें. तशा कांही खुणा मला त्यावर आढळल्या नाहींत.

पहिल्या प्रश्नाबरोबर गंगारामाच्या घाबरलेल्या मुद्रेकडे पाहून आणि आपण सुरी घेऊन खुनी इसमाचा पाठलाग करण्याकरितां सैंपाकघरांतून बागेकडे धांवलों या त्याच्या स्वतःच्या कबुली जबाबानें प्रथम मला व डिटेक्टिव्हांना संशय. आला डिटेक्टिव्हांनीदेखिल ती सुरी तपासून उलथून पालथून पाहिली. ती सुरी तीक्ष्ण होती पण तिच्यावर रक्ताचा डाग कोणासच दिसेना.

म्हणून मी ती जशीच्या तशी ठेवली. पण खुंटीच्या अडकविलेल्या तारेच्या आंकड्यांत सुरीच्या आच्छादनाचा आकडा मला अडकवितां येईना. त्यावरून मला सुचलें की गंगारामालादेखिल असेंच झालें असलें पाहिजे. तर मग कस्तुरनें त्याला माझ्याकडे पाठविण्यास घाई करावयास सांगितलें असता गंगारामानें ही सुरी कशी तरी ठेवून घाईनें पळत सुटावयाचें तें सोडून तो स्वस्थपणें सुरी तारेच्या आंकड्यांत गुंतवीत कसा व कां राहिला ? सुरी घाईघाईनें चटकन् अडकवितां येणें शक्यच नव्हतें; आणि कान्स्टेबलनें सांगितलें होतें

कीं गंगाराम घाईघाईनें दरवाजाच्या बाहेर पडला ह्मणून ! इथें पाणी मुरत आहे असें मला वाटलें.

छे ! गंगारामच खोटें बोलत आहे असें माझें मन मला सांगूं लागलें. ही सुरी त्यानें घेतली होती हें तो स्वतःच कबूल करीत आहे आणि डॉक्टरना जो शस्त्रांचा अनुभव असतो त्या अनुभवानें मला तर निःसंशय वाटत होतें की बाबासाहेबाची जखम असल्याच—किंवा ह्याच शस्त्रानें झाली होती.

खुनी इसमाला पकडण्याकरिता गंगाराम त्याच्या मागून धांवला ही गोष्ट मला व त्याचप्रमाणें इन्स्पेक्टरलाहि बनावट वाटली. त्यावर आमचा विश्वास बसेना.

लवकर जाऊन टेलिफोन करावयास मी उतावीळ झालो होतों. टेलिफोन कोणाला ! माझ्या मित्राला—संजीवनाला मी झटपट निघून येण्याला सांगणार होतों. त्याला रहस्यें उकलण्याचा नाद फार; आणि हें रहस्य जर उकलणें शक्य असेल तर तें त्याच्याच—फक्त त्याच्याच हातून उकलणार असा मला पक्का भरंवसा.



## प्रकरण ८ वें.

### संजीवनानें मनावर घेतलें !

आतांपर्यंत मला हवा तसा भरपूर एकांत मिळाला नव्हता; त्यामुळे ज्या ठिकाणी बाबासाहेबाच्या बिछान्यापाशी खुनी इसम उभा राहिला होता तेथें सांपडलेली ती वस्तु पुन्हा लक्षपूर्वक पाहावयास मला अवसर सापडेना. उजाडताच आणखी दोन डिटेक्टिव आले. सर्व कच्ची हकीगत त्यांनीं टिपून घेतली, अर्धवट उघडी राहिलेली खिडकी पाहिली, त्यावरून स्वतःची काही मतें त्यानी लिहून काढलीं आणि ती सुरीहि तपासून पाहिली.

जवळच्याच एका मैत्रिणीच्या घरीं अंबूताईला घेऊन कस्तुर गेली. नर्सला व सखू सैपाकिणीलाहि तिनें बरोबर घेतलें होतें. बाबासाहेबाच्या घरात पोलीसांचें ठाणें बसले आणि बाबासाहेबाच्या मृत्यूची बातमी हा हा ह्मणता आसपास पसरली. समोरून जाणारा प्रत्येक इसम त्या घराकडे पाही; तेव्हा त्यास एकादा कॉन्स्टबल त्या घरांत शिरतांना अगर दारातून बाहेर पडतांना दिसे, तेव्हां तो विस्मयानें त्याच्याकडे बघीत बघीत पुढे पाऊल टाकी. संजीवन ताबडतोब निघून येईल अशी माझी अटकळ होती, पण त्यालाहि विलंब होऊं लागला. आतांपर्यंत अत्यंत गूढ रहस्ये त्याला जीं काय सांपडली असतील त्यातच याचीहि गणना करता आली असती. गुन्ह्याचा सुगावा लावण्यात त्याचा हातखंडा होता; आणि पोलीसाना त्याच्या मदतीची अपेक्षा करण्याची आतां संवयच पडून गेली होती.

नऊ वाजल्यानंतर मोठ्या घाईनें तो आला. आंत शिरल्याबरोबर इन्स्पेक्टर त्याच्या दृष्टीला पडले; त्यांना त्यानें नेहमीच्या उल्हसित स्वरानें हांक मारली ती मला ऐकूं आली.

“ कसं काय इन्सपेक्टरसाहेब ! काय हकीगत आहे ? मोहननें मला आतां टेलिफोन दिला. ”

“ खुनाची केस आहे ! ” इन्स्पेक्टरसाहेब म्हाणले. डॉक्टर तुम्हाला इथेंच वरच्या मजल्यावर सांपडतील. ते सर्व हकीगत तुम्हांला सांगतील. केस मोठी बिकट बुवा—फारच बिकट ! ”

" संजीवन ! तूं आलास काय ? " मी वरूनच म्हटलें. " इकडे वर ये बघू!"

दोन दोन पायऱ्यांवरून उडया मारीतच तो दम लागेपर्यंत चढत वर आला व माझा हात पकडून म्हणाला—" कोणाचा खून ? "

" बाबासाहेबांचा ! "

" अँ ? " तो स्तिमित झाला.

" सर्वच विचित्र, " मी म्हटलें " तीन वाजल्यावर मला बोलावणें पाठविले आणि लगबगीनेच मी इथें आलों. बिचारे बाबासाहेब मृत्युवश झाले होते "

" थांब ! मला बघून येऊं दे हं ! " असें म्हणून संजीवन तडक तिकडे निघाला. गूढ रहस्यांचा तळ गाठण्याची त्याची स्वताची स्वतंत्र पद्धति होती. तो पोलीसाना व गुप्त पोलीसांना मदत करी हें खरें; पण तो स्वतः स्वतंत्रपणेच गुन्ह्यांचा शोध लावी. कोणालाहि दुसऱ्याला आपल्या मदतीला घेत नसे. त्याची चलाखी—त्याची हातोटी कांहीं निराळीच होती. जातां जातां मी त्याला सर्व हकीगत त्रोटकपणें सांगितली.

संजीवन खोलींत गेला आणि जेथें मी उभा राहिलों होतों तेथेंच अचूक उभा राहिला. खुनीहि तेथेंच उभा राहिला होता. नंतर त्यानें हातात हात घालून ताठ उभा राहून मृताकडे पुष्कळ वेळपर्यंत सारखी नजर रोंखली !

तदनंतर त्यानें मृताच्या छातीवरील जखम पाहिली, मी स्तब्धपणें त्याच्या शेजारीच उभा होतों. तो अकस्मात् काड्कन् उठून उभा राहिला आणि त्यानें बिछाना व दरवाजा यामधील अंतर आपल्या पावलांनीं मोजलें. नंतर खिडकीकडे जाऊन त्यानें तींतून बाहेर पाहिलें. ती खोलीहि त्यानें सर्व आपल्या तीक्ष्ण नजरेनें तपासली. तिथे असेपर्यंत त्याने तोंडावाटे एक चकार शब्दहि उच्चारला नाहीं. जलदीनें परंतु पूर्ण लक्ष देऊन त्याने सर्व कांहीं तपासलें आणि शेवटीं दरवाजाचीं दोन्हीं दारें सावकाश उघडलीं आणि तितक्याच सावकाशपणे झांकलीं. सावकाशपणें झांकीत असता दारें करकरूं लागलीं !

गंगू मोलकरणीला ऐकुं आलेला वहाणांचा करकर आवाज तो हाच होता. दार करकरें आहे असें खुनीला आढळून येतांच तो तें हळहळू जपून बंद करूं लागला; त्यामुळें राहून राहून द्वाराचा कर्रर्रर्र असा आवाज होत होता. गंगूला

तें वहाणांचें, जोड्याचे अगर स्लिपरचे करकरणें असावें असें वाटलें. परंतु पहिल्याच झपाट्य सरशीं संजीवनानें आपल्या शोधकबुद्धीने आह्मांला सर्वांला अडून राहिलेला एक प्रश्न तर सोडवलाच.

संजीवनानें खोली सर्व तपासल्यावर त्यानें मृताचे शरीर पूर्ववत् झांकून ठेविलें. नंतर मी त्याला गंगू मोलकरणीची जबानी सांगितली.

संजीवनाला ते ऐकून हंसूच कोसळलें. कोणता खुनी माणूस अशा वेळीं पायांत करकऱ्या वहाणा घालील ? दरवाजाच तो. पण गंमत अशी आहे कीं उघडतांना तो वाजत नाहीं; झांकतांना मात्र करकरतो. परंतु घरांतलीं माणसें जागीं होईतों दरवाजाची करकर त्यानें सुरू ठेवावी ही गोष्ट मात्र लक्ष्यांत ठवण्यासारखी आहे. खुनी कांही दुधखुळा नाही. त्याचा यांत देखिल थोडातरी विशिष्ट हेतु होता. ”

“बरोबर, तें त्यानें तसे मुद्दामच केलें असले पाहिजे,” “मी ह्मटलें. आणि तेंच कारण काय त जर आपणास कळेल तर खुनी माणूस कोण हें ठरवावयाला देखिल बरेंच सोपे होईल.”

“ खरें आहे ! ” त्यानें विचार करीत ह्मटलें “ पण मोहन ! मला एका गोष्टीचें भारीच आश्चर्य वाटतें. ती ही कीं तुला परवांपर्यंत जी भीति वाटत होती व जी तूं मला बोलूनहि दाखविलीस ती शेवटी खरी ठरली. तेव्हा ही जी भीतीची—पुढें येणाऱ्या संकटाच्या भीतीची प्रवृत्ति तुझ्या मनाला झाली त्याला काय कारणें झालीं हें तूं आपल्या मनाशीं विचारून बघ. असें केल्यासहि बराच उलगडा होईलसे वाटते. ”

“ अरे ! पण मनाला किती वेळ विचारावयाचे ? माझ्या मनाने प्रथमपासूनच या बाबतीत मूकता स्वीकारली आहे. आतां एक मात्र गोष्ट मला आठवली ती तुला सांगतों; कालच दुपारीं डॉक्टर नियोगीनीं बाबासाहेबांबद्दल बोलावयास सुरवात केली; तेव्हां त्यांनी त्यांचा नामोच्चार केल्याबरोबर माझ्या अंतःकरणांत खळबळ उडाली. याचा मेळ कसा घालावा तें मला कळत नाहीं. असें झालें खरें ! आमचा पेशंट ह्मणून व त्यांला मी वारंवार औषधपाणी करीत होतों ह्मणून असें व्हावें हेंहि संभवनीय दिसत नाहीं. ”

" तुलाच—तुझ्याच मनाला–बाबासाहेबांच्या भावी संकटाचीं चिन्हें प्रथम प्रतीत व्हावी हें एक मोठें आश्चर्य वाटतें मला. "

" विपरीतच ! मला देखिल विपरीतच वाटते ! "

" त्या दोघी कुठे आहेत ? "

अबुताई रात्रीं घरांत नव्हत्या. त्यांना, कशा, कोणी, केव्हां आणल्या व पुढे त्यांची कशी स्थिति झाली वगैरे इतिहास मी त्यास निवेदन केला. माझें बोलणें चालू असतां तो तें ऐकत होता पण त्याचें मन खोल विचारांत गढलें होतें.

" तर मग तिला आपल्या नवऱ्याचा खून झाला हें अद्याप कळलें नाहीं ? भीकपणानेंच एकाएकी वारला अशी तिची समजूत आहे ! "

" हो तसेंच "

मी त्याला घडलेली सर्व हकीगत कळविली. त्याच्याहि विचारांची दिशा माझ्या कलाप्रमाणेंच होती. आम्हां दोघांलाहि अंबुताईची करुणा आली. संजीवनाला अबुताईची माहिती होती. कारण माझ्याबरोबर तो बाबासाहेबांच्या घरी पुष्कळ वेळा आला होता. त्याचा ज्यांत पूर्वी संबंध आला होता अशी गूढ रहस्याच्या कित्येक चटकदार गोष्टी सांगून तो मनरंजन करणारा असल्यामुळें त्याशीं बोलणें कोणालाहि आवडे. असल्या गोष्टी ऐकणें विशेषेकरून बायकांना फार प्रिय वाटतें. अंबुताई व कस्तुर दोघीहि त्याच्या गोष्टी आतुरतने ऐकत असत.

इन्स्पेक्टरसाहेबांनीं येऊन नंतर संजीवनाला गगारामानें दिलेल्या कबुलीची हकीगत सांगितली. ती ऐकल्यावर संजीवनाला कांहीं सुचले.

" मूळपासूनच त्या गंगारामाचा मला तिरस्कार वाटतो. " माझ्याकडे वळून सजीवन म्हणाला. " बाबासाहेबांचा तो हेर होता; आणि दिवाणखान्यापासून तों स्वयंपाकघरापर्यंत घडणारी बारीकसारीक गोष्ट देखिल तो बाबासाहेबांना सांगत असे. "

इन्स्पेक्टरनें सैपाकघरांतील उघड्या दरवाजाची व गंगारामाच्या धाडसाची गोष्ट संजीवनाला सांगितली. ती ऐकून त्याला पूर्वीसारखेच हंसू आलें.

" अगदी बनावट गोष्ट: सब झूट ! " सजीवन म्हणाला. " अशा स्थितींत खुनाला खून पाडावयास असा कुठलाहि नोकर धांवणार नाहीं. "

" कोणीहि धांवणार नाही, " डिटेक्टिव म्हणाला. " आतांपर्यंतच्या तपासावरून पाहतां मला त्या गगारामाचाच वहीम येत आहे. परंतु बाहेर जाण्याची संधि त्याला दोनदां मिळाल्यामुळे पूर्व तयारी करण्याची त्याला चागलीच सवड मिळाली. "

" तो मोठा धूर्तहि दिसतो. " मी म्हटलें " पळून न जातां हजर राहून धीरानें तोंड देण्यातच शाहणपणा आहे असें त्यानें ठरविलें आहे जर आगाऊच सर्वच बेत ठरविला असेल तर कार्यक्रम मात्र चोरानी उत्तम रीतीनें पार पाडला यात शंका नाहीं. "

" आगाऊ बेत ठरलाच असला पाहिजे " इन्स्पेक्टरनीं आणलेली सुरी तपासीत असतां सजीवन म्हणाला. " मोहन, ही सुरी मायक्रॉसस्कोप मधून पाहा बरें ! ती धुवूनपुसून लख्ख केलेली दिसत आहे; तरी वर एकादा रक्ताचा डाग असल्यास बघा. "

" सुरी धुवूनपुसून आपण लख्ख केली असें गंगाराम सांगतच आहे. पण ती तीन दिवसापूर्वी. " मी सागितले.

ते ऐकून त्याने सुरी जेथल्या तेथे ठेविली. मात्र माझ्या उत्तराने त्याचें समाधान झाले नाही. त्याला जास्तच संशय आला.

वहिमी गंगारामाशिवाय बाकी सर्व नोकरचाकरांस पोलीसांनीं आपल्या धनिनीबरोबर जावयास परवानगी दिली. मात्र झालेल्या हकीगतीतील एक अवाक्षरहि बाहेर न पडू देण्याविषयी त्या सर्वांस इन्स्पेक्टरनी बजाविलें. कोर्टांत पुढें त्या सर्वांच्या साक्षी व्हावयाचा होत्या; तोपर्यंत खरी बातमी कांहीएक बाहेर फुटू न देण्याची खबरदारी घेणे जरूरीचे होते. अशा नोकरमाणसाच्या जिभा हालल्यामुळेच पुष्कळ वेळां चोर सुटून साव पकडले जातात आणि पोलीसाच्या कामांत व्यत्यय येतो.

गुन्ह्याचा तपास लावण्याच्या कामात संजीवनचें डोकें विलक्षण चाले. संजीवन एका खुर्चीवर बसला आणि त्यानें ह्या केसमध्यें केलेल्या तपासासंबंधी मजकु-

रानें अजमासें तीन नोट पेपर पाठपोट भरले. त्याची पेन्सिल झरझर चालत होती, व तिकडेच माझी नजर वेधली. त्या वेळीं लिहीत असतां कांहीं शब्दांच्या खालीं त्यानें खुणा केल्या होत्या.

" इन्स्पेक्टरला गंगारामाचा संशय आलेला दिसतो, " सुमारें पंधरा मिनिटांनीं संजीवनानें वर मान करून मला म्हटलें. " मी गंगारामाबरोबर मुद्दामच गप्पागोष्टी करून पाहिलें, त्यासें वर्तन संशय घेण्यासारखें दिसत नाहीं. आता दुसऱ्या एका ऑफिसराबरोबर तो बाबासाहेबांच्या खोलींत जाऊन त्यांना कांहीं माहिती देत होता. इन्स्पेक्टरसाहेब व डिटक्टिव यांच्याबरोबरहि तो आपल्या धन्याच्या खोलीत गेला होता. आणि खुनी इसम तर ज्याचा तो खून करतो त्याच्या प्रेतासमोर जाण्यास पुन्हा धजत नाहीं. "

" बरं, आतां सगळया गोष्टी तुझ्या ध्यानांत आल्याच आहेत, " कांही वेळ थांबून मी विचारलें, " पुढें शोध करण्यास कांहीं मार्ग तुला दिसत आहे काय ? "

संजीवन मिशीचें टोंक पिळवटीत होता. डाव्या हाताच्या करांगलींतील आंगठी फिरवीत तो म्हणाला—

" नाहींरे मोहन ! मला झटकन् उलगडा होत नाहीं. आम्हीं इतकी उलथापालथ केली खरी पण ती फुकट ! आम्हीं कुठें तरी चुकतों आहों. आमचा शोध योग्य मार्गानें झालेला नाहीं. वेळ मात्र गमावला. पण योग्य मार्ग कोणता असावा तेंहि माझ्या ध्यानांत येत नाहीं. आमची दिशा चुकत आहे एवढें मी खात्रीनें सांगूं शकतों. "

"तें सर्व राहूं द्या; आधीं मला तूं इतकें सांग पाहूं. खुनी इसम घरांतीलच कुणी असावें असा तुझा तर्क वाहतो काय ? "

" इथेंच मी घोंटाळतों आहें. इन्स्पेक्टरला गंगारामाचा संशय येतो. परंतु पुष्कळ वेळां एखाद्याचा वहीम घेण्यांत पोलीसांचा उतावळेपणा होतो. त्याच्यावर आरोप ठेवण्यापूर्वी त्याच्या हालचालीवर व वर्तणुकीवर बारीक नजर ठेवली पाहिजे तो खरोखरच गुन्हेगार असला तर समजल्याशिवाय राहणार नाहीं. तो सुरा दुसऱ्यांदा घेण्यांत इन्स्पेक्टरनें मोठी चूक केली. कारण त्यामुळें स्वतःचें

कसें रक्षण करावयास काय युक्ति योजावी हें ठरविल्यास तो तितका अधिक सावध झाला. पोलीस तपास निरुपयोगी ठरतो तो अशाच धोरणाच्या अभावामुळें. ठराविक पद्धति जी माहिती असेल त्याप्रमाणें आपल्या झडत्या घेत सुटायचें ! नोटबुकें उघडून नांवें नोंदायची, टिपणें करायचीं; एवढें यांना माहीत ! जी खिडकी उघडी राहिली, उघडी राहिली म्हणून हे सारखे मारे सकाळपासून ओरडताहेत, ती उघडी राहिली नसून कुणितरी मुद्दाम उघडी ठेविली होती !"

" हूं " एवढेंच मी केलें. माझ्या तोंडाकडेच त्याची नजर बोलत असतांना लागली होती.

" हूं काय ? तुला कसें वाटतें ? मी म्हणतों हें बरोबर आहे काय ?"

" खुनी त्या खिडकींतून उतरला आणि पुन्हां त्याच खिडकीवाटे गेला असेंच ना तुझें म्हणणें ? "

" माझें म्हणणें असें कीं ज्याचा आतां वहीम येत आहे, त्यानें स्वतः जरी खून केला नसला तरी खुनीला उतरून पुन्हां जाऊं देण्याच्या बाबतींत घरांतल्या कुणीतरी काणाडोळा करून खुनीला प्रत्यक्षपणें मदत तरी केलीच आहे ! "

संजीवनाचें म्हणणें खरें होतें. ज्या खोलींत ही खिडकी होती ती दिवाणखान्याला लागूनच असून मध्यें मध्यतरी फक्त कांचेचा दरवाजा होता व दरवाजाहि नेहमीं बंद केलेला नसे. शिवाय खिडकीची रचना देखिल अशीच होती कीं त्यांतून चोराला आंत येणें कांहीं अशक्य नव्हतें.

तेव्हा संजीवनचें म्हणण्यांत पुष्कळ तथ्य होतें. आणि सैपाकिणानें इथें झोंपावयास जाण्यापूर्वी आपण स्वतः सर्व दरवाजे बंद केले म्हणून ठांसून सांगितलें होतें; त्या अर्थी संजीवनचें म्हणणेंच खरें होतें ! सैपाकीण दरवाजे बंद करून आपल्या जागीं जाऊन झोंपल्यानंतर कोणी तरी रांगत हळूहळू जाऊन खिडकी उघडी टाकली असावी व अशा रीतीनें खुनीस आंत घेतलें असावें.

एखाद्या केसमध्यें एकदां डोकें घातल्यानंतर मग संजीवन कुठला रिकामा बसावयाला ? थोड्याच दिवसांपूर्वी त्यानें एक अत्यंत रहस्यमय गूढ केस गुंथागुंथीची असूनहि सोडविली होती व लौकिक मिळविला होता. पोलीस वगैरे सर्व त्याच्याच सल्ल्यानें वागत. एरवीं तो निष्काळजी असा असे. त्याचा एक

चष्मा होता. जेव्हां तो कामांत गढलेला असे तेव्हांच तो तो चष्मा चढवी आतां त्यानें खिशांतून काढून तो नाकाच्या नागोशीवर चढवून दिल्यामुळे मला आनंद झाला. कारण आतां संजीवन ह्या केसचा छडा लावल्याशिवाय सोडीत नाहीं हें मी ओळखलें.

" जरा थांब हं." बोटातील आंगठी फिरवीत फिरवीत तो ह्मणाला. "मला कांहीं नवीनच सुचलें आहे. पांच मिनिटें मी वर जातो. " असे मला ह्मणून तो जिना चढून वर गेला.

तो निघून गेल्यावर मला खिशांतील ती वस्तू पुन्हा एकवार चांगली निरखून पाहावयास संधि मिळाली. जवळच्या खिडकीकडे जाऊन मी ती वस्तु बाहेर काढून पाहिली. मी आश्चर्यानें मूढच झालों.

ती वस्तु भयंकर नव्हती. काश्मीरच्या पांढऱ्या शालीचा तो एक अर्धा इंच लांब लहानसा तुकडा होता. तरी पण माझ्या हातावर मी पाहत असतां माझा थरकाप झाला! कारण कस्तुरनें जी शाल पांघरली होती ती बरीच वापरलेली होती आणि त्याच शालीच्या कांठाकडचा तो तुकडा असून त्याला रक्ताचा डाग लागला होता !

पोलीस कोणाचा वहीम घेतात हें जाणून घेण्याची उत्सुकता, घाबरलेली मुद्रा शोधाअंतीं काय ठरलें हें विचारून घेण्याची उत्कंठा, यांचा आतां मला उलगडा झाला. जर कोणी स्त्री गुन्हेगार असली तर ती कस्तुरच असली पाहिजे अशी माझी खात्री झाली ! पण माझी कस्तुर दोषी आहे हें मी संजीवनाला तो तुकडा दाखवून सुचवावें कसें बरें ?



## प्रकरण ९ वें.

### संजीवनची संदिग्धता !

मी समजून चुकलों कीं माझी प्रेमदेवता—माझी कस्तुर दोषी आहे. मला मिळाली तेवढी माहिती व ती खुणा संजीवनच्या स्वाधीन मी करतो तर तेवढयावरून त्याने लागलीच सगळया गोष्टींचा तेव्हांच उलगडा केला असता. कस्तुरच्या खांद्यावरून हात फिरवून मी त्या शालीचें सूत आणि वीण पाहून घेतली होती आणि म्हणूनच माझी खात्री पटली की हा तुकडा देखिल त्याच जीर्ण परंतु उंची शालीचा होता. कदाचित् शालीचा फाटक्या कांठाकडचा भाग पायांच्या टांचे खाली सांपडून लगबगीनें उठतानां अगर बसतानां त्याचा हा तुकडा उडालेला असावा. कसेंहि असलें तरी त्याच शालीचा हा तुकडा मृताच्या प्रेताशेजारी पडला आणि तेथेंच रक्ताने माखला होता.

त्या रात्रीं कस्तुर आपल्या बहिणीची तरफदारी करीत होती तेंहि मला आठवलें. एकदा एखाद्याविषयीं वृत्ति संशयित झाली कीं त्याला बळकटी आणावयास हवें तितके आधार मिळत जातात. त्या वेळीं मला तिच्या बोलण्याचें कांहीं विशेषसें वाटलें नव्हतें; पण आतां मात्र ती तरफदारी कां करीत होती याचें उत्तर मला निराळेंच असावेंसें वाटलें. शिवाय डॉक्टर नियोगी यांनी एकवार मला म्हटलें होते कीं कस्तुरच्या पूर्व चरित्रांत कांहीं किळसवाणें गुपित आहे तेंहि शब्द मला याच वेळीं आठवले.

माझी नजर त्या तुकडयावरच खिळून राहिली. माझ्या मनांत कोणत्या विचारानीं काहूर उठविलें होतें त्याची कल्पनाच केली पाहिजे; शब्दांनीं व्यक्त करणें कठीण आहे. जिला मी अप्सरा, देवांगनेप्रमाणें रूपवती नव्हे स्वर्गीय-देवताच समजत होतों ती खुनशी राक्षसी ठरली ! हाय हाय ! माझ्या आशेचा चुराडाच होणार तर !

ज्या दिवशीं माणसाची आशा सुटेल त्या दिवशीं तो जगांत राहूंच इच्छिणार नाहीं. जीवितच मुळीं आशामय आहे. दारुण निराशेतहि आशेचा तंतु

असतो, तो नसेल तर मनुष्य आयुष्याचा अंत करून घेईल—आत्महत्या करील. कस्तुर खुनी हा विचारच मला सहन होईना. झोंपण्याच्या वेळीं माझी प्रेमळ कस्तुर आपल्या बहिणीच्या नवऱ्याची प्रकृति पाहावयास गेली असेल त्या वेळीं त्या शालीचा तुकडा, हिसका बसून पडला असेल ! असा मला आशेनें एक विचार सुचविला. पण प्रत्यक्ष पुरावा निराळाच होता कारण तिनें स्वतःच मला झोंपते वेळीं आपण बाबासाहेबांकडे वर गेलों नव्हतों असें सांगितलें होतें. नर्सनें तिला त्यांना झोंप लागली आहे असे कळविल्यावरून ती वर गेलीच नव्हती.

तरी माझें मन स्वस्थ बसेना. मनाला जी वस्तु अथवा जी व्यक्ति आवडते तिच्या चांगुलपणाच्या गोष्टी त्याला पटतात. तिच्या वाईटपणाच्या गोष्टीवर त्याचा विश्वास बसणार नाहीं. त्या खोट्या आहेत असें सिद्ध करावयास तें वाटेल तितकी धडपड करील. माझ्या मनानें मला सुचविलें कीं, कदाचित् गंगारामानें बाबासाहेबांची हकीगत कळविल्यानंतर ती घाबऱ्या घाबऱ्या त्या खोलींत शिरली असेल. परंतु चौकशी अंतीं प्रत्येक नोकराकडून मला समजलें कीं त्यानंतर कस्तुर मुळीं मृताच्या खोलींत गेलीच नव्हती; दरवाजापर्यंत येऊन फक्त तिनें आंत दृष्टि फेंकली होती तेवढीच. त्यानंतर ती घाबरून तेथून निघाली ती त्या बाजूला म्हणून पुन्हा फिरकली नाहीं. त्या खोलींत आपणास जावयास भय वाटतें असें ती स्वतः म्हणत होती. त्या खोलींत तिनें पुन्हा पाऊल टाकलें नाहीं. या सर्व हकीगतीवरून तिच्याविषयीं आलेली शंका माझ्या मनांत दृढ होऊन बसली. कारण झोंपण्यापूर्वी ती त्या खोलींत शिरली नाहीं. बाबासाहे-बांच्या मृत्यूनंतरहि ती त्या खोलींत शिरली नाहीं; आणि तिच्या अंगावरच्या शालीचा तुकडा मात्र मृताच्या शेजारीं रक्तानें माखलेला पडतो. तो तर माझ्या नजरेसमोर प्रत्यक्ष मी पाहात आहे. यावरून कोणास नकळत अशी मधल्याच वेळीं सर्व जणें निजलीं असतांना आंत ती शिरली असली पाहिजे हें उघड होतें. आणि खुनी इसम मग दुसरीकडे शोधावयाचा !

आतां मी मिळविलेली माहिती, माझ्या जवळची वस्तु आणि मी काढ-लेलीं अनुमानें हें सर्व साहित्य संजीवनाच्या हवालीं करून त्याचा मार्ग सुगम

असें मला पूर्वी वाटत होतें. परंतु आतां तिचा शोक मात्र ओढून ताणून आणलेला नव्हता. नवऱ्याच्या मृत्यूचे तिला खरोखरीच दुःख झाले. पण तरी देखिल हें आश्चर्यच नव्हे काय ?

अंबुताई झटक्यासरशीं बोलल्या आणि नंतर उठून बाजूस जाऊन स्वतः-शींच गुंगत बसल्या. तिच्याचबद्दल मी व कस्तुर बोलत राहिलों. बोलतां बोलतां कस्तुरनें विचारलें—

" नर्सनें मला आतां सांगितलं कीं तपासांत तुमचे मित्र ते संजीवनराव-देखिल मदत करीत आहेत, खरं काय ? "

" होय, " मी म्हटलें. " मदत अशी नव्हे, तो स्वतंत्रपणेंच स्वतः शोध करीत आहे. "

" त्यांचं काय म्हणणं पडलं ? " तिनें लगेंच विचारलें.

" त्याला सुद्धां अद्याप निश्चितपणें कांहींच म्हणतां येत नाहीं. " हें माझें उत्तर ऐकून मोकळेपणा वाटल्यासारखें करून तिनें आवरून धरिलेला श्वास सोडला. तिनें संजीवनचें नांव घेतलें तें देखिल अशा तऱ्हेनें कीं त्यावरून तिचा त्याच्याविषयीं प्रतिकूल ग्रह झाला होता असें मला दिसलें. तो खरें तत्व शोधून काढील कीं काय. अशा भीतीनें भरल्यासारखेंच तिचें एकंदर बोलणें दिसलें.

अर्ध्या तासानंतर मी तेथून निघालों आणि पूर्वस्थलीं आलों. एकदां मला वाटे कीं कस्तुरचेंच हें दुष्ट कृत्य असावें. पण पुन्हा या विचारास भरपूर ममास पटेसा पुरावा मिळत नव्हता. कारण बाबासाहेबांना मारून कस्तुरला काय साधावयाचे होतें ? दुसऱ्यांदा वाटे कीं वरून दिसण्यांत जरी गंगाराम निरप-राधीसा दिसतो आहे तरी त्याच काफरानें हें काम केलें आहे.

दुसऱ्या दिवशीं अकरा वाजतां मृताच्या प्रेतावरून त्याच्या मृत्यूची छाननी करावयाचें ठरलें होतें. तेव्हां पोस्ट—मॉर्टेम करावयास पोलीस सर्जनला मी मदत करूं लागलों.

आम्हीं प्रेताची सर्व तपासणी केली. खुनाची एकंदर स्थितीच अशी होती कीं कशास कांहीं मेळ बसत नव्हता. पण त्याच्याहि पेक्षां अत्यंत आश्चर्य हें कीं

खून कोणत्या प्रकारच्या हत्याराने केला असावा याबद्दल पुन्हा शंका उपस्थित होऊन कशाचाच थांग लागेना !

वरवर पाहतां जखम साधीच दिसत होती. तिची लांबी एक इंच असून आघात डावीकडून उजवीकडे झाला होता. चवथ्या आणि पांचव्या बरगडीच्या मध्यंतरीं कसलें तें शस्त्र भोंसकलें होतें आणि त्यामुळें आंतील काळजाचे दोन भाग झाले होते ! आंतील दुखापतींची तपासणी करीतां हें गूढ शतपटीनें वाढलें ! कारण वरून तरी तें शस्त्र एकच ठिकाणीं घुसलें होतें तरी आंतून त्याच्या टोकाचें दोन वार झाले होते व त्यामुळें काळजाचे दोन तुकडे होऊन ते थोड्याशाच आधारानें एकमेकांपासून अलग व्हावयाचे राहिले होते. अशा दुखापतींचें स्पष्टीकरण करतां येणें कठीण होतें. कारण तें शस्त्र बरोबर अचूक छातींत खुपसलें जाऊन त्यापासून आंतील दुखापत बाहेरील वाराच्या आठ पट म्हणजे जवळ जवळ आठ इंच झाली होती ! आणि इतकें असूनहि त्या एक इंच वारापासूनच तें शस्त्र बाहेर काढण्यांत आलें होतें !

आम्ही त्या कूटाचा खल करीत डॉक्टर नियोगींची वाट पाहात होतों. गंगाराम जी सुरी म्हणत होता ती मी पोलीस सर्जनला दाखवून पुन्हा तपासून पाहिली तों अशा प्रकारची बाहेरची जखम त्या सुरीनें करतां येईल असेंच त्यांचेंहि मत पडलें. परंतु बाहेरील जखम सफाईदार केलेली असून आंतील दुखापत अनेक वारांनीं चिरलेली होती ! त्यावरून आम्हास त्याच सुरीचा उपयोग करण्यांत आला होता कीं काय याबद्दल शंका उपस्थित झाली. कारण ती काबुली सुरी तर दुधारी होती. याचें निराकरण करण्यास ती सुरी मायक्रास्कोप मधून पाहणेंच अवश्य होतें. कारण त्या लेन्समधून मनुष्याच्या रक्ताचे डाग दिसल्याशिवाय राहत नाहीत.

अशा प्रकारचे आमचे शोध चालले आहेत तोंच दरवाजा उघडला जाऊन डॉक्टर नियोगींनीं आंत प्रवेश केला.

आपल्या मित्राच्या प्रेतावर त्यांनीं एकवार नजर घातली आणि नंतर एक श्वास सोडून त्यांनीं माझा हात धरला व म्हणाले:

"ॲड्व्होकेट्मध्यें आतांच मी हकीगत वाचीली," कांपऱ्या आवाजांत ते म्हणाले. "हें एक विलक्षण प्रकरण होऊन बसलें !"

" आह्मीं आतांच पोष्ट मॉर्टेम् केलें. काय हा विचित्र प्रसंग !" मी ह्मणालों; आणि नंतर] मी सुविख्यात डॉक्टर नियोगींची पोलीस सर्जनला ओळख करून दिली.

डॉक्टरसाहेबांना मी ती जखम दाखविली व सर्व माहिती समजावून देऊन त्यांचें मत विचारलें. त्यांनीं आपला कोट काढून ठेवला, शर्टचे कफ्स् मागें सारले, चष्मा नीटपणें ठेवला आणि लक्षपूर्वक बा िक तपासणी केली.

" अरे बाप ! भारीच विचित्र ही जखम ! " ते उद्गारले. "माझ्या जन्मांत मी असली जखम पाहिली नव्हती. बाहेरून वार दिसला नसला तर ही स्फोटक द्रव्यांची गोळीच छातींत घुसून तिचा आंत स्फोट झाला असावा असें कोणा-सहि वाटलें असतें ? बरगडशांना वार लागला आहे. असलें हें शस्त्र तरी कोणत्या प्रकारचें ! "

" आह्माला कांहींच उमगत नाहीं " पोलीस सर्जननी उत्तर दिलें. मी आज इतकीं वर्षे प्रॅक्टिस करतों आहें आा े तत्पूर्वी सैन्यांत आर्मीसर्जन होतों, पण हें असलं मी आजच पाहातों आहें !"

" माझ्या बाप जन्मांत मी असली दुखापत बघितली नाहीं ! " नियोगी पुन्हा ह्मणाले.

" याच्यापासून तसली जखम करतां येईल काय ? " ती काबुली सुरी दाख-वून मी नियोगींना विचारलें.

ती सुरी त्यांनीं बारकाईनें पाहिली, जणूं आघात करण्याकरितांच कीं काय अशा प्रकारें उचलून तावडून पाहिली; तिच्या धारेवरून बोट फिरविलें आणि शेवटीं मान हालवून ह्मणाले " उं हुं: मला नाहीं वाटत ! कारण जखम करा-वयास वापरलेलें शस्त्र एका धारेचें आहे; आणि ही तर दुधारी सुरी, आहे ! "

त्यांचें ह्मणणें आम्हाला पटलें. आम्हांलाहि असेंच वाटूं लागलें होतेंच; त्याला नियोगींच्या मताचा दुजोरा मिळाला. ती काबुलीसुरी उपयोगांत आणली नव्हती. नंतर डॉ० नियोगींनी जीभ वगैरे तपासून पाहिली पण बाकी-ची ही हकीगत कशाला हवी ? थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे एकंदरींत निकाल असा होता कीं मृताला आणखी एक वर्ष सव्वावर्ष जगतां आलें असतें. इतका

लवकर अंत होण्याइतका तो रोग—प्रबळ झाला नव्हता. इतक्यांत डॉक्टर नियोगींना बोलावणें आल्यामुळें ते सहा वाजतांच निघून गेले. काम निकडीचे असल्यामुळें अंबूताईला भेटावयास मिळतां येत नाहीं म्हणून त्यांनीं दिलगिरी दाखविली. जातां जातां दुसऱ्या दिवशीं पुन्हा येण्याचें त्यांनीं अभिवचन दिलें.

सुमारें आठ वाजतां मीहि बिऱ्हाडी जाऊन जरा हुशहुश करीत बसलों; तर इतक्यांत संजीवनची स्वारी आली ! त्याची मुद्रा उल्लसित नव्हती. नेहमीप्रमाणें "कसं काय मोहनराव ! आज कोणाला मोहनी घातलीत ? यमाचे बंधुराज आपण ! तेव्हां आज कोणाला आपल्या भावाच्या भेटीला पाठविलात ?" अशाहि कांहीं विचित्र कोटया केल्या नाहीत. उलट निमूटपणें आला, टोपी काढून एका टेबलावर फेकली आणि एका आर्मचेअरवर मुकाटयानें बसला.

बराचवेळ गेल्यावर त्यानें विचारलें

"काय बुवा ! चिरूट ओढायला परवानगी आहे ?"

"हो हो ? एकच कां ? बंडलची बंडलें ओढीनास ? पण तूं होतास कुठें ?"

"तुम्ही प्रेताची कापाकापी चिराचिर सुरू करीत असतां मी तुम्हाला सोडून निघालों—तो—तो—आतां अगदीं दमून गेलों आहे."

"बरं तू काय नवीन माहिती मिळविलीस ?"

"काय बाबा ! हें प्रकरण अगदींच विलक्षण ! मला माहिती कसलीच नाहीं मिळाली" असें म्हणून त्यानें चिरूट ओढावयास सुरवात केली.

"बरें, तुला कसें काय वाटतें ?"

"मला कांहीं वाटत नाहीं—तुला काय सुचतें आहे ?"

"ही गुंतागुंत सुटत तर नाहींच, उलट तिला अधिकधिक गांठी बसत चालल्या आहेत" मी म्हटलें.

मी त्याला थोडक्यांत सर्व इतिहास सांगितला व एका एनव्हिलपच्या मागच्या बाजूस खुलाशाकरितां आकृति काढून जखम व आमच्या तपासणीचा निकाल समजावून दिला. त्यानें ती आकृति पाहून त्यावरच तो विचार करीत राहिला. मग म्हणाला—

" हं ! मला असें वाटलेंच होते. गंगाराम आणि दुधारी सुरी यावरून पोलीसांनीं काढलेलीं अनुमानें निरर्थक आहेत. डॉक्टर नियोगींचें मत बरोबर आहे, तो असा तसा मनुष्य नव्हे. त्याने पोलीस इन्स्पेक्टराला चांगलाच चकवला; आणि चकवला तोहि मुद्दामच बरं ! "

" मुद्दामच ? मुद्दामच कां रे ? " मी स्तिमित होऊन विचारलें, कारण हा नवीनच मुद्दा या बाबतींत उत्पन्न होत होता.

" मुद्दाम कां तें आतां सांगितले तर तूं मला हांसशील. मला ज्या शंका येताहेत त्या जर खऱ्या ठरल्या--आणि त्या लवकरच खऱ्या ठरतील--तर मी तुला सर्व कांहीं उघड करून सांगेन. "

" तू तर अधिकच खोलांत शिरूं लागलास ! असं काय आहे तरी हें ? सांगशील कीं नाहीं मला ? "

" मला एव्हां सांगतां येणार नाहीं. रागावूं नको. त्याला कारण आहे कांहीं. " इतकेंच म्हणून त्यानें पुन्हा चिरूट तोंडांत धरून झुरके मारले आणि खोलींत धुराचे लोटच्यालोट पसरून दिले. संजीवनची स्वारी विचारांत गढून गेली होती.



## प्रकरण १० वें.

### वृद्धाला प्रणयपत्रिका !

ह्या केसची हकीगत दैनिक ज्ञानप्रकाशच्या पुरवणींत संक्षिप्त रीतीनें मराठींत व टाइम्समध्यें इंग्रजींत सविस्तर रीतीने येत असे. पोस्ट मॉर्टेमच्या वेळीं आह्मी गोंधळून गेलों होतों. ती सर्व हकीगत त्यांतून लोकांच्या वाचनांत आली होती. त्यामुळें कोरोनरनें सभा भरविली त्या वेळीं बाहेर लोकांची गर्दी जमली होती. गंगारामाची साक्ष सर्वांना अधिक महत्वाची होती. ह्मणून त्यानें जेव्हां, आपण ठराविक वेळेवर लावून ठेवलेल्या घड्याळानें अचूक दोन वाजतां योग्य वेळीं अलार्म देऊन आपणास कसें उठविलें, मग आपण आपल्या धन्याकडे वर कसें गेलों आणि तेथे आपणास काय प्रकार दिसला वगैरे जी हकीगत सांगितली तिकडे सर्वजण-लक्ष देऊन ऐकत होते.

" तिथे गळचेपी अथवा लठ्ठालठ्ठी झाल्याचें कांहींच चिन्ह दिसून आलें नाहीं ? " कोरोनरनें खोंचून विचारलें.

" मुळींच नाहीं. धनीसाहेब एका कुशींवर झोंपले होते; शिवाय नंतर माझ्या दृष्टीस पडला तो रक्ताचा डाग जर नजरेस न पडता तर त्यांना सहजगत्या निजल्यानिजल्याच मरण आलें आहे असेंच मी–मानलें–कोणीहे–समजला असता. "

" आणि मग पुढें काय झालें ? "

" मी हकीगत कळविण्याकरितां खालीं उतरलों–" गंगाराम ह्मणाला आणि मग त्यानें आपण बिजेचा दिवा बटन दाबून कसा लावला, खालीं जाऊन सुरी घेऊन मागीलदारच्या वाटेनें परसांत उडी टाकून कसा पाठलाग केला वगैरे सर्व इतिहास सांगितला.

"परसांत उडी टाकण्याचें प्रयोजन काय पण?" कोरोनरनें खोदून विचारिलें. या वेळीं कोरोनरची दृष्टि गंगारामाच्या चेहऱ्यावर अगदीं खिळून राहिली होती !

" तिथें कोणी तरी दबा धरून राहिलें असेल असें मला वाटलें " किंचित् अडखळल्यासारखें गंगारामानें उत्तर दिले.

ह्या वेळीं अंबुताईमार्फत आलेले सॉलिसिटर उठले व ह्मणाले —" मयताच्या कुटुंबातर्फे मी उभा राहिलों असून साक्षीदारास मला एक सवाल टाकावयाचा आहे. "

" हरकत नाहीं. " कोरोनर ह्मणाला. " परंतु मला वाटतें प्रश्नाची घाई एव्हांशीच धरूं नये, लक्ष्यांत आलें तुमच्या ? "

कोरोनरच्या सूचनेचा अर्थ सॉलिसिटरसाहेबांच्या लक्ष्यांत आला, तेव्हां ते खालीं बसले.

नर्स, गंगू मोलकरीण व सखु सैपाकीण यांच्याहि साक्षी झाल्या. त्यांच्या मागून कस्तुरला बोलावण्यांत आलें.

ती पुढें येतांच तिची व माझी दृष्टादृष्ट झाली. ती फिक्कट आणि अशक्त दिसत होती.

आरंभीं तूं कोण, तुझें नांव काय; बाबासाहेबांशीं तुझा संबंध काय वगैरे जुजबी प्रश्न विचारून झाल्यावर कोरोनर मुद्द्याकडे वळले.

" मयताला तुह्मी अगदीं अखेर जिवंत केव्हां पाहिलंत ? "

" रात्रीं दहा वाजतां. डॉ. नियोगीनीं त्यांना पाहून समाधान व्यक्त केलें. डॉक्टर निघून गेल्यावर मी वर गेलें, तेव्हां नर्स त्यांना औषध देत होती. त्या वेळीं ते बसलेलच होते. "

" त्या वळीं ते नेहमीप्रमाणें खुषीत होते काय ? "

" होय. "

" त्या वेळीं तुमचें दोघांचें कशासंबंधीं बोलणें झालें, तुमची बहीण अंबूताई ह्या त्या वेळीं बाहेर होत्या. तिच्याबद्दल बाबासाहेब तुमच्यापाशीं कांहीं बोलले काय ? "

" होय. ते म्हणाले कीं थोडथोडा पाऊस पडत असल्यामुळें आज जरा हवत गारठा आहे. अशा वेळीं आज ही बाहेर गेली कशाला ? ही आपल्या प्रकृतीची मुळींच काळजी घेत नाहीं. "

कोरोनरनें ही उत्तरें कागदावर लिहून घेतली.

" त्यानंतर तुम्ही बाबासाहेबानां पुन्हा जिवंत पाहिलें नाहीं ? "

" नाहीं. "

" त्यांचा प्राण निघून गेल्यावर तुह्मीं त्यांच्या खोलींत गेलां होतां, असेंच ना ? "

" नाहीं. मला भीतीच वाटली ! " ती अडखळत ह्मणाली. मला " जेव्हां कळलं कीं त्यांच्या छातींत कोणी कांहीं भोंसकून प्राण घेतला तेव्हां भिऊन गेल्ये."

कोरोनरनें पुन्हा लिहून घ्यावयास सुरुवात केली. माझ्याकडे असलेला तो शालीचा तुकडा जर मी या वेळीं हजर केला असता तर सर्व जमलेल्या लोकांना काय बरें वाटलें असतें !

अशा नाजूक प्रकृतीच्या स्त्रीला मृत मनुष्यावर नजर टाकण्यास भीती वाटणें साहाजिक आहे असेंच त्यांना वाटले परंतु जे काय मला ठाऊक होतें तेंच जर त्यांना कळतें तर ही बाई म्हणजे पक्की ढोंगी असून भीतीचा आविर्भाव हा तिनें सर्व वरून आणलेला होता व ती मुळींच खरें बोलत नव्हती अशीच त्यांची खात्री झाली असती. तिचा चेहरा माझ्या नेहमींच्या पाहण्यांतला तर मला देखिल वरून आणलेल्या भीतीच्या व गोंधाळलेल्या वृत्तीचा अचंबा वाटला इतका तो बे-मालूम होता.

" त्यांना चोरांची फार भीती वाटत होती असें म्हणतात ! याबद्दल तुमच्याकडे कधीं कांहीं ते बोलले होते काय ? "

" हो, पुष्कळ वेळां. देशावर असतानां एकदां घरांत चोर शिरून एकानें तर त्यांच्यावर पिस्तूल दिखिल रोखलें होतें म्हणून ते सांगत; पण त्या वेळीं ते बचावले. त्यापासूनच त्यांना अधिक भीति वाटत असावी; कारण त्यानंतर ते आपल्या निजावयाच्या खोलींत नेहमीं एक कसलें तरी शस्त्र तयार ठेवीत; आणि

शिवाय त्यांच्या खोलींत विजेच्या कळीहि—म्हणजे घंटेच्या व आलार्म वगैरे वाजवयाच्या—तयार असत. ”

“ परंतु त्या वाजत असल्यामुळें त्यांचा उपयोग होत नसावासें वाटतें ?” कोरोनरनें विचारलें.

“ होय. त्या बिघडल्या होत्या, असें गंगाराम वगैरे माणसे ह्मणत. सुमारें पंधरा दिवसांपूर्वींपासून त्यांचा उपयोग होईनासा झाला होता. ”

“ खुनी माणसाला ह्या गोष्टीची माहिती असावीशी वाटते. ” कोरोनर ह्मणाला; नंतर त्यानें सॉलिसिटरकडे वळून विचारलें—

“ तुमचा काय प्रश्न विचारावयाचा होता ? ”

परतु सॉलिसिटरनीं नुसता नकारच दर्शविला.

तदनंतर कस्तुर आपल्या जागीं गेली. तिनें माझ्याकडे एकवार पाहिलें. माझ्या मनांतले विचार तिनें ओळखले असतील कीं काय कोण जाणें ? तिच्या त्या नजरेंत मात्र एक प्रकारच्या समाधानाची छटा दृग्गोचर होत होती.

त्या नंतर डॉक्टरी परीक्षकांची साक्ष सुरू झाली. डॉक्टर नियोगी पहिल्यांदा पुढें सरसावले. त्यानीं थोडक्यात मुद्देसूद रीतीनें त्यांच्या रोगाची हकीगत सांगितली. त्या नंतर पोस्टपॉर्टेमची हकीगत व त्या जखमेची—बाहेरच्या व्रणापेक्षां आंतील जखम कशी अधिक मोठी होती वगैरे सर्व माहिती निवेदन केली.

“ हें तर मोठेंच आश्चर्य ” कोरोनर उद्गारला. “ अशा प्रकारची जखम तुह्मी पूर्वी कधीं पाहिली होती काय ? ”

“ कधींच नाहीं. डॉक्टर मोहन व सरकारी डॉक्टर हे दोघेहि माझ्याबरोबर होते. बाहेरच्या दुखापतीनें आंतील जखम मोठी होणें शक्यच नाहीं याबद्दल आमचें एकमत आहे. ”

“ तर मग ती दुखापत झाली कशी ? तुमचें काय ह्मणणें ? ”

“ तें मला समजत नाहीं. ”

उलट तपासणी वगैरे कांहीं झालें नाहीं. डॉक्टर नियोगींनीं आपल्या जबानींत सांगितलें त्याचीच पुनरावृत्ति मी केली. नंतर पोलीस सर्जनाची साक्ष झाल्यावर, कोरोनरनें ज्यूरीला उद्देशून ह्मटलें—

" आतांपर्यंत ऐकलेल्या हकीगतीवरून ही केस अत्यंत बिकट आहे हें सर्वांच्या ध्यानांत आलेंच असेल. यांतील कांहीं गोष्टी तर इतक्या असाधारणच गूढ आहेत कीं ज्यूरीनें आजच निकाल देणें जरा घाईचें होईल असें मला वाटतें. मयत इसम हा खरोखरच सद्गृहस्थ असून येथें जमलेल्यापैकीं कांहींच्या परिचयाचाहि असेल. त्याला मरण अशा प्रकारानें यावें हीं खरोखर दुःखाची गोष्ट आहे; परन्तु यातील खरा प्रकार कळल्याशिवाय ज्यूरीला आपलें मत देतां येणार नाहीं ज्यूरीला आपलें ठाम मत बजवावयाला आज उपलब्ध असलेला पुरावा पुरेसा नाहीं. तेव्हां शेवटचा निकाल आज न देतां या केसचा कसून विचार व्हावा असें माझें मत आहे. "

इतकें भाषण करून कोरोनर खालीं बसले. ज्यूरीच्या मेंबरांत थोडीशी कुजबूज झाली, व शेवटीं कोरोनरच्या ह्मणण्याप्रमाणें ज्यूरीनें आपलें मत न देतां ती केस विचाराकरितां राखून ठेविली. लोक हळुहळू उठून जाऊं लागले. आणि सर्वांना पूर्वींपेक्षांहि ह्या गोष्टीचें अधिक गूढ वाटलें.

ह्या बैठकीला संजीवन हजर होता. परंतु फार तो दूर अंतरावर होता. माझी त्याची फक्त दृष्टादृष्ट झाली होती. तथापि चौकशी चालली असतां त्यानें माझ्याकडे मधल्या लोकांकडून एक चिठी पोंचती केली होती. त्या चिठींत त्यानें चौकशी संपून सभा आटोपल्यावर त्याला एकट्यालाच भेटण्यासाठीं त्यानें राहावयास सांगितलें होतें.

ह्मणून कस्तुरला गाडींत बसविल्यावर व डॉक्टर नियोगींला भेटून त्यांनीं करावयास सांगितलेल्या गोष्टी लक्ष्यात घेतल्यावर आह्मी दोघेहि जिकडे कोणाची विशेषशी गर्दी नव्हती अशा बाजूला गेलों.

जवळपास कोणी न दिसें पाहून संजीवन ह्मणाला " मी आज सकाळींच उठलों. आठाच्या पूर्वीं मी बाबासाहेबांच्या घरीं गेलों होतों. "

" कां ? "

" रात्रीं मला सुचलें. असें कांहींतरी सुचलें कीं त्याचा छडा लावण्याकरितां मीं तत्क्षणींत बाहेर पडतों. "

" पण तुला सुचलें काय ? "

" तपासणी चालली असतां त्या बाबासाहेबांच्या खोलींत सेफ पाहिल्याची मला आठवण झाली गंगारामानें जबाबांत अथवा एरवीं देखिल केव्हांहि बोलतानां सेफचा उच्चार केलेला नाहीं. तेव्हां मी सकाळींच उठून तिकडे गेलों. फक्त एकच कॉन्स्टेबल तेथें होता, त्यालाच घेऊन मी चोहोंकडे शोधलें. तुला वाटेल कीं सेफ प्रत्येक श्रीमंत मनुष्याची असते, त्यांत तें काय एवढेंसे ? परंतु त्यांत सेफची किल्ली कोणाचकडे नाहीं असे तपासा अंतीं मला समजलें होत. त्या किल्लीकरितां मी पुष्कळ शोधलें. किल्ली सापडली नाहीं. पक्के दोन तास लागले. शेवटीं खोलीच्या बाहेर एका लहानशा चिनीमातीच्या बरणीवजा भाड्यांत ठेवलेली किल्ली मला मिळाली. आणि ती त्या सेफचीच होती. "

" मग ती सेफ् तूं तपासून पाहिली असशीलच "

" ती कशी ? मुळींच नाहीं ! त्या सेफ्मध्यें पैसाआडका अथवा इतर कांहि मोलवान् चीजवस्त असेल. तेव्हां तिऱ्हाइताशिवाय मला एकट्याला ती सेफ् कशी उघडतां येईल ? आतां आपण दोघे मिळून ती तपासून पाहूं. "

" पण या बाबतींत आतां आपणाला पोलीसचें मत घ्यावें लागेल. "

" आणि मी चौकशी करतों आहे ती कोणाकरितां ? तें पोलीसचेंच काम आहे. घर सध्यां पोलीसच्याच ताब्यांत आहे ना ? झालें तर. त्यांच्याचकरितां आम्हांला सेफ् शोधून पाहावयाची आहे. "

" इनस्पेक्टरला ही गोष्ट कळली कीं नाहीं ? "

" नाहीं. इन्स्पेक्टर कुठे बाहेर दुसरीकडे गेला आहे. आपण आतांच दोघे गेलों तरी कोणत्याहि प्रकारची हरकत नव्हती. "

आम्ही तावडतोब दोघेहि गेलों. बंगल्याच्या आसपास अझूनहि कांहीं लोक वर तावदानांकडे अगर भिंतीकडे पाहून एकमेकांस बोटांनी दाखवीत रस्त्यांत

येतां जातां त्याच जागीं रेंगाळत होते. सकाळीं संजीवनला भेटलां तोच शिपाई आनंदि तेथे होता. त्याने आम्हाला आत सोडले. तो लपवून मजरा करून म्हणाला—

" इन्स्पेक्टर साहेबांनीं आपणास कळवावयास सांगितलं आहे कीं काहीं महत्वाच्या कामाकरितां आपणास बाहेर जावें लागलं आहे; तरीहि दुपारीं साडेतीनच्या सुमारास आपण तुम्हाला भेटूं. "

" कां बरें ? तुला काहीं ठाऊक आहे ते कशाकरितां मला भेटणार तें ? "

" आजच्या साक्षीदारांपैकीं एक कुठे फरारी झाला आहे ! "

" अँ ! " संजीवन आश्चर्यातिरेकाने म्हणाला " कोण बुवा ? "

" तो नोकर. एका सार्जंटनें त्याला पाहिलें देखिल. साक्ष देऊन झाल्याबरोबर तो घाई घाईनें ग्रँटरोड स्टेशनकडे वळला. "

आम्ही स्तिमित होऊन क्षणभर एकमेकांकडे पाहातच राहिलों. शेवटीं संजीवनने मनाशींच कसलासा विचार ठरवून तो जिना चढूं लागला. मीहि त्याच्या मागून वर चढलों.

बाबासाहेबांची खोली रिकामी व उघडीच होती. प्रेत उचलून नेण्यांत आलें होतें. आंत गेल्यावर संजीवन माझ्याकडे वळून म्हणाला " एकंदरींत इन्स्पेक्टरला गंगारामाविषयीं जी शंका आली त्यांत कांही तरी तथ्य दिसतें खरें. "

" तो खरोखरच जर फरारी झाला असेल तर गुन्ह्याची खात्री झाल्यासारखेंच झालें. "

" होय. शोध पूर्ण होऊन निकाल मिळण्याच्या पूर्वीच जाणें म्हणजे त्यांत कांहीं तरी काळेंबेरें आहे खास ! "

बोलतां बोलतां संजीवननें किल्ली घेतली. किल्लीला थोडासा गंज चढला होता; त्यावरून तो बरेच दिवसांत वापरण्यांत नसावीसें दिसलें. किल्ली कुलुपाला लावून पाहण्यापूर्वी संजीवननें ती चांगली तपासून पाहिली. कदाचित् खुनी माणसानें ही किल्ली घेऊन घाईनें पळवां पळतां त्या भांड्यांत तर टाकली नसेलना ? अशीहि आम्हाला शंका आली. कारण, नाहीं तर सेफची किल्ली इतक्या निष्काळजीपणानें कोण ठेवील ? "

त्या किल्लीला घांसून स्वच्छ केल्यावर कुलुपाला लावून सेफ् उघडली. ही सेफ फारच बळकट होती. उत्तम व्यवस्थेशीर रीतीनें रचून ठेविलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या कागदांशिवाय सेफमध्यें विशेष कांहींएक नव्हतें.

पहिल्यांदा एक पॅकेट मिळालें त्यांत बऱ्याचशा नोटी होत्या. पाकीटावर बाहेर त्या रकमेचा आंकडा घातला होता. त्यानंतर देशावरील मिळकतीबद्दलचे दस्तऐवज—गहाणपटे, खरेदीपटे, कबुलायती व कर्जरोखे वगैरे बरेच कागदपत्र होते.

अगदीं सरतेशेवटीं एक फारच मनोवेधक नाजूक व गुळगुळीत अशा कागदांचें रेशमी फितींत गुडाळलेलें एक लहानसेंच पुडकें दिसलें. तें बघितल्याबरोबर संजीवन ह्मणाला " अरे हें बघ काय मोहन ! ह्या त्या ह्मातारबुवाच्या प्रणयपत्रिकाशा वाटतात ! "

" त्याबरोबर साहजिकच मी त्याच्या हातांतून तें आपण अगोदर उघडावें ह्मणून काढून घेतलें. मी ती फीत काढून बाजूला टेवली. आणि पहिलेंच पत्र उघडलें. पत्रावरील अक्षर स्त्रीचे होते. ते साधारण माझ्या ओळखीचें असावेंसें वाटलें. मी पत्र उघडलें. आंतील मजकुरावरून मला कांहींच अर्थबोध [illegible] शेवटीं मी खालीं सही तरी कोणाची आहे ती पाहावी ह्मणून दृष्टी फिर[illegible]. त्याबरोबर माझ्या मुखावाटे एक लहानशी आरोळीच निघाली असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मी एकटा नसून माझ्या शेजारी दुसरें कोणी आहे याचे [illegible] [illegible]ा राहिलें नाहीं. माझ्या हृदयाचे ठोके अजीबात बंद पडल्यासारखे [illegible] ! तत्क्षणीच संजीवननें मला आपल्या दोन्ही हातांनीं दाबून धरिलें होतें. [illegible] मला कळून चुकलें कीं माझी मानसिक स्थिती संजीवनच्या ध्यानांत [illegible] ! व त्याबद्दल मला फार वाईट वाटलें. मी खट्टू झालों. ती सही संजी[illegible] दिसेल ह्मणून मी ती माझ्या बोटीखालीं दडवून टाकली. लगेच पत्राची [illegible] करून मी ती माझ्या खिशांत टाकली व संजीवन हिसकावून घेईल अशा कल्पनेनें त्याला ती न देण्याकरितां जणूं काय, त्याच्याशीं झगडण्याकरितांच सज्ज होऊन राहावें तसा राहिलों. तोंडांतून मात्र शब्दहि निघेना !

## प्रकरण ११ वें.

### प्रणयपत्रिकांची राखरांगोळी.

"काय आहे त्यांत?" माझी तयारी पाहून संजीवनने शांतपणें विचारलें.

"एरवींच—खासगी कांहीं आहे तें" मी म्हटलें.

"ह्मणजे? मला याचा अर्थ कळत नाहीं. बाबासाहेबांच्या कागदांत तुझें कसलें आलें आहे खासगी?" संजीवन विस्मित होऊन ह्मणाला.

"माझें स्वतःचें—स्वतःविषयींच काहीं आहे. आणि ह्याच्यापेक्षां जास्ती कांहीं मला सांगतां येणार नाहीं आणि तूं तें विचारूंच नयेस"

"स्पष्ट बोलल्याची क्षमा कर" संजीवन ह्मणाला, "आपण दोघेहि एकाच उद्देशानें हें खुनाचें गूढ कृत्य उकलण्याकरितां उद्योगास लागलों आहों. त्यांत एकाला दिसून आलेल्या कांहीं गोष्टी जर तो दुसऱ्यापासून छपवूं लागला तर मग ह्यांत काहीं तरी यश मिळण्याची आशा आहे कां?"

"पण ह्यांत दुसऱ्या कोणाचा—माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचा—कसलाच संबंध येत नाहीं, याला मी जबाबदार आहे. मी तुला किती वेळ सांगूं." मी अगदीं कावून ह्मणालो. "मला जें कांहीं सांपडलें आहे तें माझ्या स्वतःसंबंधींचेंच आहे."

संजीवननें थोडीशी विचारपूर्वक मुद्रा करून माझ्या या कृतीबद्दल चेहऱ्यावर आपली नापसंती दर्शविली.

"जरी तें तुझेंच—तुझ्याबद्दलचेच कांहीं गुप्त असलें तरी गुप्त गोष्टी एकमेकांस सांगण्याइतका—एकमेकांपासून लपवून न ठेवण्याइतका—आपला दोघांचा स्नेह आहे, असें मला वाटतें." तो ह्मणाला.

"होय. पण सांगावयाचें तेंहि कांहीं मर्यादेच्या आंतच." मी उत्तर दिलें.

"तर मग असेंच ह्मणेनास घटकाभर कीं तुझा माझ्यावर विश्वासच नाहीं!" या बोलण्यानें मला जरा वाईट वाटलें.

"तसें नाहीं, संजीवन तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. तुझी माझी जशी दोस्ती आहे तशीच ती पुढेंहि टिकावी अशीहि माझी इच्छा आहे. पण हीं

पत्रें अशीं कांहीं चमत्कारिक आहेत कीं ती तुला माझ्यानें दाखववत नाही, मला तूं याबद्दल क्षमा नाहींस करणार ? "

" मी तुला एकच विचारतो, आह्मी हातीं घेतलेल्या कामाशीं त्या पत्रांचा कांहीं संबंध पोंचतो काय ? "

मला स्पष्ट कांहीं सांगतां येईना. पण माझ्यानें खोटें बोलवत नव्हतें हेंहि त्यानें चाणाक्षपणें चटकन् ओळखलें.

" आहे, त्यांचा कांहीं तरी संबध आहे खास; हें तुझ्या मौनावरून उघड दिसतें. आणि तसें असेल तर तीं पत्रें मला दाखविणें हें तुझें कर्तव्यच आहे. आहे ना ? " तो अस्थिरपणानें ह्मणाला. मी नकार दर्शविला. पण त्यानें अनेकप्रकारें युक्तिवाद आरंभिला. वास्तविकपणें मी त्याच्यापासून तीं पत्रें चोरून ठेवणें चुकीचें होतें हें मला ठाऊक होतें. परंतु तीं पत्रें ह्मणजे माझ्यावर वज्राघातच होय. माझें हृदय विदीर्ण झालें होतें. तें पत्र उघडून पाहतांक्षणींच माझें अंतःकरण शतधा फाटून गेलें होतें हें त्यानें ओळखिलें; आणि माझ्या एकदर वागणुकीबद्दल तो स्तिमित होऊन राहिला.

" माफ कर, संजीवन, रागाऊ नकोस–" मी ह्मणालों. " जर तूं हें पत्र वाचशील तर मी तें कां तुजपासून लपवितों हें कळून मग तूं माझ्यावर खात्रीनेंच रागावणार नाहींस. जर तूं ह्या वेळीं इथें नसतास तर मी हीं सगळीं पत्रें जाळून टाकून त्यांचा मागमूस देखिल मी येथें ठेवला नसता. "

शेवटीं नाइलाज होऊन मी तें पत्र त्याच्या हातांत दिलें. त्यानें तें घेऊन मोठ्या उत्सुकतेनें वाचलें. वाचून झाल्यावर खालीं सहीवर दृष्टी जातांच माझ्याप्रमाणेंच त्याचीहि स्थिति झाली. त्याच्यानें कांहीं अटकळ करवेना. त्यानें निमूटपणेंच पुन्हा तें पत्र माझ्या हातांत दिलें.

" आतां कसें वाटलें तुला सांग बरें ? " मी विचारलें.

" अगदीं तुझ्याच प्रमाणें, मोहन ! " माझ्याकडे पाहत संजीवन हळहळं ह्मणाला.

" फारच आश्चर्यकारक—विचित्र—भयंकर हें ! "

" पण ह्या गुन्ह्याच्या मुळाशीं मत्सर आहे असें सिद्ध होतें नाहीं कां ? "

" ह्या पत्रावरून तर तसें दिसतें खरें " तो घोगऱ्या स्वरानें ह्मणाला. " तीं सर्वच पत्रें माझ्याकडे दे. मला तपासून बघूं दे सारीं. खरोखर तुझ्या काळजाला हा मोठाच धक्का बसला असेल." माझ्याबद्दल तो कळवळून ह्मणाला.

"आकस्मिकपणे उघडकीस आलेल्या या गोष्टीनें मला तर कांहींच सुचेनासे झालें आहे " मी अडखळत म्हणालों व तें पत्रांचें पुडकें त्याच्याकडे दिलें. त्यानें तें टेबलावर ठेवलें आणि पुन्हा सरसावून नीटपणें बसून एकामागून एक पत्रें उलटून तीं तपासण्यास त्यानें सुरवात केली.

ह्या व्यवसायांत तो निमग्न झाला असतां मी तें पहिलेंच पत्र उघडून पुन्हा अगदी 'श्री' पासून अखेरपर्यंत नीटपणे वाचूं लागलों. कित्येक दिवस-पर्यंत चालू असलेल्या पत्रव्यवहारांतलें तें शवटचें पत्र होतें. सर्व पत्रें तारखे-प्रमाणें कालानुक्रमानें लावून ठेवण्यांत आलीं होतीं. हें पत्र सर्वांच्या शेवटीं होतें. पत्रावर तारीख नसून फक्त दिवसच—गुरुवार—लिहिला होता. बहु-तेक पत्रें मुंबई मुक्कामाहूनच लिहिण्यांत आलीं होतीं.

" अशाप्रकारें आपल्या वचनाला हरताळ फासणाऱ्याबद्दल तिरस्कार व्यक्त करण्यास पुरेसे शब्दच नाहीत. सुमारें एका वर्षापूर्वी आमच्या घरीं आपण पाहुणे म्हणून आलांत, त्या वेळी आपण 'माझें तुझ्यावर प्रेम आहे' असें मला सांगून मला आपल्याबरोबर लग्न करण्याविषयीच आग्रह केलात. तुमच्या या मागणीनें तर मला प्रथम हंसूंच आलें परंतु तुमचा तो खरोखरीचा निश्चय आहेसें पाहून आपल्या दोघांच्या वयांतील भयंकर अंतर मी तुमच्या नजरेस आणून दिलें. त्यावर तुम्ही एकाद्या ताज्या रक्ताच्या तरुणाइतक्याच उत्कट-तेनें मी तुझ्यावर प्रेम करतों, तूंच माझें सर्व कांहीं आहेस, इतकेंच नव्हें तर याबद्दल तुला पश्चात्ताप करण्याचा कधींहि प्रसंग येणार नाहीं, असेंहि सांगून टाकलेंत. ह्या शब्दांवर माझा विश्वास बसला. गुप्तरीतीनें आपण जें खोट्या शब्दांनीं लटकी प्रीति व्यक्त करून पत्र पाठविलेंत त्यावर माझा विश्वास बसला. आपलें हें गुपित तिसऱ्या कोणालाहि माहीत नव्हतें. आणि आपण आपल्या शब्दाला कोणत्या प्रकारें जागलांत ? आजच बाबांकडून मला कळलें कीं तुमचें अंबूताईबरोबर—माझ्या वडील बहिणीबरोबर—लग्न ठरलें आहे. माझ्या

मनाच्या स्थितीची कल्पना तुह्मीच घटकाभर करून पाहा. बाबांनीं मला आनंदानें ह्मणून ही खबर कळविली. या बातमीवरून मला देखिल त्यांच्या इतकाच आनंद होईल ही त्यांची बापड्यांची कल्पना ! पण माझ्या हृदयाला होणाऱ्या वेदनांची कल्पना त्यानां कशी होणार ? एका स्त्रीच्या प्रेमाची आणि आशांची अशा प्रकारें राखरांगोळी करावयास आपल्या मनाच्या लहरीला फारस विचाराचे प्रयास पडले नसतील ! पण माझ्या मनांतील वेदनांचे पीळ आतां कसे उलगडतील ? माझ्या जागीं दुसरी एखादी स्त्री असती तर तिनें ही तुमचीं सर्व पत्रें अंबूताईच्या हातात ठेवून कोणत्या प्रकारच्या कवडीमोल माणसाशीं तुझा जन्माचा संबंध जडतो आहे तो नीट डोळे उघडून पाहा असें सांगून तिला लग्नापासून परावृत्त केलें असतें. मी असेंच करीन असें तुह्माला वाटतें का ? नाहीं मी असें करणार नाहीं याबद्दल तुमची खात्री असूं द्या. माझी ताई ह्या संबंधानें सुखी होत असल, तर तिच्या सुखाच्या आड मी येणार नाहीं. माझ्या मनाची तळमळ अशा कृत्यानें उत्पन्न झालेला द्वेषाच्या अंगारावर फार तर राखाडीचें आवरण; दिसेल पण आंतील ठिणगी आतां कधींच विझून जाणार नाहीं. तुह्माला सहजासहजीं एका स्त्रीला लालूच दाखवून तिच्या आशांचा चुराडा केल्याबद्दल पश्चात्ताप करावा लागेल. तुह्मांला याबद्दल प्रायश्चित भोगावे लागेल तें अशा प्रकारें आणि अशा वेळीं कीं, त्याची तुह्माला स्वप्नांत देखिल शंका येणार नाहीं. हीं पत्रें दुसऱ्या कोणाच्या हातांत पडूं नयेत अशी तुमची इच्छा असणें साहजिकच आहे. आणि ह्मणूनच तुमचीं हीं सर्व पत्रें मी आज तुमच्याकडे परत करतें आहे. मागील ह्या घडलेल्या गोष्टींचा मी पुनरुच्चार कधींहि करणार नाहीं. मी कांही ह्मातारी झाल्यें नाहीं. ईश्वर मला अनुरूप असा सदाचारशील व सन्माननीय—ज्याला आपल्या शब्दाची किंमत आहे—असा पति देईल. तुमचें वार्धक्य मात्र तुमच्या केंसांना धरून तुह्माला वरवर उचलित आहे. एवढेच पुरें !

" कस्तुर. "

चार वर्षापूर्वी अंबुताईचें लग्न जुळलें त्या वेळचें हें पत्र होतें. अंबुताईचें लग्न होण्यापूर्वी बाबासाहेबांशीं कस्तुरचें लग्न होणार होतें. अथवा तसें त्या

दोघांनींच परस्पर संमतीनें ठरविलें होतें ही गोष्ट प्रथमच मला ह्या वेळीं त्या पत्रद्वारा कळली. जिच्यावर मी प्राणापलीकडे प्रेम करीत होतों तीच ही माझी–माझ्या जिवाची धनीन–कस्तुर. बाबासाहेबांनीं तिच्या प्रेमाची अवहेलना केली आणि ती तिच्या अंतःकरणास नेहमी डंबचीत होती आणि पत्राच्या अखेरीस तर सूडाची दहशतहि घातलेली होती. सूड घेण्याच्या तिचा आधार सर्व पत्रांवरच असता तर तिनें ती पत्रेंच परत केलीं नसतीं. पण तिनें ज्या अर्थी बाबासाहेबांचीं सर्व पत्रें त्यांच्याकडे परत केलीं त्या अर्थी तिचा सूड घेण्याचा मार्ग निराळाच आणि तोहि फारच भयंकर असावा असें अनुमान काढतां येण्यासारखें होतें. बरें पुढें आपल्या थोरल्या बहिणीशीं नंतर बाबासाहेबांचें लग्न लागलें त्यासहि तिनें खो घातला नाहीं, आपला द्वेष गिळून टाकला आणि ती आपल्या सूडाकरितां पत्रांत बजाविल्याप्रमाणें योग्य संधीची वाट पाहात बसली.

डॉक्टर नियोगींच्या शब्दांची मला आठवण झाली. खरोखर कस्तुरबद्दल त्यांनीं जे संशयित उद्गार काढले होते ते खरे आहेत असें आतां मला वाटूं लागलें. आतां मला त्यांच्या शब्दांची सत्यता पटूं लागली. माझी खरी काळजी वाळगणारा व माझें बरें इच्छिणारा प्रामाणिक वृत्तीचा मनुष्य कोणी असेल तर ते डॉक्टर नियोगीच होत असें आतां मला वाटूं लागलें. माझ्या धंद्यांत मला हल्लीं जें यश लाभूं लागलें होतें त्याचें अर्धे अधिक श्रेय त्यानांच देतां येण्यासारखें होतें, आणि माझ्या खासगी गोष्टींत सुद्धां मुद्दाम लक्ष घालून ते मला आपला पोक्त सल्ला देत. पण ती मात्र मी नेहमींच कानांवर घेत असें, असें नाहीं. आतां ते कांहींसे लहरी व विचित्र वर्तनाचे होते खरे, पण त्यांच्या स्वभावाशीं मला काय कर्तव्य होतें ?

संजीवननें तपासून खालीं ठेवल्यावर मी एकेक पत्र उघडून वाचूं लागलों ! त्यावरून मला कळून आलें कीं, तीं पत्रें ह्मणजे एखाद्या तरुणीनें एखाद्या धनाढ्य गृहस्थास आपल्या प्रेमपाशांत अडकविण्याचा व त्याच्या इस्टेटीची मालकीण होण्याचा स्वार्थ बुद्धीनें व नीच वृत्तीनें केलेला प्रयत्न तरी असावा एक, अथवा त्या स्त्रीची प्राणापलीकडेहि त्या गृहस्थावर प्रीति असावी एक; अशीच त्या पत्रांतली भाषा होती. त्या पत्रांतील कांहीं मजकुरांत तर त्या प्रणयिनीच्या

प्रीतिबद्ध अंतःकरणांत वास करणाऱ्या काव्याचे प्रवाह उच्छृंखलपणें वाहत असलेले दिसत. कस्तुर निरनिराळ्या वेळीं आपल्या मामाच्या घरीं, मावशीच्या घरीं वगैरे जेथें जेथें गेली असेल त्या त्या निरनिराळ्या ठिकाणांहून हीं पत्रें पाठविलेलीं होतीं हें पत्रावरील मुक्कामावरून स्पष्ट होतें. कांही कांहीं पत्रांत तिनें बाबासाहेबाना नुसतें " प्रिय " अशा अक्षरांनीं संबोधिलें होतें. पण तीं प्रथमचीं होतीं. पुढें पुढें तर " प्रियकर " असें म्हणण्यापर्यंतहि मजल पोंचली होती. पत्राच्या अखेरीला आपली सही करतांना तत्पूर्वी " आपलीच " " सर्वस्वी आपलीच " असेहि शब्द कित्येक पत्रांत लिहिले होते. ह्या पत्रांनीं तर मला अगदीं दिङमूढ करून सोडलें. जर हें उत्कट प्रेम असेल तर ते किती तरी कळकळीचें होतें, तें लुटुपुटूचें नव्हतें. तिचें प्रेमच बाबासाहेबांवर त्या वेळीं अतिशय होतें असें त्या पत्रावरून कोणासहि वाटलें असतें.

कस्तुरचीं गात्रें जशीं चारुतम तसेंच तिचें प्रेमहि अत्यंत भावनाप्रधान. वास्तविक पाहता तिच्या ह्या प्रेमपत्रिका ज्यास गेल्या होत्या त्याच्या बापज्याच्या अंतःकरणांतील प्रणयाचा शेवटचा स्फुलिंगहि विझून जाऊन त्याची राख बनली असेल ! परंतु तरी देखिल त्यांतील मजकुरावरून तिचें प्रेम निःस्वार्थबुद्धीचें, उत्कटतेचें आणि फारच पवित्र म्हणून उच्च दर्जाचें असें वाटे. प्रथम प्रथम नुसतीं पत्रें चाळीत असतां मला वाटलें होतें कीं ह्या नटवेखोर छचोर पोरीनें धनलोलुपतेनेंच केवळ त्या धनिक बाबासाहेबांस आपल्या कह्यांत आणण्याकरितां ह्या प्रणयपत्रिकांचें जाळें पसरलें असावें. परंतु अखेरी अखेरीचीं पत्रें वाचल्यावर व विशेषतः तें शेवटचें पत्र पाहिल्यावर तिच्या प्रेमाचा उत्कर्ष कसा होत गेला व शेवटीं भग्न झालेल्या प्रेमाचा परिस्फोटहि किती भयंकर झाला हें कळलें आणि त्यावरून तिच्या उत्कट प्रेमाची चांगलीच जाणीव झाली.

कस्तुर खरोखरीच असाधारण तरुणी होती. मोहकता आणि प्रणय हीं दोन्हीं तिच्या सर्वांगांत नुसतीं खेळत होतीं. आजूबाजूस घडणाऱ्या बऱ्या वाईट गोष्टींची जागृति बाळगून पुन्हा आपल्या योजनेच्या साफल्याकरितां, अंतस्थ वृत्तींची खळबळ उडवून सोडविणाऱ्या परिस्थितींतहि मनाची स्थिरता ढळूं न देणें ही गोष्ट जरा अगदींच अशक्य नाहीं तरी फारच थोड्या माणसांच्या

वाटणीस येते. माझी पक्की खात्री झाली होती कीं, कस्तुरची मानसिक शक्ती बलवत्तर होती, पण त्यांत देखिल जें उदासीनतेचें रंगमिश्रण केव्हां केव्हां दिसून येई तेव्हां मी स्वतःशींच त्याच कारणाबद्दल विचार करीत राही. तिच्या उदासिनतेचें कारण मला आतां उमगलें.

परंतु बाबासाहेबांशीं अंबूताईचें लग्न झाल्यावर देखिल ती त्यांच्या घरांत येऊन आपल्या बहिणीच्या सोबतीस म्हणून राहिली आणि ती देखिल अशा-रीतीनें कीं मनांत धुमसणाऱ्या द्वेषाग्नीच्या धुराचा देखिल कोणाला संशय येऊं नये अशा प्रकारची शांतता धारण करून ! यावरून तिच्या ठिकाणीं दिसून येणारें गांभीर्य आणि शांतता हीं प्रेमभंगाच्या सुडानेंच उत्पन्न केलेलीं होतीं हें उघडच झालें.

हें सगळें कोडें मुळींच उलगडतां येण्यासारखे नव्हतें. बाबासाहेबांनां तें दह-शतीचें पत्र पूर्वीच गेलें असतांहि त्यांनीं कस्तुरला आपल्या घरांत राहण्यास निमूटपणें परवानगी द्यावी म्हणजे काय ? हें माझ्याप्रमाणें संजीवनलाहि गूढ पडलें. तितकीच आश्चर्याची दुसरी गोष्ट म्हणजे अंबुताईला कस्तुरच्या द्वेषाचा कधीं काळीं सुगावा देखिल लागत नाहीं ! प्रच्छन्नद्वेषी कस्तुरनें आपल्या कूर्मबु-द्धीनें खरोखरच दोघांसहि फसविलें !

मनोविकार आणि तदुद्भूत कल्पनेच्या लाटा यांतूनच वैषयिक प्रेमाची उत्पति आहे. अरेरे! ही वरून शांत दिसणारी कोकीळकंठी, हंसगमना सुंदरी, माझ्या-वर अलोट प्रेम करीत आहे असें मला वाटलें ! हाय! शेवटीं ह्या पत्रांनीं मला तो आभास आहे असें निदर्शनास आणून दिले. दिसतानां ती कितीहि गरीब, प्रामाणिक, शांत, निरुपद्रवी, पवित्र आचरणाची अशी दिसली तरी खरोखरच ती खून करणारी कृत्याच होती !

"ह्यांतच काय तें आहे," हा नाजूक पत्रव्यवहार उघडकिस आणणाऱ्या पत्रांच्या ढिगाऱ्यावर पडलेलें वर दिलेलें पत्र होतें त्या पत्राकडे बोट दाखवून संजीवन म्हणाला, "ह्यांतच सारें आहे! ही एक विचित्र नवलकथाच आहे बुवा !"

"तर मग तीच दोषी आहे असं तुझें म्हणणें ?" मी घोगऱ्या आवाजांत विचारलें. त्यानें भुवयां वक्र करून चेहरा विचारमग्न असल्याप्रमाणें केला, परंतु माझ्या प्रश्नाला उत्तर दिले नाहीं.

मध्यतरींच्या ह्या वेळांत मी त्याच्याकडे पाहिलें तों त्यानें आपली मान किंचित् उजव्या बाजूकडे वांकवून हनुवटी छातीवर टेकली होती, कपाळाला आंठ्या घातलेल्या होत्या, डोळेहि किंचित् विस्तृत झाले होते आणि एका हाताची बोटें दुसऱ्या हाताच्या बोटांतील आंगठीशीं खेळण्यांत गढून गेलीं होतीं!

"आतां पुढें ?" शेवटीं एकदाचे मी म्हटलें. "पुढें काय करावयाचें ?"

"पुढें ? पुढें काय ? त्या बाईचें बरें वाईट करण्याचें आतां तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे."

"माझ्याच कां ?" मी विचारलें. "तुझ्या सुद्धां."

"नाहीं रे बाबा, नाहीं !" माझा हात आपल्या हातांत घेऊन आणि तो प्रेमळपणें दाबून म्हणाला. "मुळींच नाहीं. तुझ्या मनांत कसली कालवाकालव सुरू झाली आहे ती मी ओळखतो. साधारण स्त्रियांहून भिन्न, पवित्र आणि प्रामाणिक अशी ती आहे अशी तुझी आतांपर्यंतची समजूत होती. संसारांत सांगातीण करण्यास—पत्नीपदावर आरूढ करण्यास—योग्य ह्मणून तूं तिला मनापासून निवडलें होतेंस. आणि तुझेंच कां, माझें देखिल अगदीं असेंच मत होतें. तूं तिच्याविषयीं ज्या ज्या कल्पना केल्या होत्यास त्या कल्पना अगदीं खऱ्या गोष्टी आहेस असेंत माझ्याहि मनाला वाटत होतें. चेहऱ्यावरून जर मनुष्याचा स्वभाव उघड होत असेल आणि तसा उघड होणारा स्वभाव मानणें योग्य असेल तर मला वाटलें दुष्ट जगाच्या दुर्गंधाचा कस्तुरच्या निर्मळ कायेला अद्याप स्पर्श देखिल झालेला नाहीं. ती पवित्रच आहे. मुखपरीक्षा शास्त्र मला चांगलेंच अवगत आहे. आणि त्या शास्त्रांतील माझ्या अनुभवावरून विचार करितां इतक्या निर्मल व नितांत सुंदर चेहऱ्याच्या ठिकाणीं इतकें दुष्ट खुनशी हृदय मला कधींच आढळून आलेलें नाहीं. आणि ह्मणूनच, मी आपला स्पष्ट सांगतों, तुझ्याप्रमाणेंच, किंबहुना तुझ्याहूनहि अधिक त्या पत्रांनीं मला बुचकळ्यांत पाडलें आहे. मला आपलें वाटतें कीं–"

" छ रे !" मी ओरडून त्याला मध्येंच आडविलें. " माझा नाहीं त्यावर विश्वास बसत. संजीवन खरेंच सांगतो तुला; मला हें मुळींच पटत नाहीं. तिने खून केला–ती खुनी–छ ! मुळींच खोटी गोष्ट–अगदींच असंभवनीय. तो तिचा चेहरा खुनी स्त्रीचा नव्हेच मुळीं. तिच्या चेहऱ्यांतच खुनशीपणा नाहीं. "

" हः हः ! चेहरे फसवतात बाबा पुष्कळ वेळां ! " तो शांतपणें हंसून म्हणाला. "फावबाज स्त्री खोट्या गोष्टींवर पांघरूण घालून अशा खिताबीनें ती खरी आहेशी भासवील कीं त कठल्याहि मी म्हणणाऱ्या पट्टीच्या धूर्त पुरुषाला साधणार नाहीं. मीं सांगतों हें लक्ष्यांत घे. तुला पुढेंमागें याचा अनुभव येईल." माझ्या चेहऱ्यांतली चलबिचल पाहून तो म्हणाला.

" आहे—मला ठाऊक आहे— तें कांहीं नवीन लक्ष्यांत घ्यायला नको. पण इतक्यानें सुद्धां—असल्या लगंडया पुराव्यानें माझी खात्री होणार नाहीं "

" जरा शांत हो ! भल्या गृहस्था ! जरा धीरानें घेशील ? " तो पूर्वीच्या इतक्याच शांतपणें म्हणाला, " कस्तुरवर तूं जितकें प्रेम करीत आहेस, तितके प्रेम करणाऱ्या कोणत्याहि पुरुषाला आपल्या प्रेमभाजनीभूत स्त्रीविषयीं अशा प्रकारचा संशय घेण्याला मन नाहींच तयार होणार ! तें मी जाणतों. तूं मर्द आहेस. ह्या क्षुद्र संकटाच्या भाराखालीं छाती वांकवूं नकोस. मर्द हो. मर्दासारखा वाग. "

" मी हा आहे तयार ! " मी निश्चयपूर्वक म्हणालों "पण मी स्पष्ट, उघडपणें, कुठेंहि, केव्हांहि, कोणासहि सांगू शकेन कीं, तिने खून केलेला नाहीं. हीं पत्रें ? होय ! हीं पत्रें आहेत खरीं. बाबांसाहेबांशी तिचा प्रीतिविषयक पत्रव्यवहार झाला होता. परंतु बाबासाहेबांनीं शेवटीं तिला सोडून तिच्या बहिणीला वरिलें. पण म्हणून काय झालें ? ह्यांत एवढें असाधारण तें काय झालें ? झालेला प्रणयभंग निमूटपणें सहन करून निर्मळपणें राहणाऱ्या चांगल्या स्त्रिया जगांत नाहींतच कीं काय ? "

" आणि तें शेवटचें धमकीचें पत्र ? त्याबद्दल काय ? "

" वाहवा रे गाजी ! असेल—तें पत्र असलें म्हणून काय झालें ? प्रणयभंगानें झालेल्या निराशेच्या पहिल्या उसळीसरशीं तिनें तें पत्र लिहिलें आहे,

एवढेंच फार तर म्हणता येईल. तिने जे शब्द पत्रांत लिहिले आहेत ते तिला आतां स्मरत देखिल नसतील. आणि शिवाय, ती आज इतके दिवस बाबा-साहेबांच्याच घरांत राहून, त्यांच्या घरांतील कामकाजावर व नोकर माणसां-वर देखरेख करून, इतकेंच केवळ नव्हे, तर बाबासाहेबांच्या सीकपणांत अंबू-ताईच्या गैरहजिरींत त्यांची शुश्रुषा करून तिनें जो आपला सच्छीलपणा, प्रेमळ-पणा, व्यक्त केला आहे तो? तो कोठें जाईल? तो खुनाच्याच हेतूनें वाटतें!"

माझें इतकें आवेशाचें बोलणें ऐकून संजीवनानें काय केलें? तर नुसता फक्त हांसला! त्यामुळें मी विरमून गेलों. मलाहि कळून चुकलें कीं माझा बुद्धिवाद तर्कशास्त्रास धरून नव्हता. तरीहि मी तसें न दाखविण्याकरितां मद्दाम म्हणालों!

"आणि तुझेंहि असेंच मत नाहीं काय?"

"कोण म्हणतो? माझं मत असें नाहींच मुळीं!" त्यानें म्हटलें.

"तर मग आतां काय करावयाचें बुवा?" जरा थांबून मी म्हटलें.

"तें सर्व तुझ्या स्वाधीन. मी प्रथमच तुला सांगितलें होतें. इतका वाद करून शेवटीं तूं परत त्याच पूर्वपदावर आलास. तुझ्या जागीं दुसरा कोणी असता तर त्यानें काय करावयाचें तें तावडतोब करून टाकलें असतें."

"काय तें, त्यानें काय केलें असतें?" मी उत्सुकतेनें विचारलें.

"ही सर्व पत्रें घेऊन मी त्या तिथें रचून जाळून टाकण्याचें काम त्यानें प्रथम केलें असतें." तो म्हणाला.

अशा प्रकारची कल्पना तो सांगेल असें मला वाटलें नव्हतें. बाकी ही कल्पना माझ्या डोक्यांत प्रथमच आली होती. बरं मी होऊन ती त्याला सुच-वावयास तयार नव्हतों. कारण त्यामुळें खरें पाहतां न्याय मिळविण्याचा—खरें शोधून काढण्याचा एक मुख्य महत्वाचा मुद्दा आपण होऊन नाहींसा केल्यासारखा होत होता.

"तर मग तें काम जर मीच केलें तर तें गुप्त राखशील असें वचन मला देतोस काय?" मी चटकन् विचारलें. "पण ध्यानांत ठेव कीं हें कृत्य बेकायदेशीर—गुन्हाच होत आहे."

" मी तुला वचन देतों कीं, ह्या खोलींतून बाहेर पडतांक्षणींच मी ही पत्रें पाहिल्याचें विसरून जाईन." असें म्हणून त्यानें आपला हात पुन्हा एकवार माझ्या हातांत दिला. " ह्या बाबतींत तुला फक्त मदत केली पाहिजे एवढेंच मी जाणतों. तूं समजतोस त्याप्रमाणें कस्तुर जर निरपराधी असेल तर हीं पत्रें जाळून टाकल्यानें कांहींहि होणार नाहीं. बरें, ती खरोखरीच दोषी असली तर तो गुन्हा कधींहि तिला लपवून ठेवतां येणार नाहीं. स्त्री कितीहि धूर्त असो ति [illegible] कांहीं पचवून टाकतां येणार नाहीं हे निःसंशय !

' तर मग हीं पत्रें नाहींशीं करून टाकण्यास तुझी कांहीं हरकत नाहीं ना? आणि याबद्दलचें एक अवाक्षरहि तू बाहेर फोडणार नाहींस ना ? "

"नाहीं—खरोखर नाहीं. अथवा असें [illegible] घ—घे बघूं—" सें म्हणून तो स्वतःच तीं इकडे तिकडे अव्यवस्थितपणे पसरलेली पत्रें गोळा करूं लागला.

" आतां आपणास मुळींच वेळ गमावतां नये. नाहीं तर कोणी तरी पोलीस, अथवा दुसरा कोणी हळूच खालून वर यायचा. "

नंतर त्याच्या सूचनेवरून आणि त्याच्याच मदतीनें मीं तीं सर्व पत्रें गोळा करून त्याचे राई एवढाले तुकडे करून फाडून टाकलीं, आणि नंतर ते सर्व एकत्र करून त्यांस काडी ओढून लावली. एकदम चकन् प्रकाश पडला. आणि शेवटीं तेथें थोडीशी काळी राख राहिली.

मी ती सर्व राख एकत्र करून तिचें चूर्ण करून बाहेर फेकून देण्याकरितां म्हणून खिशांतच घालून ठेवली. आणि ती जागा अगदीं साफसूफ करून इतकी कीं तेथें कागद जाळल्याचा कुत्र्याला सुद्धां वास येऊं नये; मग माणसाला उमगण्याचें तर बाजूलाच राहिलें.

अशा रीतीनें सर्व पत्रांची वासलात लावल्यावर आणि त्यांचा मागमूस देखिल नाहींसा करून टाकल्यावर आणि ती तिजोरी पूर्ववत बंद करून ठेवल्यावर आम्ही दोघेंहि खालीं उतरलों; परंतु खालीं गेल्यावर प्रथम पोलिसांना मात्र संजीवननें आपण म्हणजे आम्ही दोघांनी काय काय केलें याचा संशय घेतां येणार नाहीं अशी बहुतेक बनावट हकीगत सांगितली, आणि त्यांचाहि तिच्यावर विश्वास बसला.

# प्रकरण १२ वें.

## अनपेक्षित भेट.

पूर्वी दहाव्या प्रकरणांत जाहीर झाल्याप्रमाणें कोरोनरची व ज्यूरीची सभा पूर्वस्थळीं नेमलेल्या दिवशीं भरली. आणि लोकहि पूर्वीपेक्षां कितीतरी पटीनें जास्त जमले. शेवटीं पोलिसांस आपापल्या कबरेचे सोटके घेऊन पुढें सरावें लागलें. मागील सभेपासून आतांपर्यंतच्या दरम्यानच्या काळांत वर्तमानपत्रांच्या एडिटरानी आपापले सुपीक मदूंतून काढलेल्या अनुमानात्मक गोष्टी बऱ्याच पिकविल्या होत्या; आणि त्याचेंच पुनः पुनः चर्वितचर्वण करून प्रत्येक माणूस सोत्सुक असा आता शेवटचा निकाल ऐकावयास उतावीळ झाला होता.

ह्या रहस्यातला मुख्य चर्चेचा गोष्ट म्हणजे बाबासाहेबांच्या मृत्यूला कारण झालेली ती विचित्र जखम होय. आणि डॉक्टर लोकांच्या साक्षींत त्या जखमेबद्दल जीं विधानें करण्यांत आलीं होतीं त्यावरून तर त्या जखमेचें गूढ अधिकच खोल होतें चाललें होतें. डॉक्टर नियोगी व मी दोघेहि चकित होऊन गेलों होतों. आम्ही दोघांनींन त्या मुद्यावर कितीतरी वेळां चर्चा केली होती, परंतु अशा तऱ्हेची जखम कोणत्या प्रकारच्या शस्त्रानें करतां येईल हें कांहीं निश्चितपणें उमगेना.

हल्लीं हल्लीं डाक्टर नियोगींच्या चर्येंत आणि दिनचर्येंत बराच फरक पडत असलेला दिसूं लागला. पाहावें तेव्हां ते खिन्न, उदासीन आणि विचारमग्न दिसत. ते म्हणजे एरवीं पाहिलें तर नेहमीं गडबडींत असावयाचे. त्याचप्रमाणें रोग्यांशीं बोलतानां ते एकदम मुख्य मुद्द्यासंबंधींच तेवढें बोलत. त्यांचा अलीकडचा पलीकडचा अराळफराळ ऐकून घेत नसत. डॉक्टर लोकांच्या पद्धतीच्या हें कांहींसें विरुद्धच होतें. कारण मनुष्याच्या सहनशीलतेची कसोटी पाहणारा वैद्यकीसारखा दुसरा कोणताच धंदा नाहीं. डॉक्टर लोकांना बरपांगी समाधान वृत्ति आणि शांतता धारण करावी लागते. रोगी एकदां का आपलें प्रकृतिमान आणि

रोग उद्भवण्याचें कारण सांगूं लागला कीं पूर्वी अमुक एका वेळीं अमुक एका ठिकाणीं, अमुक एका प्रकारचें अमुक अमुक पद्धतीनें अमुक वस्तु कशी खाल्ली आणि त्यापासून पुढें परिणाम काय झाला व शेवटीं हा रोग आपणास कसा जडला वगैरे चऱ्हाट तो सांगोपांग वळूं लागेल, तें थांबतां थांबणार नाहीं. बरें तें ऐकून न घेतलें तर डॉक्टरनें आपली हकीगत ऐकल्याशिवाय ह्मणजे रोगाचें योग्य निदान केल्याशिवाय औषध दिलें असा रोग्याचा दृढ समज होऊन बसणार आणि त्यापासून धंदा नीट प्रकारें चालणार नाहीं. फार प्रसिद्धीला आलेले डॉक्टर असतात ते मग " डॉ. आतां एवढं पुरे; असे ह्मणून रोग्यांच्या चर्पटपंजरीस आळा घालूं शकतात; परंतु साधारण प्रॅक्टिसीच्या डॉक्टरानें आपलें कागदावर पेन्सिलीचें टोंक ठेवून आणि टेबलावर कोंपर टेकलें, डाव्या हाताच्या तळहातावर मस्तक किंचित कलतें टेकून आपण ऐकतों आहों असें निदान भासवलें तरी पाहिजे. नाहींतर गिऱ्हाईक बिथरलेंच ह्मणून समजा !

असो, तात्पर्य काय कीं या पद्धतीच्या विरुद्ध वागणूक डॉ. नियोगींची होती कारण ते एक बडे डॉक्टर होते. परंतु त्यांच्या सर्वच वागणुकींत हल्लीं फरक दिसूं लागला. त्यांच्या बाहेरच्या व्हिजिटसहि हल्लीं बंद पडत चालल्या. ते बाहेर कुठें जाईनातसे झाले. आपल्या क्लबमध्यें मात्र ते बहुशः वारंवार जात. प्रॅक्टिसीकडे त्यांचें दुर्लक्ष होऊं लागलें. ह्मणजे त्यांचें काम मजवर पडूं लागले. परंतु याचा मला अचंबा वाटूं लागला. मधून त्यांच्या वृत्तींत मला घाबरेपणाचीहि चिन्हें दिसून येऊं लागलीं.

आरंभी सांगितलेली चौकशी सुरू होण्याच्या आधल्या दिवशीं संध्याकाळीं मी सहज त्यांना ह्मटलें कीं तुमची प्रकृति नीट दिसत नाहीं. त्यावर त्यांनीं खिन्नपणें उत्तर दिलें—

" गेले बिचारे बाबासाहेब ! मला राहून राहून त्यांच्याबद्दल फार वाईट वाटतें. माझा त्यांचा फारच स्नेह."

माझीहि अशीच अटकळ होती. एकंदरींत ते आपल्या मित्राच्या मृत्युमुळें उदास झाले होते हेंच खरें असें मी ठरवलें.

दुसऱ्या दिवशीं चौकशीच्या वेळीं सुरुवातीच्या पूर्वी एक क्षणभरच ते आले आणि माझ्याच शेजारी बसले

मागील हकीकत कळवून झाल्यावर कोरोनरनें पोलीसाला कांहीं पुरावा गोळा केला असल्यास तो पुढें आणावयास सांगितले स्पष्टपणें नवीन पुरावा असा कोणीच कांहीं पुढें आणला नाहीं परंतु त्या पोलिस इन्स्पेक्टरनें पुढें येऊन ह्मटलें

"लोकांसमक्ष सांगता यण्यासारखे असें आह्मापाशीं काहींच नाहीं. अझून चौकशी मात्र करून चालू आहे."

या वाक्यानें लोकांस अधिकच गूढपणा दिसून आला.

"बरें. डॉक्टरी तपासणीचा कांहीं विशेष पुरावा तरी आहे काय?" हें वाक्य कानांत पडल्याबरोबर मी डॉक्टर नियोगींकडे वळून पाहिलें, पण त्यांच्याकडे वळून पाहत असतां त्याच बाजूस परंतु फार दूर अंतरावर उभी असलेल्या एका स्त्रीवर माझी नजर गेली. ती मोठ्या आतुरतेनें आली होती. तिचे काळजीनें काळवंडलेले डोळे कोरोनरकडे लागलेले होते. त्याच्या प्रत्येक शब्दाकडे ती लक्ष देऊन ऐकत होती.

"कांहीं पुरावा नवीन असा आमचेपाशीं नाहीं." पोलीस इन्स्पेक्टरनें ह्मटले. क्षणभर शांतता पसरली. प्रत्येक वर्तमानपत्रांतली खरी खोटीं विधानें व अनुमानें वाचून व ऐकून उत्कंठेनें जमलेल्या लोकांची फारच निराशा झाली. एखादी चटकदारशी साक्ष तरी ऐकावयास सांपडेल अशी त्यांची आशा होती. मग त्यात सत्य असो अगर नसो पण गंमत तरी ऐकावयास मिळावी. परंतु पोलिसच आपला पुरावा गुप्त ठेवीत आहेसें दिसल्याबरोबर त्या केसचें गूढ कमी होण्याच्या ऐवजीं अधिकच वाढलें.

शेवटीं कोरोनरनें स्वतः उठून व ज्यूरीस अनुलक्षून भाषण केलें:—"सद्गृहस्थ हो! एकंदरींत आपण इथपर्यंत घडलेल्या सर्व गोष्टी व लागलेला शोध सर्व कांहीं ऐकून घेतलेच आहे आणि आतां तेवढ्यावरून मयताचा मृत्यु कशा प्रकारें घडून आला—खुनशीपणानें किंवा आकस्मिपणानें याचा

निवाडा तुह्मांस करावयाचा आहे. आतां एकंदर हकीगत लक्षांत घेतां निकाल देणें ह्मणजे विशेष अडचणीचें आहे असे मला वाटत नाहीं. ही केसच मुळीं भानगडीची, रहस्यमय गुंतागुतांची आहे ही गोष्ट तर खरीच. मयत इसमास रोग झालेला होता, तो श्रीमंत होता व तो फार दिवस वांचलाहि नसता. त्या रोगामुळें तो फार दिवस वांचणार नाहीं ही गोष्ट त्याला स्वतः, त्याच्या घरांतील काहीं माणसांना व त्याच्या इष्टमित्रांना पूर्णपणें माहीत होती. इतकें असून त्याचा अंत झाला आहे तो अशा तऱ्हेनें कीं सर्व हकीगतीवरून हा वुध्याच केलेला खून आहे असें गृहीत धरून चाललें असतां आपल्या लक्ष्यांत येईल कीं ह्या खुनी माणसाला–मग तो कोणीहि असो–मयताला लवकर ह्या जगांतून नाहींसें करण्यास फार अगत्याचें वाटलें आहे. तेव्हां त्याला कारणहि तसेंच कांहींतरी जबर असलें पाहिजे. कारण त्याला ठाऊक असलें पाहिजे कीं आणखी काहीं महिन्यांची वाट पाहिली तर आपलें काम साधेल पण तितकी वाट पाहाण्याइतका त्याला धीर नव्हता. परन्तु हें कारण शोधून काढण्याचें काम आपलें नव्हे. हा खून आहे किंवा नाहीं एवढ्याच प्रश्नाचा आपणास निकाल लावावयाचा आहे. जर हा खून आहे असें तुह्मांस वाटत असेल तर तसा निकाल जाहीर करून केस पोलीसच्या स्वाधीन करावी ह्मणजे पुढचा मार्ग पोलीसखातें पाहीलच. ह्या खुनासंबंधीं इतर गोष्टींची चर्चा करणें माझ्या मतें निरर्थक आहे. तसें करण्याची मुळींच जरूरी नाहीं. आतां आपल्यासमोर आलेल्या साक्षीदारांच्या जबान्या मी लक्षपूर्वक वाचून पाहिल्या आहेत; आणि त्यांपासून पुष्कळशी माहिती मिळत आहे. विशेषतः डॉ. नियोगी व डॉ. मोहनराव यांच्या साक्षी तर फारच महत्वाच्या आहेत. कारण ते दोघेहि आपल्या धंद्यांत निष्णात असून शिवाय मयताचे अगदीं खास स्नेही होते. आतां याबर आपण जो निकाल द्याल त्यासंबंधीं मला एवढेच सांगावयाचें आहे कीं तो निकाल देतांना निरनिराळ्या वर्तमानपत्रांत जीं निरनिराळीं विचित्र विधानें केलीं आहेत, व नानाप्रकारचीं अनुमानें काढलीं आहेत, तिकडे लक्ष देऊन मात्र मनाचा समतोलपणा घालवूं नका; तर निःपक्षपातपणें समोर आहे तशी केस पाहूनच त्याजवर योग्य तो विचार करून आपलें स्पष्ट मत लवकर कळवावें.”

हें कोरोनरचें भाषण चालू असतां जी निस्तब्धता पसरली होती ती हळूहळू लोकांच्या चुळबुळीनें भंग पावूं लागली. याच वेळीं मी कस्तुरकडे नजर फेंकली; ती पुतळीप्रमाणें निश्चल, निस्तब्ध बसली होती ! तिचें सारें लक्ष्य निकालाकडे लागलें होतें !

ज्यूरीच्या मेंबरांत कुजबूज सुरू झाली: पण ती कोणास ऐकूं येण्यासारखी नव्हती. वर्तमानपत्रांचे रिपोर्टरदेखिल एकमेकांकडे विस्मयानें पाहून नंतर कांहीं बोलूं लागले ! त्याना विस्मय कशाचा वाटणार ? एकादाहि कॉलम भरण्याइतकी आज बातमीची " कॉपी " मिळाली नाहीं म्हणून त्यांची निराशा झाली होती.

ज्यूरीच्या मेंबरांत कुजबूज सुरू झालेली पाहतांच कोरोनरनें म्हटलें—

" काय निकाल द्यावा याबद्दलचा जर आपणास खल करावयाचा असेल तर आपल्या चेंबरमध्यें जाऊन खुशाल करावा "

परन्तु ज्यूरीचें कांहीं तसें मत दिसलें नाहीं. एकहि मेंबर जाग्यावरून हालला नाहीं. शेवटीं ज्यूरीच्या फोअरमनने आपला निकाल कळविला—

" आमचें मत असें आहे कीं मयताचा कोणी तरी एका अथवा अनेक व्यक्तींनीं मिळून खूनच केला आहे. "

हा निकाल ऐकतांक्षणींच मी कस्तुरकडे नजर फेंकली. तिनेंहि त्याच वेळीं चट्कन् मान वळवून चुकून माझ्याकडे पाहिलें. नंतर ती एकदम घाईनें उठली, आणि गर्दीत नाहींशी झाली. तिचा चेहरा बावरला होता व ओंठ तर सुकूनच गेले होते. तिच्या तोंडचें पाणी पळालें होतें.

संजीवन समोरच बसला होता, पण तो त्याच बाजूनें उठून गेला, तेव्हां मला त्याच्याबरोबर बोलावयास मिळालें नाहीं. जातां जातां त्यानें माझ्याकडे एकदां अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें होतें आणि त्यावरून त्याच्या मनांत त्या वेळीं काय आलें हेंहि मी ताडलें होतें. माझ्याप्रमाणेंच त्याच्याहि मनांत त्या वेळीं तें आम्ही जाळून टाकलेलें सेफ्मधील पत्र आले होतें यांत मुळींच शंका नाहीं.

त्याच दिवशीं रात्रीं सुमारें नऊ वाजतां मी डॉ. नियोगीच्या डिस्पेन्सरीमधून माझ्या घरीं यावयास निघालों होतों तोंच रस्त्यांत माझ्यामागें मला

संजीवनची शीळ ऐकूं आली. तो माझ्याकडे येत होता. आह्मी दोघेहि बरोबरच आंत गेलों. नंतर मी दिवा लावला आणि दोघेहि खुर्चीवर बसलों. आंगाला आळसाचे आळेपिळे देत संजीवन ह्मणाला—

" क्षणागणिक ह्या खुनाचें रहस्य गूढतर होत चाललें आहे बुवा ! "

" कसें तें ? " मी विचारलें

" मी आज खालीं गांवदवीकडे गेलों होतों, " तो संदिग्धपणें ह्मणाला; " वास्तविक मी माझ्या ऑफिसांत जायचा निश्चय एकल्याबरोबर, तो तिकडे न जातां खालीं जावेंसें वाटलें ह्मणून लगेच गिरगावच्या ट्रॅमनं तिकडे गेलों. "

" बरें, मग ? कांहीं नवीन विशेष ? " मी विचारलें.

" आहे, नवीन आहे आणि विशेषहि आहे. एक दोन गोष्टींची भर पडली. "

" कोणत्या त्या बुवा ! ऐकूं द्या तरी ! " मी ह्मटलें.

" अंहं ! तेवढे मात्र विचारूं नको. त्या अद्याप गृहीत धरलेल्या आहेत. त्यांची सत्यता जेव्हां अगोदर माझ्या मनाला पुरती पटेल, तेव्हां मग त्या तुला सविस्तर सांगेन. तोंपर्यंत जरा दम धर. मला माझ्या मनाप्रमाणें पुढें शोध सुरू करावयाचा आहे. "

त्याला काय दिसलें तें त्याचा मला न कळविण्याचा इरादा कां असावा हें मला कळेना. मला मात्र त्याबद्दल वाईट वाटलें. कारण एवढी तेवढी सर्व हकीगत तो मला कळवीत आला होता, आह्मी एकमेकांपासून गुप्त असें कांहीं ठेवलेंच नव्हतें. आणि आज मात्र एवढीच गोष्ट तो मला कां कळवीत नाहीं ? मला याचें कांहीं कारण समजेना.

" पण या केसमध्यें आपण एकमेकांपासून कांहीं लपवून न ठेवलेलें बरें नाहीं का ? " मी ह्मटलें.

" माफ कर ! मोहन ! माझी आपली अशी समजूत आहे कीं, आपले बेत, अगोदरच बाहेर फोडले तर आपल्या इच्छेप्रमाणें मग तें तडीस जात नाहींत, तेव्हां मला तूं पुनः पुन्हा ' नाहीं सांगत ' ह्मणावयास लावूं नको ! "

" संजीवन, संजीवन, पाहा बरें ! मला देखिल तुला असेंच कांहीं तरी सांगून तें कस्तुरचें पत्र दाखविण्याचें टाळतां आलें असतें, परंतु आपणा

दोघांचें उद्दिष्ट एकच आहे हें ध्यानांत आणून मी तें तुझ्याकडे दिलें ना ? " मी काकुळतीनें विचारलें.

" आणि तसें केलेंस तें ठीकच केलेस ! "

" तें कसे काय ? "

" कारण तें मला पाहावयास मिळालें म्हणून माझे पूर्वीचे कांहीं चुकीचे ग्रह अजीबात आतां बदलून गेले. आणि शोधाचा मार्गहि आतां मला त्यामुळें बदलावा लागला. "

" शोधाचा मार्ग बदलला म्हणतोस ? "

" होय. "

" पण अजून कस्तुर त्या मार्गांत आहेच ना ? "

" तसेंच कांहीं निव्वळ म्हणतां येत नाहीं. "

मी त्याच्या तोंडाकडे पाहिलें. त्याच्या चेहऱ्यावरून तो गूढ उकलण्यांत गढून गेला होता. त्याच्या चेहऱ्यावरून त्याच्या अंतस्थ विचाराबद्दल कोणालाहि नक्की अनुमान करतां यावयाचें नाहीं. या वेळीं तर तो मला खरें सांगतो आ कीं कांहीं तरी सांगून खऱ्या गोष्टीचा मला सुगावा लागूं नये म्हणूनच भलतं नांवें सांगून फसवतो आहे यांचा उलगडा मला होईना. तो ध होता, अनुमानें बसविण्याची त्याची बुद्धिमत्ता असाधारण होती रहस्य आपल्या मित्रापासून लपवून ठेवण्यांत जो दमदारपणा ल त्याच्या ठिकाणीं विलक्षण होता हें सर्व मला ठाऊक होतें. तथापि आयुष्याशीं ज्याचा संबंध जडला आहे त्याच्याबद्दलचा आपणाला लौ सुगावा त्यानें माझ्यापासून लपवून ठेवावा हें मला कसेंसेंच वाटलें. त्या खरोखरच जर कांहीं नवीन गोष्टींचा सुगावा लागला असेल तर तो त्यानें मला सांगणें इष्ट होतें, नव्हे तो जाणून घेण्याचा माझा हक्कच होता.

" खुनी माणसाबद्दलचा तुझा ठरलेला ग्रह बदलला आहे काय ? " मी मध्येंच प्रश्न केला.

" तसें मुळींच नाहीं. " आपली सिगार पेटवीत तो म्हणाला, " तसें कसें होईल ? आम्ही जाळलेलें पत्र विसरून चालेल काय ? "

" तर मग मत्सरानेंच हें खुनाचें कृत्य घडलें आहे—तिनेंच--"

" छे–छे–मत्सर नव्हे–मत्सरानें नव्हे. " तो माझें भाषण मध्येंच थांबवून ह्मणाला. " मला कळून आलेल्या हकीगतीवरून ते कृत्य केवळ मत्सरानें घडलेलें नाहीं. "

" तर मग द्वेषानें ? "

" नाहीं–द्वेषानेंहि नव्हे. "

" तर मग कोणत्या हेतूनें ? "

" हं. तें मला अद्याप ठरवितां येत नाहीं." अंमळशानें तो ह्मणाला. सिगारच्या मुखावरून चाललेल्या धुरांच्या वेटाळ्यांवर त्याची नजर ठरली होती " थोड्याच दिवसात कोणत्या हेतूनें ते मी तुला सांगू शकेन. "

" मला तूं आपल्या मदतीला घेशील ना ? मी कांहीं तुझ्या बाहेर नाहीं. "

" नाही, तसें मात्र आतां मला करतां येणार नाहीं. तुझी अझूनहि त्या कस्तुरवर प्रीति आहे. क्षमा कर, मला तुला मदतनीस घेतां येणार नाहीं. "

मी एक उसासा टाकला. तो ह्मणाला तें अक्षरशः खरें होतें. तिला देवीप्र-
े समजुन माझ्या हृदयाच्या देवालयांत मी तिची मूर्ति स्थापन केली होती
र्चाहि आरंभिली होती. मी तिचा उपासक बनलों होतों धंद्यांत
र्णे, धनसंपत्ति जमविणें वगैरे माझे सर्व व्यवहार तिच्याचकरितां—
.ीकरितां चालले होते. नंतर ह्या नवीन खुनाच्या चौकशीत पडल्या-
. जीं प्रणयपत्रें माझ्या दुर्दैवानें माझ्या नजरेस पडलीं तीं समग्र वाचून
.ावर तरी माझी प्रणयसेवा मला सकलंक आहेसी भासूं लागली, तरी
.यावर माझ्या उपास्य देवतेचा इतका परिणाम झाला होता कीं तो कलंक
ी अनुकूल विचारांच्या जलानें क्षणोक्षणीं धुवून पुसून टाकूं लागलों व तिच्या
वरची माझी प्रीती किंचितहि कमी होऊं दिली नाहीं. **प्रत्यक्ष प्रेमापेक्षां गतायुष्यांतील प्रणयाची स्मृतिच अधिक सुखकारक असते.**

मी उत्तरादाखल ह्मणून कांहीं बोलणार इतक्यात दार उघडलें आणि माझा नोकर आंत आला आणि ह्मणाला—

" कोणी बाई भेटावयाला आली आहे."

" बाई !" आम्ही दोघेहि एकदमच उद्गारलों.

" होय, जी." असें ह्मणून त्यानें माझ्या कानांत भेटावयास आलेल्या व्यक्तीचे नांव सांगितलें. त्यामुळें संजीवन जावयास निघाला. संजीवननें भेटावयास कोण आलें ते ताडलें असावें.

" बस्स्. मी आतां जातों" तो उठून ह्मणाला. " तिने मला इथें बसलेला पाहतां नये. हें बघ, तुला जें कांही मी सांगितले आहे तें ह्या बाईला मात्र कळतां नये एवढें बरीक लक्षांत ठेव. खरोखरच आतां तर पूर्वीचें सर्व रूप पालटलें आहे ह्या केसचें. पण आतां आह्माला उमगलें ह्याच्याहून अति विस्मयकारक, गूढतम व भयंकर भाग तो पुढेच आहे हें ध्यानांत धरून जपून वाग ह्मणजे झालें. मी जमलें तर उद्यां भेटेनच !"

कानांत सांगितलेलें नांव ऐकून मी आधींच आश्चर्यचकित होऊन गेलो होतों. कारण अशा वेळी मला तिची गांठ घेणें ह्मणजे अगदी तिरस्कारार्ह वाटत होतें. तशात संजीवनची ही बजावणी ऐकून तर मी गर्भगळितच झालों.



## प्रकरण १३ वें.

### " आल्यें आपली सहजच ! "

संजीवन मला इशारा देऊन निघून गेला आणि थोड्याच वेळांत हिरवी शाल व पांढरें शुभ्र पातळ नेसलेली कस्तुर आत आली.

आंत येण्याबरोबरच तिने सुरवात केली—

" अशा अवेळीं आपणास भेटण्यास आल्याबद्दल क्षमा होईल ना ? वास्तविक ही भेटावयास येण्याची वेळ नव्हे, पण आल्यें झालं आपली. "

मी तिला बसावयास सांगितले, पण न बसतां ती माझ्याच खुर्ची शेजारच्या दुसऱ्या खुर्चीला धरून उभी राहिली.

मी तिच्याकडे नजर फेकली. तिचे काळेभोर पाणीदार डोळे खोल गेले होते. नेहमीं लुशलुशीत दिसणारे गुलाबी गाल फिकट झाले होते. आणि तिच्या गोंडस हातावरचें बाळसेंहि निघून गेले होतें.

" कां—आज कोणीकडे अशी एकटीच ? " मी विचारले.

" मला एकटीला यावयाला का या मुंबई शहरांत कोणाची भीती आली आहे ?" येण्याचे कारण सांगण्याचें टाळले.

" कांहीं नवीन सांगण्यासारखें आहे काय ? "

" नाहीं कांही तसं विशेष. आल्यें झालें आपली मी सहजच. हल्लीं दोन दिवस आपण त्या बाजूस फिरकलांत देखिल नाहीं. त्यामुळें मला या गुंतागुंतींत सांपडल्यामुळें कुठली झक मारली आणि ताईच्या घरीं मी येऊन राहिल्ये असें मळा वाटूं लागलें आहे. "

" झाली खरी बुवा जरा हयगय आमच्या हातून. " मी ह्मणालों. " तथापि हयगय अशी नव्हेच कांहीं. कारण ह्या विचित्र प्रसंगानें अगोदरच माझें डोकें ठिकाणावर नव्हतें; आणि तशांत मागें रेंगाळत राहिलेल्या कित्येक निकडी-

च्या केसी पाहावयाच्या होत्या. हल्लीं डॉक्टर नियोगी जरा अस्वस्थ आहेत. तेव्हां त्यांचेंहि काम मलाच करावें लागत आहे. "

" नियोगी ! " भीतिजनक स्वरात ती पुटपुटली. तो स्वर माझ्या कानास जरा चमत्कारिकच लागला. " डॉक्टर नियोगीचा सहवास सुटण्यासारखा नाहीं काय ? " तिनें विनवणीच्या स्वरानें माझ्याकडे पाहत विचारलें.

" कां बरं ? " मी आश्चर्यचकित होऊन विचारलें. पूर्वी डॉ. नियोगीनींहि अनेक वेळ कस्तुरविषयीं मला दिलेली इशारत मला याच वेळीं नेमकी आठवली. या दोघांचें असें वैमनस्य कां हें मला समजेना.

" कारण मला देतां येणार नाही." माझ्या टेबलावर असलेल्या सर्जरीच्या पुस्तकांतील डायाग्रॅमूस्कडे नुसती नजर फिरवीत ती उत्तरली. बोलतांना तिच्या भुंवया किंचित् वक्र होऊन तिरस्कार दर्शवीत होत्या. " कारण काय हें मला सांगतां येणार नाहीं. पण त्याच्या सहवासात आपण राहूं नये अशी माझी विनंति आपणास आहे. "

" पण, हें पाहा !—हें मत तुझं एकटीचंच बरं कां ? डॉ. नियोगी ह्मणजे बाणेदार वर्तनाचा, वजनदार, अब्रूदार गृहस्थ आणि एवढ्या अफाट मुंबई शहरांत पहिल्या प्रतीचा डॉक्टर असें सर्वांचें प्रामाणिक मत आहे. "

" मग मी कुठं नाहीं ह्मणत्ये. एखादा राजाचें ऐश्वर्य भोगीत असेल, पण अंतःकरणानें तो तुरुंगांतील गुन्हेगाराइतकाच दोषी असूं शकेल. "

मी थोडासा हासलो. सर्वच नाहीं तरी बहुतेक माझी प्रगति ज्याच्यावर अवलंबून त्याच्यापासून अलग राहण्यास मला कस्तुर सांगत होती, हें उघड आहे. आणि असें का बरें ? मला वाटले, हिचा पूर्वेतिहास सर्व त्या गृहस्थास माहीत असल्यामुळें न जाणों, तो एखाद्या वेळीं ती सर्व आपली हकीगत माझ्याकडे बोलून जाईल, या भीतीनें हिची ही सर्व खटपट असावी.

" संदिग्ध सूचना संशयोत्पादक असतात, " मी म्हटले. " नियोगीशीं मी फटकून कां वागावें हें मला नाहींच कां सांगतां येणार ? "

" अहं, नाहीं. मी सांगितलं तर स्त्रीजातीवरील स्वार्थाचा—आपमतलबी पणाचा ठराविक दोषारोप आपण मजवर कराल. " नाइयाकडे अविचलित नजर लावून ती म्हणाली.

तिच्याकडे पाहिलं म्हणजे मलाच की काय, कोणालाहि अशीच भूल पडावी; कीं स्वर्गीय देवता जर खून करूं शकतील तरच हिच्या ठिकाणीं खुनशीपणा असल्याचा संशय घ्यावा. अगदीं निर्व्याज, निर्मळ, सौंदर्य तें ! किती सरळ, आणि किती मोहक ! तथापि तिच्यामागें सारखे भीतीचें भूत लागावें तशी तिची वागणूक ! त्या क्षणीं मात्र आपल्या पूर्वीच्या गोष्टी छपविण्याचा प्रयत्न करण्याच्या तयारींत ती होती. नियोगीवरील माझा अढळ विश्वास आपल्या स्वतःच्या गतगोष्टींचें गुपित बाहेर फोडण्यांत परिणत होईल हेंच तिच्या अंतःकरणाला डंवचीत होतें.

"नाहीं. तसं तुला वाटत असेल तर तें चुकीचें आहे. यांत तुझा कांहीं स्वार्थ असेल अशी मला मुळीं शंकाच आलेली नाहीं; " मी म्हणालों. " तूं जें कांहीं मला सांगशील तें सर्व माझ्या हिताकरितां असें मी समजतों. आतां तरी सांगशील का ? "

" मला—मला—आणखी कांहीं अधिक सांगतां येण्यासारखें नाहीं. "

" पण कां तें ? "

" कारण, उघडपणें शाबीती होण्याजोगा स्पष्ट पुरावा आपल्यापाशीं असल्याशिवाय एखाद्यावर एखाद्या गुन्ह्याचा आरोप कुणालाहि कसा बाई करतां येईल तरी ? " त्याच बुकाचीं पानें चाळीत ती म्हणाली.

" मला नाहीं समजलं तू काय म्हणालीस ते ? " मी गोंधळून विचारलें.

" त्यांत समजायचं तें काय ? सध्यां मजपाशीं असलेली माहिती अपुरती आहे; परंतु जेव्हां पुरती माहिती माझ्याजवळ होईल व जेव्हां तीच सर्व मी उघडकीस आणीन; तेव्हां तरी कृपा करून आपण त्यांचा सहवास तोडावा."

" सध्यां तुला नुसती अंदेशा आहे म्हणत्येस ? "

" होय, तसंच म्हणाना ! "

" पण कसली ती ? "

" अशा एका गोष्टीची मला अंदेशा आली आहे कीं पुढें ती ऐकण्याबरोबर आपल्या अंगावर शहारे उभे राहतील व ती ऐकत असतां शरीराची हालचाल करण्यास, श्वासोच्छ्वास देखिल घेण्यास आपण खात्रीनें विसराल ! "

आमची नजरेला नजर भिडली. मघांपासून दोघाचीहि चुकवाचुकव चालली होती. हा नेजरेचा खेळ कांहीं मारू आहे. ह्या खेपेस मात्र मला तिच्या नजरेंत माझ्याविषयींची कळकळ स्पष्ट—अगदी स्पष्ट प्रतिबिंबित झालेली दिसली. हिचा रोंख अशा कोणत्या गुप्त गोष्टीवर असावा ? आणि हें माझ्या भोंवती सारेंच गुपिताचे जाळेंच पसरलेले ! हें काय प्रकरण तरी ?

" खरोखर, मला तूं घोंटाळ्यांत घालते आहेस, " हासण्याचें मिष करून मी ह्मणालों; " खरोखरच तर मग डॉ. नियोगी इतका भयंकर आहे असें ह्मणतेस तूं ? "

" ह्मणजे, माझ्या सांगण्याची अझूनहि शंकाच घ्यावी ना ? माझ्यांत आपणाला असें वाईट तरी काय दिसतें की आपणाला माझ्या प्रत्येक सांगण्याची शंका यावी ? देवा शपथ ! मी आपणास विनवून सांगतें ना की आपण त्याची संगत सोडावी, कल्याणाकरितां सोडावी. "

" तसें नव्हे, मला तुझ्याबद्दल शंका येत नाहीं. परंतु तुझें हें बोलणें भारीच विलक्षण वाटतें बुवा ! "

" विलक्षण दिसत असेल तर दिसो बापडें; पण एक दिवशी आणि तेंहि लवकरच—हातच्या कांकणास आरसे नकोत कांहीं—एक दिवसीं मी सांगते आहे या शब्दाची आपणास प्रचीती येईल; या रात्रीची, या माझ्या येण्याची आपणास आठवण होईल. "

" ह्मणजे ? तूं ह्मणतेस तरी काय ? "

" मी ह्मणतें काय ? मी—ह्मणतें कीं ज्याच्यावर आपण पूर्ण भरंवसा ठेवून स्वस्थ राहिलां आहांत—जी उशी थंडगार भासते आहे ह्मणून आपण आराम

घेत पडला आहांत,—ती उशी नसून सापाचे वेंटाळें आहे—तो माणूस तुमच्या नाशाला टपला आहे हें तुमच्या लवकरच अनुभवास येईल. सशयानें का पाहतां ?—हो खात्रीनेंच येईल. ''

'' तो माझ्याच नाशाला टपला आहे—तुझ्या नाही ना टपलेला ? ''

'' होय, तो माझ्या देखिल नाशासाठीं टपलेला आहे. ''

हा कबुली जबाब मात्र खरोखर खरा होता. त्याबद्दल मला मुळींच शंका नव्हती; परंतु ह्या दोघांमध्यें हें वैर कसें ? हें गूढ मला उकलत नव्हतें. डॉ. नियोगीचा व कस्तुरचा मूळपासूनचा परिचयच नाहीं. तथापि डॉक्टर नियोगी व बाबा साहेब हे मात्र एकमेकांचे खरे स्नेही. तेव्हा कस्तुरचा बाबासाहेबांशीं झालेला प्रणयव्यवहार बाबासाहेबांकडूनच डॉक्टर मजकुरांस समजला असावा. कदाचित् ह्या जुळत आलेल्या संबंधांत डॉ. मजकुरांनींच खो घातला असल. आणि असेंच जर असेल तर ह्यांच्या वैराचें हें गूढ उकलणें अवघड नव्हतें.

तिच्याकडे पाहत मी बसलो असतां हे व अशा प्रकारचे विचार माझ्या डोक्यांत येऊन गेले. तिचे रिकामे हात पुस्तकें चाळण्याचा अथवा कलमदानावरील पेन घेऊन तें पुन्हा जागच्या जागीं ठेवण्याचा रिकामपणाचा व्यवसाय मधून मधून करीतच होते.

'' डॉ. नियोगीशीं तुझें भांडणबिंडण झालें आहे काय ? '' मी विचारलें.

'' भांडण ? काय बाई विचारणं तरी ? त्यांच्याशी भांडण्याचं माझं काय नडलं आहे ? '' ती स्वतःशीच बोलल्यासारखं ह्मणाली. एखाद्या विचारलेल्या भेदक प्रश्नाच्या उत्तराची उडवाउडवी करण्याची समयसूचकता तिच्या ठिकाणी अप्रतिम होती.

'' पण त्यांची तुझी थोडी तरी ओळख होती ना ? ''

'' ओळख—ओळख होती. कारण बाबासाहेबांकडे तो वारंवार येत असेच. परंतु मूळपासूनच मला त्याचा तिटकारा. ''

'' अंबुताईना त्याचा तिटकारा नव्हता. बाबासाहेबांचा—तिच्या नवऱ्याचा तो पक्का दोस्त. ''

" तिचं तसचं आहे तें. बाबासाहेबांच्या मित्रांविषयीं तिला कसलीहि शंका येत नसे. बाबासाहेबाचा मित्र झाला कीं त्याच्याबद्दल हिलाहि कांहीं वाटूं नये. नवऱ्याचे स्नेही झाले म्हणून काय झालं ! सर्वच कांहीं सारखे नसतात."

" पण खुद्द बाबासाहेबाच्याच बाबतींत तुझ्या ताई अखेरी अखेरीस हलगर्जीपणा कशा दाखवूं लागल्या हें मला काहीं केल्या कळत नाहीं. "

" मला या साऱ्या गोष्टी ठाउक आहेत, पण आज सांगतां येण्यासारख्या नाहीत. माझ्या ताईचें गुह्य मी आजच बाहेर फोडणें सुरक्षितपणाचें नाहीं. परंतु खरी गोष्ट काय ती मी जाणून आहें, आणि ती जेव्हा जगजाहीर होईल तेव्हां आजच्याप्रमाणें--जग तिला दोषी, ठरविणार नाही अशी माझी खात्री आहे. तिचा तसाच कांहीं हेतु होता. "

" नवरा आजारी असतांना गावांत फिरण्याचा हेतु ? " मी उद्गारलों. " हेतु असेल तर कामाला त्रासून वेळ घालविण्याचा ! आणखी दुसरा कोणता हेतु असावयाचा आहे ? आणि तेंहि एका अर्थी खरेंच आहे. जेव्हा जेव्हां असा हा जरठ-तरुण संबंध येतो तेव्हां तेव्हा असाच प्रकार घडावयाचा. देशावर काय किंवा कोंकणांत काय; मुंबई शहरांत काय अथवा खेड्यांत काय; मनुष्य स्वभाव एकच. नवरा बायकोच्या वयात अंतर असलें तर आवडीनिवडींत व स्वभावांत अंतर हें पडावयाचेंच; आणि स्वभावात अंतर म्हणजेच फूट. ही फूट मग भरून निघेना--"

पुढचे शब्द मी उच्चारले नाहींत—ते उच्चारणे योग्य नव्हतें. ती स्तब्ध होती. तिनें नजर आपल्या पायाच्या आंगठ्याकडे लावली होती. आपल्या ताईची कड घेण्याचा झालेला विपरीत परिणाम बघून ती अस्वस्थ झाली होती

" आपले दोघांचे विचार असेच बाहेर यावेत, म्हणजे तें बरं असतं; म्हणून मी म्हणत्यें कीं आपलं म्हणणं खरं आहे. मला देखिल तें पटतें. खरोखरच पुरुषापेक्षां बायको अधिकांत अधिक दहावर्षांहून अधिक लहान नसावी. विकारी मनानें उतावळेपणाने केलेली प्रीति चिरस्थायी असेलच असें नाहीं; ती वेळोवेळीं बदलूं शकते. शिवाय आम्हा बायकाना दुसऱ्यांकडून वाखाणणी करून

घेणें इतकें सुखकर वाटते कीं त्याच्याच करितां कित्येक स्त्रियांची सारखी धड-पड सुरू असते. बायकांना लोकांचे स्वतःविषयींचें मनोगत बहुधा तेव्हांच ताडतां येतें. म्हणूनच वृद्धाशीं लग्न करणाऱ्या स्त्रीचे मन पूर्वीच परिपक्क व सुनिश्चित झालेलें नसलें तर खात्रीनेंच तिचें पाऊल केव्हां आणि कसें घसरेल हें सांगतां येणार नाहीं. अशी स्त्री आपल्या वृद्ध पतीबरोबर आयुष्य घालवित असतां तिच्या त्या आयुष्यक्रमाकडे पाहून कोणी सहानुभूतिपूर्वक आश्चर्य व्यक्त केल्यास तिचें मन हेलकावे खाऊं लागतें. अशा स्थितीत तिनें आपली आयुष्याची मर्यादा वांकडें पाऊल न टाकतां कंठली तरी तिनें खूप मिळविली असेंच म्हणावें लागतें. ''

हें भाषण बोलतांना तिच्या आवाजांत एक प्रकारची कळकळ दिसत होती. आणि तिच्या भाषणावरून तिच्या मनावर वहिणीबद्दलच्या काळजीचें दडपण किती पडलें होतें हेंहि दिसून येत होतें. तिच्या अंतरंगांतील स्वभावसमुच्चयाचे पृथक्करण करण्याचे माझे सर्व यत्न फुटक गेले होते. या वेळीं मात्र बोलताना तिचा प्रयत्न आपल्या ताईवरचा वैवाहिक स्थितींतील दोष धुवून काढण्याचा होता. हा खून घडून येण्याच्यापूर्वीं तिनें एकवार असाच प्रयत्न केला होता; परंतु तसें करण्याचा तिनें हेतु मात्र कळविला नव्हता.

" आह्मां बायकाचे आरंभींच चुकतें, " ती पुढें ह्मणाली. " लग्नांत नव-ऱ्याला नारायण स्वरूपी ह्मटला कीं आह्मी त्याला खरोखरच सदोदित नारायण स्वरूपी मानूं लागतों. आह्माला तो लक्ष्मीस्वरुपी मानीत असतो कीं नाहीं तें पुरुषानांच माहीत. '' या वेळीं तिनें माझ्याकडे एक तीक्ष्ण कटाक्ष फेंकला. " आणि एकवार पतीला नारायण स्वरूपी मानल्यावर त्याच्या ठिकाणीं असोत वा नसोत पण सर्व सद्गुणैश्वर्यसंपन्न आपला पति आहे अशी सात्विक हिंदु स्त्री भावना धरून बसते. मला वाटतें सर्व सद्गुणांचा आरोप आपल्या पतीवर कर-ण्यांत हिंदु स्त्री एक प्रकारची चूक करीत असते. आपणाला माझं ह्मणणं खरं वाटो वा खोटं वाटो, परंतु मला तर वाटतं कीं आह्मी हिंदु स्त्रियांनीं देखिल आपल्या पतीच्या ठिकाणचे गुणदोष पूर्वीच ओळखून त्याच्या ठिकाणचे जे

मद्गुण दिसतील तेवढ्यांतच समाधान मानून दोष घालविण्याचा आपल्यापरी प्रयत्न सुरू ठेवणें हेंच अधिक श्रेयस्कर. उगीच नसलेले देखिल गुण त्याच्यांत आहेत; अशी वृथा कल्पना करून मग एखादे वेळीं निराश होण्यांत फायदा कोणता ? "

" खरंच ते, " मी तिचे तें तत्त्वज्ञान ऐकून हांसून ह्मणालों, " असें होईल तर स्त्री जातीचे पुढचे बरेच क्लेश वांचतील. पतीच्या ठिकाणीं अढळ निष्ठा हा पतिव्रतेचा बहुमोल अलंकार आहे. तथापि स्त्री जी आपल्या नवऱ्याला सर्व गुणैश्वर्यसंपन्न समजते तें कांहीं तिच्या नवऱ्याच्या .ठिकाणच्या अत्युत्कट प्रीतीचेच केवळ द्योतक नसावें. मी स्पष्ट बोलतों ह्मणून राग येण्याचें कारण नाहीं; मला वाटतें स्त्रियांच्या ठिकाणीं पोकळ डौल मिरविण्याची जी एक हौस असते तिचाच हा परिणाम असला पाहिजे. ही पोकळ डौल मिरविण्याची हौस जशी बाह्य आचरणांत तशी अंतःस्थ विचारांत देखिल असते. ह्या वृथाभिमानामुळेच ती आपल्या पतीच्या ठिकाणीं पुरुषजातीला भूषणभूत ह्मणून जे कांहीं सद्गुण आहेत तेवढे सर्व असल्याचे दर्शविते. आणि त्याचा हेतु हा कीं अशा प्रकारच्या नवऱ्याची आपण बायको असा मान आपल्या लोकांकडून मिळावा" माझें बोलणें सुरू असता मी तिच्याकडे मधूनमधून बघीत होतोंच. माझें बोलणें पटत होतें असेंच बाह्य मुद्रेवरून तरी मला त्या वेळीं वाटलें.

" होय, खरच गडे, मला दिखिल अगदीं असंच वाटतें. " तोंडावर बळेंच हस्त आणून परंतु श्वास सोडून व गांभीर्यानें ती ह्मणाली. " पदरीं पडलें नि पवित्र झालें; खऱ्या आर्य स्त्रीनें विवाहानें आपल्या पतशीं बद्ध झाल्यावर तो आहे त्याच स्थितींत आपल्याला पूर्णपणें अनुरूप आहे असें समाधान मानण्यांतच शोभा आहे. त्याच्या ठिकाणचे दोष हळूहळू जपून दूर करण्यांत ती खटपट करणारच. पण जरी दुर्दैवानें दोष दूर न होतां ते अधिक वाढले, जरी लोक त्याला हिणवूं लागले, त्याची निर्भत्सना होऊं लागली, तरी— तरी देखिल आपलें मन चळूं न देतां आपल्या पतिदेवाच्या ठिकाणीं निःसीम निष्ठा ठेवणें हेंच आमचें हिंदु स्त्रियांचें–मग आह्मांस आधुनिक शिक्षण मिळालेलें असो वा नसो–कर्तव्य. जर आह्मी पति प्रथमच सकलगुणांनीं युक्त आहे असें

मानलें तर पुढें ती समजूत खोटी झाल्यावर निश्चित कमजोरपणा येईल. तेव्हा प्रथमच काल्पनिक समजूत होऊं न देणें बरें—"

" अशा प्रकारचीं मते बनविणारीं कुमारीका स्वतः तरी सहजासहजीं फसणार नाहीं. " तिचें शेवटचें वाक्य पुरें होण्याच्या अगोदरच मी खोंचून ह्मटलें.

" मी—मी नाहींच फसणार, " ती माझी खोंच ओळखून ह्मणाली. " मी नाहींच फसायची. सर्व सद्गुणांनीं युक्त असे मी आपणास मुळीं मानीतच नाहीं. खऱ्या प्रेमाचे घटक सर्वत्र सारख्याच स्वरूपाचे असतात. त्यांची एकमेकांस ओळख पटते. हा प्रेमाचा मोबदला आहे. पण मोबदला हा शब्दच मेला वाईट ! ही प्रेमाची प्रतिक्रिया आहे ह्मणावं पाहिजे तर. दोन अंतःकरणें आपले रुचिस्वभाव, आवडनिवड इत्यादि अंगोपांगासहित एकमेकांशीं जुळलीं कीं बाहेरच्या शरीरांचे महत्वच नाहींसे होतें. बाहेरची शरीरें ही जगाला देहाचे भिन्नत्व दाखविण्याचीं लौकीक साधनें. दोन मनाचे एकीकरण होऊन तो दोन प्रेमसरितांचा प्रवाह एक होण्याकरितां वाढत वाढत जात असता आतां संगम होणार तोंच—तोंच—"

तिला जोराचा हुंदका आला, डोळे पाण्यानें भरून आले कंठ रुद्ध झाला व तिने हात रुमाल चटकन् डोळयाला धरला आणि माझ्याकडे मान पाठमोरी फिरवून मटकन् खालीं बाकावर बसली. आतापर्यंत ती उभी राहून बोलत असता मी पुनः तिला बसावयास सांगावयास विसरलोंच होतों. हा आकस्मिक प्रकार बघून मलाहि वाईट वाटलें.

" काय ? तोंच काय झालें ? " मी घाईनें विचारलें.

" तोंच काय ते माझ्याचकडून का वदविण्याचे मनांत आहे ! सांगतें तर. तोंच हा पोलीस तपासाचा खेळखंडोबा सुरू झाला. हा—हा खुनाचा पर्वत आड येऊन त्याने ते दोन प्रवास पुन्हा परतवून लावले. तसें नव्हे—" ती आपले वाक्य सुधारीत स्फुंदत स्फुंदतच बोलूं लागली. " त्यांतल्या एक प्रवाहाची दिशा कायमच होती व अद्याप आहे; पण दुसरा प्रवाह मात्र आपली दिशा फिरवून वळणें घेऊं लागला आहे. "

"काय-वळणें घेऊं लागला आहे?" मला न समजल्यासारखें करून मी ह्मणालो.
" हाय ! " ती अधिकच उसळी देऊन ह्मणाली " आपण मनमोकळेपणानें बोलावें आणि मी ऐकावं इतकी माझ्यात अद्यापदेखिल आपल्या दृष्टीनें पात्रता आली नाहीं. आपण मला दूर करण्याचा-ढकलण्याचा—विसरून जाण्याचा प्रयत्न करीत आहां, असें मला खात्रीनें वाटतें." तिने आरंभी येतांनांच आमच्या दोघांशिवाय आसपास कोणी नाहीं ही खात्री करून घेतली असतांहि ती इकडे तिकडे भित्रेपणाने पाहात बोलत होती.

पुनः एकवार हातरुमालानें डोळे पुसून झाल्यावर ती पूर्ववत् बसल्या बसल्याच माझ्याकडे तोंड करून कुठल्याहि वस्तूकडे अहेतुकपणे वेड्यासारखी पाहात राहिली. तिचा चेहरा उदासीन आणि चिंताक्रांत झाला होता. अशा सुंदर निर्विकार स्वरूपाला खुनशी अंतःकरणाची सांगड असेल असें मलाच कां—प्रत्यक्ष चित्रगुप्ताला देखिल वाटले नसतें. चित्रगुप्ताला ! परंतु स्त्रियांच्या सौंदर्यानें पुरुषाच्या पौरुषाला गोगलगाईचा मवाळपणा देऊन पौरुषाला मातीमोल करून टाकलें आहे. ह्या जगांत तरी काय ? स्त्रियांच्या सौंदर्यानं आणि मानभावीपणानेंच राज्यांची उलथापालथ आणि इतिहासाची उलटासुलट केली आहे. आणि पुरुषाचा मर्दपणा तरी कुठवर ? खंबीर पुरुष देखिल स्त्रियांच्या चुंबनानें हुरळून जाणारें, हाताच्या स्पर्शाबरोबर मार्ग लागणारें आणि दोनच अश्रूंच्या प्रवाहाबरोबर विरघळून वाहून जा[illegible] मातीचें कळसूत्री बाहुले नव्हे काय ? कैकेयीच्या [illegible] दश[illegible] थाला पुत्रप्रेमाला आचवावें लागले ! संभाजीसारखा सिंह तुळशीपुढें मा[illegible] [illegible]च्या पिलासारखा भोंवतीं भोंवतीच फिरूं लागतो ! बलाढ्य सॅमसनूची दशा डेलिप्लाच्या डोळ्यांतल्या अश्रूंनी काय केली हें मिल्टनूचें Somson Agonist वाचणाऱ्यांस सांगावयास नको. आणि आनंदीबाई प्रेमळ नव्हती तर ती क्रूर होती असे असूनहि जरी राघोबादादा पेशवे असते आणि त्यांच्या [illegible]चनांत येतें तर काय गत होती त्याचा वाचकांनींच विचार करावा. मग तो इतिहास मुलांकरिता ह्मणून गोष्टीरूप लिहिलेला असो कीं कॉलेजांतल्या विद्या[illegible]र्थींकरिता निबंधरूप असो. गर्भाशयाच्या पिशवीबरोबर कारस्थानीपणाची

पिशवीहि ब्रह्मदेवाने स्त्रियांच्या उदरांत घालून ठेविली असली पाहिजे. आणि प्रत्येक स्त्री जरी राजघराण्यांत पडली नसल्यामुळें राज्याची उलथापालथ करूं शकत नाहीं तरी प्रेमाच्या प्रांतांत शिरल्याबरोबर ती देखिल नटी बनून कारस्थानाची सूत्रें चालवावयास लागतेच लागते.

मला या वेळीं मी त्या रात्रीं वाचून फाडून टाकलेल्या पत्रांची आठवण झाली. ती आपले गुपित मजपासून दडवीत होती. बाबासाहेबांच्या इस्टेटीची मालकीण होण्याच्या तिच्या इच्छेच्या आड तिचीच बहीण आली होती. बाबासाहेबांना जर असल्या धमक्या तिनें दिल्या होत्या; तर अंबुताईबद्दल तिच्या मनांत कांहींच किल्मिष नसावें हे तरी कितपत संभवनीय आहे ? असें असूनहि जेव्हां पाहावें तेव्हां ती आपल्या बहिणीच्या दोषांवरच पांघरूण घालण्यास तयार ! यांतलीच गोष्ट काय ती मला कळत नव्हती.

" माझें प्रेम कमी होत आहे असें तुला तरी कां वाटतें ? " बोलावयास कांहींच न सुचल्यावरून मी ह्मटलें.

" काय सांगू मी ? " ती अडखळत ह्मणाली. " कां वाटतें ते मला कसं येईल ? पण मला मात्र पुढच्या भवितव्याची काळी छाया एव्हांपासून लागली आहे. संसाराच्या सागरावर तरंगणाऱ्या दोन प्रणयनौका एकमेकांनीं येऊन सांगड जुळवीत असता झंझावात सुरू होऊन त्याने त्यांना दुर्भाग्यामुळें त्या एकमेकांपासून हलकावत दूर होऊं लागल्या आहेत. त्यातली एक तर ओरवा करून राहण्यासाहि अशक्त असल्यामुळें ती आता एखाद्या खडकावर आपटून फुटते कीं काय याचाहि नेम नाहीं ! "

ती बोलली तें खरें होतें. स्त्रीप्रेमांत दाक्षिण्य आणि चाणक्षपणा कमालीचा असतो. पुरुषांचे लटकें प्रेम त्यांला फसवूं शकणार नाहीं.

तिच्या मुद्दाम येण्याचा हेतु शेवटीं मला उमगला. माझें हृदय तिनें ओळखिलें होतें. आणि माझ्या मनांतली चलबिचल ओळखून तें पुनः स्थिर करण्याकरितांच ती या वेळीं आली होती. मात्र कां आलीस ह्मणून विचारल्यावर तिनें

" आल्यें आपली अशीच " असें स्त्रीस्वभावास अनुसरून पहिलें उत्तर दिलें. एवढेच !

तिला येऊन फार वेळ कांहीं झाला नव्हता. गिरगांवाकडे जाणाऱ्या ट्राम-गाड्या सारख्या चिकार भरून चालल्या होत्या. ती जाण्याकरितां उठली तेव्हां मीहि उठलों. तिला पोंचवि त असतां मी ह्मटलें---

" त्या दिवशींच्या प्रसंगानें उगीच घाबरून जाण्याचें कारण नाहीं. तो प्रसंग, ती रात्र विसरून जावें हें बरें अं: ? "

" विसरून जाऊं ! " तिनें निराशेनें खालीं पाहात परंतु जोरानें विचारलें. " ती रात्र विसरून जाईन ? ती रात्र—तो प्रसंग विसरणें अशक्यच ! "



## प्रकरण १४ वें.

### आणखी एक विचित्र प्रकार !

हळूहळू वसंतऋतूला सुरवात झाली. थोडथोडा उकाडा होऊं लागला. आईस-क्रीम, कुलपी मलाईचे साद ऐकू येऊं लागले. अजूनहि खुनाच्या खटल्याचा निकाल लागेना. पोलीसचा शोध निष्फळ झाला. लोकांनाहि हें एक रहस्य होऊन राहिलें. संजीवननें आपल्यापरी निराळाच तपास चालविला होता; गुप्तपोलीसहि गंगाराम व इतर नोकरचाकर यांच्या पाळतीवर होतेच. तथापि कशाचाच उपयोग झाला नाही. गंगाराम जो एकाएकी नाहीसा झाला तो त्याच्या भावाच्या आजारीपणामुळें असें शेवटी उघडकीस आलें. खरा खुनी कोण आणि दुधारी सुरीनें व्हावी तशी जखम मयताच्या कुशीत कशी झाली याची कांहीं फोड झाली नाही.

माझी स्वतःची तर आताशी फारच त्रेधा उडत होती. प्रथम सरदी झाली असें डॉक्टर नियोगीकडून लिहून आलें होतें, पण त्यांचाहि सीकपणा आज जवळ जवळ एक महिनापर्यंत लांबला होता. त्यामुळें ते बोरीवलीच्या बंगल्यावरच असत. ते मुंबईंत आलेच नाहींत ह्मणून मला रात्रंदिवस कशी जरा सुद्धां फुरसत नसे बरें संजीवनहि मला हल्ली बरेच दिवसांत दिसला नाहीं. त्याचा भागीदार बाहेर गेल्यामुळें दुकानांत त्यालाच स्वतःला देखरेखी-करितां जावें लागे. रविवारीं केव्हां तरी माझ्या नजरेस तो पडे.

मी कदाचित् त्याचेकडे खुनाची गोष्ट काढलीच तर त्याने तत्काळ भुंवया चढवून, मुद्रा विचारी करून, शीळ घालीत सुस्कारा टाकावा आणि शेवटी सांगावें की आपल्या आटोक्याच्या बाहेर ती केस गेली. एक दोन वेळां त्यानें कस्तुरचें नांव काढलें होतें; पण त्यामुळें मला स्वतःला वाईट वाटेल ह्मणूनच असावें त्यानें उघड असें कांहींच सांगितलें नाहीं. तो धिम्या स्वभावाचा असल्यामुळें त्यानें अद्याप त्या केसचा पिच्छा सोडला नसावा असें मला वाटे.

त्याला कदाचित कांहीं नवीन माहितीहि मिळाली असेल; पण मला मात्र त्यानें कांहीच कळूं दिलें नाहीं. "हें मोठें गूढच आहे" असें त्यानें वारंवार मजपाशीं ह्मणावें एवढेंच.

कस्तूरलाहि मी हल्ली भेटलो नाही. कस्तुर हल्ली आपल्या एका मावसबहिणीच्या घरीं राहत होती. हिच्याच घरीं खून झाला त्या रात्रीं अंबुताई गेली होती. बाबासाहेबांच्या घरांतील सामानसुमान सर्व बाहेर काढून तें घर भाड्यानें द्यावयास तयार केलें होतें. अंबुताईला स्वस्थतेकरितां ह्मणून वांद्र्याच्या मावशीनें बोलावून नेलें होतें.

मी मात्र मोठ्याच पेचांत सांपडलों होतों. वाचक ! माझें कस्तुरवर खरें-खरें—प्राणापलीकडे प्रेम होतें. परंतु—परंतु त्या बाबासाहेबांस पाठविलेलें तें तिच्याच हातचें पत्र ना ? तर मग ती मी समजतों तितकी पवित्र नव्हती. खास—आपल्या भाषणावरून भासविते तितकी ती सुशील नसावी. मनानें तरी तिनें प्रथम बाबासाहेबास आपला पति मानिलें होतेंच कीं नाहीं ? तिच्या अंतःकरणांत द्वेषाग्नीचा वणवा पेटत होता.

याचकरितां मी हल्लीं तिला भेटण्याचें बंद केलें होतें. जेव्हां जेव्हां मला कस्तुरची आणि तिच्या माझ्या मधून मधून घडून आलल्या थोड्याशा सहवासांतल्या गोष्टींची आठवण होई; तेव्हां तेव्हां कसलें ना कसलें काम काढून त्यांत वेळ घालवावा व त्या गोष्टी विसरण्याचा मी प्रयत्न करावा. प्रेमभंग झालेल्या प्रणयीजनांचें असेंच असतें. डॉक्टर लोकांचें—विशेषेंकरून अविवाहित डॉक्टरांचें आयुष्य मोठें रहस्यमय असते अनेक प्रकारच्या स्वभावाच्या माणसांशीं त्यांस वागणें भाग पडल्यामुळे एका ना एका मार्गानें तरी त्यांची करमणूक होतेच. लोकांच्या मर्जीवर अवलंबून असणारा डॉक्टरीसारखा दुसरा कोणताहि धंदा नाहीं. आपलें कूळ राखून धरणें हें डॉक्टराचें मुख्य कर्तव्य असतें. रोगी लोकांत अविवाहित प्रौढ कुमारिका असल्या आणि डॉक्टरहि जर का अविवाहित असला, तर केवळ उत्साह जाणण्याकरितां ह्मणून उच्चारलेला एखादा शब्द मुद्दाम ह्मणून नं उच्चारल्यामुळें स्वतः डॉक्टर बिचारा

विसरून जातो, परंतु त्याचा भलताच अर्थ करून ह्या आजकालच्या कादंबऱ्या नाटकें वाचून प्रणयी बनलेल्या कुमारिका त्यांतच प्रणयाचें बीज शोधून त्याचा वृक्ष करून वाढवित असतात. त्यांना त्यांतच एक प्रकारचा आनंद वाटत असतो. बरें, म्हणून फाजील गंभीरपणा आणि मितभाषीपणा धरून बसावें म्हटलें तरी कांही रोग्यांची मर्जी खप्पा होतेच होते. तेव्हा थोड्या सहवासानें प्रत्येकाचा स्वभाव ओळखून त्याप्रमाणें वागणूक करणें डॉक्टरास भाग पडतें. कारण खूष अथवा नाखूष होऊन गेलेलें प्रत्येक गिऱ्हाईक आणखी पन्नास रोग्यांस पाठवील अथवा परतवील हें खास ! तथापि ही भीती आपल्या इक-डल्यापेक्षां तिकडे युरोपांतल्या राष्ट्रांतच फार. तितकी सामाजिक शिथिलता अजून इकडे सुरू झाली नसल्यामुळें असे प्रसग क्वचितच घडून येतात. तिकडे तर अशा कांहीं बायका असतात कीं डॉक्टरला बोलावणें म्हणजे एक करम-णुकीचें साधनच असें त्यांस वाटतें; इतकेच नव्हे तर मर्जीस येईल तेव्हां आजारीपणाचें ढोंग करून डॉक्टरला बोलावणें पाठवून गप्पासप्पा करणें हें आपलें त्यांचें नेहमींच चालू असतें.

आतांपर्यंत घडलेली ही जी विचित्र कथाप्रसंगाची परंपरा मी तुम्हास सांगितली, त्यांत वाचक हो ! असत्याचा लेशहि नाही. पुढें आतां जें कांही मी तुम्हांस आश्चर्यानें थक्क होऊन जाण्यासारखें सांगणार आहे तेंहि सर्व खरें खुरें घडलेलें आहे. ह्या साऱ्या माझ्या आयुष्यांतल्या गुह्य गोष्टी मीं तुमच्यावर पूर्ण विश्वास ठेवून तुम्हास गुप्तपणें सांगत आहें. त्यांत मीं कांहीं तुम्हापासून चोरूनहि ठेवणार नाही, कीं कशास तिखटमीठ लावूनहि सांगत नाहीं; जे जसें घडलें तसेंच मी तुम्हास सांगत चाललों आहें. विलायतची परीक्षा पास होऊन आल्यामुळें, डॉक्टर नियोगींचा सहकारी बनल्यामुळें व कांहीं आंगच्या बऱ्या-वाईट गुणामुळें जरी मला लोक नामांकित डॉक्टरांत गणूं लगत होते तरी मी कांहीं कोणी असाधारण धन्वंतरी नव्हतों. माझ्यासारखे नव्हे माझ्याहून हुषा-रीनें व अनुभवानें श्रेष्ठ असे असंख्यात डॉक्टर मुंबई शहरांत पडून गेले होते. तथापि आमच्या या इहलोकींच्या थोड्याशा जीवितावधींत आमच्या धंद्यांत आम्हास यशापयशाचे वांटेकरी करणारी, आमच्या सुखदुःखाचीं सूत्रें हातांत

धरून आम्हाला बाहुल्यांप्रमाणे नाचविणारी एकादी कोणी तरी स्त्रीच असते—एकादी यःकश्चित स्त्री !

तिनें त्या दिवशींच्या भाषणांत सांगितल्याप्रमाणे खरोखरच आमच्या दोघांच्या जीवित--नौका दोन बाजूस वाहून जात होत्या; त्यांचा संगम घडून येण्यापूर्वींच त्यांस आपापली दिशा बदलावी लागत होती; अथवा तिचेंच ह्मणणें खरें मानलें तर मीच तिचा नाद सोडून देऊं लागलों होतों.

मे महिन्याचा रविवार. सकाळींच मी आर्मचेअरवर नुकताच आलेला आयुर्वेदाचा अंक चाळीत बसलों होतों. रविवारीं काय ती थोडीबहुत विश्रांति मला मिळालीच तर मिळावयाची. पण आज देखिल ती मला मिळावयाची नव्हती. माझा नोकर आंत आला. श्रीमती सरस्वतीबाई ढगे यांचा माणूस आपल्या धनिणीचें आमत्रंण घेऊन आला होता. या वेळीं बाहेर जाणें अगदीं माझ्या जिवावर आलें होते. परंतु श्री. सरस्वतीबाई ह्या डॉ. नियोगींच्या महत्वाच्या पेशंट्‌पैकीं एक; तेव्हां जाण्याचें टाळणें कांहीं शक्यच नव्हतें. ती नेहमींचीच आजारी असावयाची. तिचें बोलावणें आलें कीं खुद्द डॉ. नियोगी देखिल बाकी सर्व केसीस्‌ बाजूला ठेवून तिकडे जावयाचेच. तेव्हां मी निमूटपणें कपडे करून तिकडेच गेलों.

तिला पाहण्याबरोबर मला केस जरा अवघडच दिसली. आणि बाईच्या सीकपणांत प्रथम पासूनच डॉक्टरसाहेब स्वतः त्यांना तपासीत असल्यामुळें प्रकृतींत एकाएकीं झालेला बिघाड मला समजण्यासारखा नव्हता. ही विधवाबाई एका खानदानीच्या श्रीमंत घराण्यांतील असून हिच्या ओळखीनें डॉक्टर साहेबांस आरंभीं आरंभीं बरेच रोगी मिळाले होते. सुमारें दोन तास मी तेथें बसून राहिलों. परंतु एकंदर चिन्ह कांहीं ठीक दिसेना. तेव्हां बाईची रजा घेऊन मला डॉ. साहेबांच्या बंगल्यावर बोरीवलीस जाणेंच इष्ट जाहले. कारण बाईची उपेक्षा करतां येण्यासारखी नव्हती. माझ्या मनांतील हा बेत मी बाईस कळविल्यावर त्याहि खूष झालेल्या दिसल्या. तेव्हां रात्रीं दहा वाजेपर्यंत येतों असें सांगून मी बोरीवलीस जाण्यास निघालों.

डॉक्टरसाहेबाचा बंगला उत्तम होता. डॉक्टरीच्या रोजच्या कटकटींस कंटाळून जाणाऱ्या डॉक्टरास कांहीं दिवस विश्रांति घ्यावयास योग्य अशाच हवाशीर ठिकाणीं तो बांधला होता मुंबईच्या त्रासाच्या वस्तीस कंटाळल्यावर अशा खेडेगांवांत एकांत स्थळीं राहण्यांत फारच मौज असते. मी या ठिकाणीं पूर्वी कारणपरत्वे अनेकवार आलों होतों. ह्मणूनच मी आंत गेल्याबरोबर नोकरानें त्या वेळीं बंद असलेला डॉक्टर नियोगींचा बसावयाच्या खोलीचा दरवाजा उघडून दिला.

" डॉक्टरसाहेब आंत आहेत. आपण आल्याची वर्दी मी त्यांस देतों " असें ह्मणून तो निघून गेला. मी त्या खोलीत एकटाच राहिलों. ही खोली प्रशस्त दिवाणखान्याच्या मागच्या बाजूस होती. मी समोरील खिडकीकडे गेलों. पलीकडे लहानसा बगीचा होता. तिकडे जातांना डॉक्टरसाहेबांच्या टेबलावर माझी नजर गेली. टेबलावर एक कोरा कागद पडला होता. त्याच्यावर कांहीं बिरकून टाकलेलें मला दिसलें. ह्मणून मग मी मुद्दाम तेथें जाऊन वांकून पाहिलें, तो काय साराच विचित्र प्रकार !

कारण त्या कागदाच्या शेजारीं मी स्वत: डॉक्टरास पूर्वी पाठविलेलें एक पत्र पडलें होतें. आणि त्या कोऱ्या कागदावर माझ्या अक्षरासारखे हुबेहूब अक्षर काढण्याची प्रॅक्टिस चालली होती. बऱ्याच ओळी माझ्याच अक्षरासारख्या अक्षराच्या दिसत होत्या.

माझ्या अक्षरांतील विशिष्ट खुब्या बरोबर ओळखून त्याच वळविण्याचा प्रयत्न केलेला स्पष्ट दिसला; पण हें एवढें कशाकरितां ?

मी खालीं वांकलों आणि तीं अक्षरें किती काळजीपूर्वक वळविलीं होतीं, तें पाहूं लागलों. तोंच शेजारच्या दिवाणखान्यांतून एका स्त्रीचा शब्द माझ्या कानीं आला. त्याबरोबर दिवाणखान्याच्या भिंती शेजारीं जाऊन त्या खोलींतून कानोसा घेऊं लागलों. कारण डॉ. नियोगींच्या घरांत बायको माणूस कोणी नव्हतें, हें मला ठाऊक होतें.

मला वाटलें, कोणी तरी स्त्रीरोगी भेटावयास आलें असावें. परंतु पुढे तर तीं दोघेंहि एकमेकांशीं भांडत असावीं असें वाटूं लागलें. प्रथम प्रथम दोघां-

चाहि स्वर हळू होता, त्यामुळें ती काय बोलत होती हें समजत नव्हतें तथापि पुढें पुढें तो स्वर वाढत चालला व शेवटीं तर एखादे बेंड बाहेर फुट त्यामुळेंच जशी कांहीं भीती वाटून त्या स्त्रीनें किंकाळल्यासारखे केलें.

" समजलं ! समजलं बरं मला सारं कारस्थान आतां ! " ती स्त्री ओरडून ह्मणाली. माझा विश्वासघात केला आहेस तूं; भेकड कुठला ! स्वतःला पुरुष ह्मणवतोस ? स्त्रीचा आत्मा कसायाला विकणारा भेकड स्वतःला पुरुष मानतो !'

" तोंड आटोप ! " हे घोगऱ्या व बसक्या आवाजाचे परंतु धमकीनें व रागानें जोरांत उच्चारलेले शब्द डॉक्टर नियोगींच्या तोंडचे होते, हें मी तेव्हांच ओळखलें. " कोणी ऐकेल एकादें ! ह्या गोष्टीच्या गुप्तपणावरच तुझा सुरक्षित पणा आहे हें विसरूं नकोस. "

" राहूं द्या ! मी खरं तेंच सांगणार. " ती करारी स्वरानें ह्मणाली.

" हरकत नाहीं ! " डॉ. नियोगी हांसत तिरस्कारानें ह्मणाले. " खरं सांग आणि स्वताचा सत्यानाश करून घ्यावयास तयार हो ! "



## प्रकरण १५ वें.

### नवी माहिती.

ह्या आंत चाललेल्या गडबडीनें डॉक्टरसाहेबांच्या चेहऱ्यांत बराच फरक घडवून आणला होता; कारण बाहेर येतांच माझी व त्यांची दृष्टादृष्ट होतांच त्यांचा चेहरा आणखी अधिक शरमल्यासारखा दिसला.

" एका माथेफिरू माणसाला मी तपासीत होतों " डॉ० साहेब आपल्या नेहमींच्या समयसूचकतेनें बोलले. आंत चाललेला प्रकार माझ्या लक्ष्यांत आला कीं काय हेंहि त्यांला पाहावयाचें होतें. तेव्हां ते ह्मणाले " ही एक माथेफिरू बाई आहे. तिला बंदींत ठेवावी असे तिच्या माणसांचें मत आहे. तथापि सर्टिफिकेटावर लिहिण्यास जीं जीं कारणें लागतात तितकीं अद्याप हिच्या वेडे-पणांत दिसत नाहींत. त्या खोलींतून आपण ऐकलेंच असेल आमचें चाललेलें संभाषण ? " इतकें विचारून डॉ० साहेबांनीं चष्म्यातून आपली तीक्ष्ण नजर मजवर भेदकपणें रोंखली.

" मला कांहीं ध्वनि–ह्मणजे बोलत असल्यासारखे आवाज ऐकूं आले खरे ! पण स्पष्ट शब्द कांहीं समजले नाहींत. " मी मुद्दामच खोटें उत्तर दिलें. कारण माझ्या कानांत पडलेलें भाषण इतकें विचित्र होतें कीं तें मी ऐकलें ह्मणून त्यांस सांगणें योग्य नव्हतें.

पहिल्या प्रश्नांत मला इतकें तपासल्यावर डॉक्टरसाहेबांस धीर चढून ते पुढें ह्मणतात–"मेंदूच्या बिघडाबिघडीनें वेडावलेल्या इतर स्त्रीरोग्यांप्रमाणेंच हिलाहि आपणास तपासणाऱ्या डॉक्टराची चीड येते व भीतीहि वाटते. हिला मी ह्मणजे कोणी राक्षस आहे असें वाटतें. " डॉ० थोडेसें हंसून पुढें ह्मणतात " हिच्या बरोबर आणखी एकदोन माणसें होती ह्मणून बरें; नाहीं तर हिनें आतांच माझें नाक ओरबडलें असतें. माझ्या नाकावरच हिचा सारा रोंख होता " इतकें ह्मणून डॉक्टर मागें रेलून मनमुराद हांसले. त्या त्यांच्या हांस-ण्यामुळें त्यांचा मनमोकळेपणा दृष्टोत्पत्तीस येऊन माझ्या मनांत वरील संभा-

षण ऐकून उठलेल्या अनेक शंकाहि बहुतेक नाहींशा होत गेल्या. तथापि त्या अजीबात नाहींशा झाल्या नाहींत. माझ्या जागीं तुझी असतां तरी देखिल त्या नाहींशा झाल्या नसत्या. त्याला कारणहि तसेंच होतें. कारण ते शब्द एका स्त्रीचे व डॉक्टर नियोगीचेच केवळ नव्हते; तर त्या स्त्रीचा आवाज माझ्या परिचयाचा होता. परिचयाचा शब्द परिचित माणसास तेव्हांच ओळखता येतो. मी ऐकलेला आवाज माझ्या समजुतीप्रमाणे तर माझ्या कस्तुरचाच होता. व याबद्दल मला शंका नव्हती!

तथापि याबद्दल उगाच संशय व्यक्त करून डॉक्टरसाहेबास अगोदरच सावध करून ठेवणें उचित नव्हतें. या गोष्टीचा छडा मागून लावला पाहिजे असा निश्चय करून मी ज्या कामासाठी आलो होतो तें बोलणें काढिलें आणि डॉक्टरसाहेबांचें मत घेऊन मी संध्याकाळीं मुंबईस गेलों.

डॉक्टरसाहेबाच्या बिऱ्हाडी त्यांच्या सैपाक्यानें आणून दिलेला चहा घेत असतां मी डॉक्टरसाहेबांशीं वेड्या माणसाच्या अनेक प्रकारच्या खोड्याविषयीं बोलत होतों. पण डॉक्टरसाहेबांनीं कांहीं या विषयांत विशेषसें लक्ष घातलें नाहीं. त्यांच्या तुटक उत्तरावरून त्यांना त्या वेळीं त्या विषयावरील बोलणें रुचत नसावेंसें वाटलें आणि त्याचा निरोप घेऊन बाहेर पडत असतानाची त्याची वागणूक तर फारच चमत्कारिक दिसली! डॉक्टर ह्मणजे जरासे तऱ्हेवाईकच होते. त्यांची तब्येतीची तक्रार, लहरी स्वभाव वगैरे सर्व कांहीं मला ठाऊक होतें. परंतु या वेळचा प्रकार कांहीं निराळाच होता. दवाखान्यांत ते सरदीतापाच्या सीकपणामुळें येत नव्हते; परंतु तसे चिन्ह कांहीं मला उमगलें नाहीं—सीकपणा असलाच तर तो सर्दीतापाचा खास नसून दुसरा कांही तरी असला पाहिजे असें माझें मत ठाम ठरलें.

रविवारीं संध्याकाळीं मुंबईला येणाऱ्या गाड्या अगदीं गर्दीच्या असतात. बाहेरून येणारीं उतारू माणसे, त्यांतच शनिवार रविवारच्या सुटींत आसपासच्या आपआपल्या गांवीं गेलेले सरकारी नोकर, व आठवड्याच्या रजेंत बाहेर ट्रिप करून येणारे लोक वगैरे लोकांनीं रविवारच्या गाड्या चिकार भरलेल्या अस-

तात. आजच्या रविवारींहि असाच प्रकार होता. बोरीवली स्टेशनवर गाडी आली, त्या वेळीं मला स्टेशनवर येऊन पोंचावयास जरासा विळंब झाल्यामुळें माझी घाई झाली होती. बोरीवली स्टेशन कांहीं मोठेसें नाहीं. पण नेहमींच्या मानानें पाहता आज गर्दीहि बरीच होती. मुंबईतील लोकल गाडयांत नेहमी फिरणारे व निर्ढावलेले पॅसेंजर थर्डक्लासचे तिकिट काढून अगर तिकीटहि न काढतां एकदम सेकंडक्लासमध्यें बसणारे बरेच असतात मी घाईघाईनें जाऊन एका सेकंडक्लासच्या डब्यात जाऊन बसत आहे तोंच माझ्याच डब्याकडे चुकून धांव घेणाऱ्या एका स्त्रीकडे माझी नजर गेली आपली चूक लक्षात येताच ती तिथून परतून स्त्रीकंपार्टमेंटकडे वळली. तथापि तत्पूर्वी मात्र तिला पाहून मला कसेसेंच झालें. ती भीतीनें गांगरून गेल्यासारखी दिसली. तिची छाती श्वास लागल्याप्रमाणे खालींवर होत होती दिसण्यात ती जरी सौंदर्यसपन्न नव्हती तरी कुरुपहि नव्हती. जाता जाता तिने चटकन् माझ्याकडे पाहिलें आणि तें माझ्या लक्षांत येतांच तिनें आपली मान फिरवून खालीं घातली आणि तिथून निसटली.

त्याच क्षणीं माझ्या डोक्यांत असा एक विचार येऊन गेला की मी तिला पूर्वीं कधीतरी पाहिली असावी. कोठे व कोणत्या स्थितीत तें मला नक्की आठवेना. बोलण्यास तयार झाल्यासारखे दिसणारे तें ओंठ, तो काहीसा फिकट चेहरा, गालाच्या खळग्या, अति काळेभोर डोळे ही सर्व अगदी पूर्वीं मला पाहिल्याप्रमाणें वाटली. मी सुमारें अर्धा तासपर्यंत डोके खाजवून पाहिले, परंतु मला कांहीं स्मरण होईना. कदाचित् मी तिला सरकारी हॉस्पिटलात पाहिलें असेल. कारण मुंबईसारख्या अफाट शहरांतील जगी दवाखान्यात डॉक्टरच्या डोळ्याखालून इतकी माणसें जातात की त्यांतील एकाद्याची आठवण राहणें शक्य नसतें. रस्त्यांत कित्येक लोकांनीं मला नमस्कार करून अगर मला शेकहँड् करून आभार मानले आहेत; पण मला त्यांना पाहिल्याचें देखिल आठवत नाही. आजारी असतांना दहा पंधरा दिवस आथरुणावर पडल्यावर दाढी वगैरे वाढून शरीरात व चेहऱ्यांत पडलेल्या फरकामुळें तोच माणूस सुधारून बरा झाल्यानंतर कांही दिवसांनीं नीटनेटक्या पोषाखांत भेटला असतां त्याची

खरोखर एकाएकी ओळख पटणे शक्य नसते हें बऱ्याच जणास कळत नाहीं. त्याचप्रमाणे केस सुटून अस्ताव्यस्त पडलेले, चेहरा काळवंडलेला, डोळे खोलवटलेले अशा प्रकारची एकादी आजारी स्त्री साफ बरी होऊन ती कांहीं दिवसानी सुंदर पोषाखांत जाताना दिसली तर तिला औषध देऊन बरा करणाऱ्या खुद्द डॉक्टरासच तिला ओळखण्याची मात्रा चालणार नाहीं. आणीबाणीच्या वेळी अत्यंत आजारानें कृश होऊन अंथरुणांत अमंगळपणें पडणारी स्त्री राणी असो वा तिची दासी असो, दोघी सारख्याच दिसतात.

जाण्यापूर्वी तिने एकदोनदा माझ्याकडे मधून मधून माझी नजर चुकवून आपण पूर्वी पाहिलेल्या माणसास ओळखण्याकरिता जसें पाहतो तसेंहि तिने पाहिले होते, व तिच्या उडणाऱ्या धांदलीत माझ्याशी बोलण्याची तिला इच्छा झाली होती हेंहि मी ओळखले होते. कदाचित् दवाखान्यांत आलेल्या श्रीमंत स्त्री रोग्याची ती सेविका असेल! कोण असेल ? फीमेलवार्डमध्यें अशा कितीतरी स्त्रिया आमच्या रोज बघण्यांत यावयाच्या.

मी गाडीत बसून गाडी चालू झाल्यानंतर मात्र त्या स्त्रीबद्दलचे विचार थोडयाच वेळात माझ्या डोक्यांतून निघून गेले व बोरीवली येथील डॉ. नियोगींच्या बंगल्यातील त्या रहस्यमय संभाषणाचा प्रकार मला आठवला. मी विचार करता करतां ती बोलणारी स्त्री कस्तुरच होती असें मला ठामपणें वाटं लागलें.

एकाद्या माणसाचें लक्ष एकाच विषयाकडे लागलेलें असलें तर व्यवहारांत देखिल त्याला तद्विषयकच संबंध असलेल्या सर्व गोष्टी दिसतात. समजा कीं, एखाद्या दिवशीं तुमच्यापासून फार दूर असलेल्या तुमच्या निकट स्नेह्यासंबंधीं विचार तुमच्या मनात घोळत आहेत. कित्येक वर्षें तुह्मी त्याला पाहिलेलें नाहीं. मोठया शहराच्या रस्त्यांतून तुम्ही चालला असतां दर घटकेस शेंकडों लोक तुमच्या कुशीनें चालले आहेत. चटकन विजेच्या कळीसारखा एखादा माणूस तुमच्या समोरून तुमच्या देखत गर्दीत मिसळून निघून जातो; आणि आश्चर्य असें की त्याच्या सर्व अवयवांचें साम्य तुमच्या दूरच्या स्नेह्याशीं अगदीं

तंतोतंत जुळते ! तथापि तुह्माला त्या व्यक्तीला तुमच्या स्नेह्याच्या नांवानें हांक मारण्यास धैर्य होत नाहीं. कारण तो त्या वेळीं त्या ठिकाणीं येणें शक्य नाहीं हें तुह्माला पूर्णपणें ठाऊक असतें व तो माणूस तुमचा स्नेही नव्हे हेंहि तुम्ही जाणतच असतां. थोड्या वेळांत पुनः एखादा तसाच दुसरा माणूस दिसतो, पुनः तुमची निराशा होते; तासाभऱ्यानें पुनः एखादा अगदीं हुबेहूब तुमचा मित्रच असा तिसरा माणूस तुम्हाला भेटतो ! असा प्रकार घडलेला तुमच्या अनुभवाचा असेल ! हा मेंदूचा खेळ ह्मणावयाचा कीं काय ? आपल्याला तर बुवा काहीं कळत नाही. ह्याचा उलगडा करणारे मानसशास्त्रवेत्ते पाहिजे. तसा करोत बापडे !

माझी स्थिति अशीच कांहींशीं झाली होती. अगोदरपासूनच माझ्या मनांत कस्तुर विषयींचे विचार घोळत असल्यामुळें त्या दिवशीं ऐकूं येणाऱ्या शब्दांपैकीं बहुतेक कस्तुरच्या शब्दांसारखे वाटत. ह्मणूनच बोरीवली येथील डॉक्टर नियोगीच्या बंगल्यांत ऐकलेला स्त्रीचा शब्द तो खरोखरच कस्तुरचा कीं काय असा मला भास झाला. ह्मणजे माझ्या मेंदूचा खेळ? अशी शंका आतां डोकावू लागली. कसें असलें तरी कस्तुरप्रमाणेंच त्या स्त्रीनें देखिल डॉक्टर नियोगीबद्दल तिरस्कार व्यक्त केला होता. आणि नियोगींनी तर तिची हेटाळणी करून आणि कठोरतेनें तिच्या ह्मणण्यांतील प्रत्येक शब्दांची अवहेलना व आपल्या सामर्थ्याच्या ठिकाणीं पूर्ण भरंवसा दिग्दर्शीत केला होता.

ग्रँटरोड स्टेशनवर गाडी येतांच ती गाडीतील फिकट चेहऱ्याची स्त्री तेथेंच उतरली आणि गर्दींत मिसळून थोडक्याच वेळांत दिसेनाशीं झाली. बहुतेक नळबाजाराच्या बाजूलाच तिनें कोचमनास विक्टोरिया हांकावयास सांगितल्याचा मला भास झाला.

उतरून विक्टोरियाकडे जात असतां तिनें पुनः एकवार मजकडें पाहिलें. तिलाच पाहण्याकरितां मी देखिल टोंकावर बसून खिडकींतून बाहेर तोंड काढून बघितच होतों. माझ्याकडे बघतांना तिनें स्मितहास्य केल्याचा भास झाला. तें हास्यच असें होतें कीं त्यावरून तिनें मला ओळखलें की काय असेंच

मला वाटू लागलें मधल्या स्टेशनवर कुठेंहि व केव्हांहि माणसांची चढण्याची व उतरण्याची एकच गर्दी उडत असते. आमच्या दोघांच्या नजरे आड अनेक माणसें आल्यामुळें तिला उत्तरादाखल माझ्या तोंडावर आणलेलें हास्य तिच्या नजरेस न आल्यामुळें तें फुकट गेल्यासारखें मला झालें! अशारीतीनें मला एका नव्या रहस्यात गुंतविणारी ती स्त्री—ती कृशांगी—चट्कन मला विचार करीत ठेवून अदृश्य झाली !

मी बिऱ्हाडी पोंचलों, तों कस्तुरच्या आईचा निरोप घरीं माझी वाटच पाहत होता. काळबादेवीच्या अलीकडे मनसुख बिल्डिंगमध्यें कस्तुर व अंबुताई यांची आई राहत होती. नवऱ्यानें मागें ठेवलेल्या इस्टेटीवर गुजराण करणारी ती विधवा आपल्या मुलीच्या चिंतेनें सुकून जात होती. तिचा नवरा व्यापारी होता. त्याची स्वतंत्र पेढी होती. तो स्वतः फार कंजूष होता. परंतु अंबूताईचें लग्न झाल्यावर फारच थोडया दिवसांनी तो मेल्यावर मात्र अलीकडल्या पलीकडल्या लुच्चांनी बराच हात फिरविल्यामुळें त्याच्या बायकोच्या पदरांत फारच थोडा ऐवज पडला. परंतु त्याशिवाय त्यानें थोडेंबहुत व्यॅंकेंत ठेवल्यामुळें तो कांही अगदीच फसला नाहीं व हिला उपासमारीची पाळी आली नाहीं.

तिच्याकडे महिन्या दोन महिन्यांतून एखादी खेप माझी होत असे. ती सुस्वभावी व प्रेमळ बाई होती. आज आतां इतक्या सायंकाळीं जायचें म्हणजे रात्रीचा मुक्काम तिथेंच होणार हें ठरल्यासारखेंच होतें.

मी लगेच चर्चगेट स्टेशनवरून मरीन लाईन्स स्टेशनवर उतरलों आणि पीरभॉय मॅनशन्सवरून मनसुख बिल्डिंग गांठली. दादर चढून वर जातांच बाईनीं मला पाहिलें व आंतील तयारीस त्या पुढें गेल्या. मी आंतें जाऊन बसतों तोंच फराळाचें पुढें आलें. शंकरपाळे, शेव, शिरा वगैरेचा समाचार घेऊन चहापान झाल्यावर मी मला बोलावण्याचें कारण विचारलें.

" मला एका बाबतींत तुम्हाला कांहीं विचारावयाचें आहे, म्हणून आज मुद्दाम बोलावणें पाठविलें. या प्रसंगानंतर आपण आजच प्रथम येत आहांतें हे. "

"खुद्द तुमच्यावरच्या प्रसंगानंतर आजचा हा दुसरा भयकर प्रसंग तुमच्यावर कोसळला आहे. काय करणार त्याला ? कोणाच्या का स्वाधीनच्या ग ष्टी असतात ह्या असल्या ? ईश्वर ठेवील तसें राहिलें पाहिजे." मी शांतवनाच्या शब्दांनीं ह्मटलें. खरोखर बाई आपल्या मुलीवरच्या आपत्तीनें काळजीनें झुरत होत्या.

" माझ्या जिवाला आतां उतार वयांत हा खेद झाला हो डॉक्टर ! लोक आह्माला ह्मातान्या नवऱ्याला दुसरेपणाला मुलगी दिली ह्मणून दूषणें देतात. पण खरं ह्मणाल तर हें लग्न नवरानवरीच्या संमतीनंच झालं होतं. अंबेवर कोणत्याहि प्रकारचा आमचा जुलूम नव्हता. पोरीला एखादं पोरबाळ झालं असतं तरी पुरें होतं, पण तसं दिखिल बघायचं माझ्या नशिबांत नाहीं आणि आतां पोरीच्या जन्माचं मातेरं होऊन गेलं ! काय क ील बिचारी." बाईंनी डोळे पुसावयास सुरवात केली. " पोरीवर तर आकाश फाटलं आहे खरोखरच डॉक्टर तुह्माला सांगत्यें, ती दोघेंहि सुखासमाधानानं राहत असलेलीं ऐकून माझ्या जिवाला किती समाधान वाटे ह्मणून सागूं तुह्मांला ! तिचं आपल्या नवऱ्यावर तसंच प्रेम होतं ! "

हं ! तिचें नवऱ्यावर प्रेम ! मला पण हे शब्द कसे खरे वाटणार ? तथापि आईची आपल्या मुलीच्या संसारिक सौख्याची कल्पना अशीच अपुरती असते. आणि मुलीदखिल होतां होईतों आपलीं घरचीं दुःखें आपल्या आईपासून बहुतेक लपवून ठेवीत असतात. पतिसुखाबद्दलच्या सुखदुःखाच्या गोष्टी—विशेषतः दुःखाच्या गोष्टी बहुतांशी हिंदु मुलगी दुसऱ्या कोणास कधींच कळूं देणार नाहीं. तेव्हां माझ्या मतें या बिचारीचीदेखिल अशीच फसवणूक झाली होती.

" होय " मी म्हणालों. " अंबूताईवर आभाळ कोसळलेंच आहे. परंतु तुमच्यासारख्या वडील माणसांनीं अशा प्रसंगीं धीर धरून त्यांचें समाधान केलें पाहिजे. त्या तुह्मीच अशा हातपाय गाळूं लागलांत तर त्यांनीं काय बरें करावें ? "

" हल्लीं कळलं का विशेष कांहीं ? "

" का—ही नाहीं हो ! "

" अरे देवा ! पोरी तर सारखी जमिनीत चालली आहे ! जसजसे अधिक दिवस होतील तसतशी थोडथोडी विसर पडेल म्हणून मी बघते; तर उलट माझं कपाळ ! तें तिच दुःख अधिकच वाढत जातं काय करूं आतां ? "

" अबूताई अजून मावशीकडेच आहेत वाटत ? " मी विचारलें.

" नाहीं, ती आताशा इथे आली आहे. तिला पाहून, तिच्याशी चार शब्द बोलून तिच्याबद्दल आपल ॰ त घ्यावं म्हणूनच मी तुम्हाला आज मुद्दाम बोलावणं पाठविल. "

" म्हणजे ? तिची प्रकृति बिघडलीय् की काय ? "

" तिला काय होतय् तें तिलाहि कळत नाही, मला तर मुळीच समजत नाही. आपल्या नवऱ्याच्याच गोष्टी ती सदान्कदा सारखी पुटपुटत असत्ये. केव्हा केव्हां तर मी तिला आपल्या नवऱ्याच नांव घेऊन हाक मारतांना देखिल ऐकलं आहे ! आणि एखाद्या वेळीं अशी काही खुळ्यासारखी करते कीं हिला खूळच लागलं अस वाटून मी घाबरून जात्ये ! "

ही हकीगत ऐकून मी तर बुचकळ्यांत पडलों. अंबुताईला आपल्या नवऱ्याच्या मृत्यूबद्दल इतकें दुःख झालें असेल अशी मला कल्पनाहि शिवली नव्हती. मला जी कांही माहिती होती तीवरून तिला आतां स्वतंत्रता मिळाल्याबद्दल एक प्रकारचें अग सैल झाल्यासारखे वाटत असावें. आणि हा ऐकावा तो भलताच प्रकार ! तर मग माझीच समजून चुकीची काय ? कोणी सागावें ?

" ताई आतां इथें घरी आहेत ? "

"होय, ती आतां या वेळीं आपल्या खोलींत बसली असेल काही तरी वाचीत, चित्रें बघीत, नाही तर बडबडीत. एखाद्या वेळी ती बाहेर पडत्ये ती दोन दोन दिवस घरीं येतच नाहीं. आपल्या मावशीकडे जाईल, एखाद्या मैत्रिणीकडे जाईल याचा कांही नेम नाही बघा ! "

" म्हणजे त्या लहरीच बनल्या आहेत म्हणाना ? "

" होय—होय. आतां हिला वेड लागून ती माझ्या हातची निसटते कीं काय अशी भीती मला वाटते हो ! "

मी विचार करीत स्तब्ध राहिलों. मी बोलत नाही असें पाहून ती म्हणाली "आतां रात्री जेवताना ती तुम्हाला दिसेल. तुम्ही आल्याचा मी तिला सुगावा लागूं देत नाहीं. संध्याकाळीं प्रत्यक्ष तिचे सर्व चाळे पाहून मग काय तें तुमचं तुम्हीच ठरवा. "

एकंदरींत माझ्या साऱ्या कल्पनाच चुकीच्या की समजायचे तरी काय? मला देखिल आता लवकरच वेड लागणार असे माझे मलाच वाटूं लागलें. ती चौकशी पुरी झाल्यानंतर मी अंबुताईला पाहिली नव्हती. काही दिवस आपल्या मैत्रीणीकडे , मावसबहिणीकडे, नंतर वाह्यास आपल्या मावशीकडे ती गेली होती एवढेच मला कळले होतें. आणि मीहि तिची चौकशी मुद्दाम होऊन करावयाची सोडूनच दिली होती. कारण माझ्या मनांतून ती उतरली होती. आपल्या अंथरुणास खिळलेल्या आजारी नवऱ्याला तशा स्थितीत ठेवून आपण इकडे तिकडे भटकत सुटणारी स्त्री कोणत्या लायकीची असणार ? आपल्या नवऱ्याबद्दल तिळभर तरी प्रेम असणारी स्त्री अशी कधी तरी हिंडत सुटेल काय ? ह्या एकाच गोष्टीनें तिच्या आईनें तिच्या पतिप्रेमाचे माझ्या कानात, कितीहि गोडवे गाइले तरी ते फोल ठरत होते.

सधि प्रकाश होऊन काळोख पडला. मी गच्चीवर एका बाजूस आजूबाजूचा देखावा पाहत पडलों. माझ्या मनांत अनेक विचारानीं काहूर उडवून सोडिलें होतें. बोलता बोलतां बाईनीं मला बरीच माहिती दिली होती. अंबुताईच्या नवऱ्याच्या मृत्युपत्राने अंबुताईला बरीचशी इस्टेट मिळाली होती. चटकन मला एक गोष्ट आठवली. तिच्यासबंधी दोनच दिवसापूर्वी कांहीं नवीन हकीगत कोणीशी बोलतां बोलतां मला सागितल्याचें आठवलें. त्याचा आणि बाईनी सांगितलेल्या माहितीचा मेळ बसू लागला. त्याबद्दल मला अधिक चौकशी करावीशी वाटली व तसें करण्याचेंहि मी ठरविलें.

# प्रकरण १६ वें.

## लताकुंजांतील दंपत्य.

रात्रीचीं जेवणें वगैरे आटोपलीं. माझें सारें लक्ष अंबुताईच्या चळवळीकडे होते. पण ती आपल्या खोलींतून बाहेर पडलीच नव्हती. मी मधल्या दिवाणखान्यात खिडकीकडे खुर्ची ओढून सिगार पेटवीत बसलों आहें तोंच कांहीं वेळानें बाई तेथें आल्या. अजूनपर्यंतच्या भाषणांत तिनें कस्तुरचें नांव देखिल घेतलें नव्हतें परतु आतां मात्र प्रथमच तिनें विचारलें:—

"कस्तुर अंबूच्या मैत्रिणीकडे आहे वाटतं?"

"मी हल्लीं बरेच दिवसांत तिला पाहिली नाहीं. आजाऱ्यांची गर्दीच फार."

"आमच्या अंबूच्या मैत्रिणीच्या घरचीं माणसें कशीं काय दिसतात तुह्माला?"

"फार चांगलीं आहेत तीं माणसे."

"हं!" बाईनीं हुंकार दिला. "मला नाहीं वाटत. अंबूला, कस्तुरला तुमच्याचप्रमाणं वाटतं; पण माझं मत निराळं आहे. माझ्या मुलींनां असल्या सोबतीणी नसाव्यात असं मला वाटतं. आतां मी जुन्या वळणाची ह्मातारी ह्मणूनहि मला तसं वाटत असेल; पण मला कांहीं तीं माणसं तितकीशीं आवडत नाहींत. मी गेलें होत्यें तिकडे पूर्वी कित्येक वेळां. त्या मुली देखिल इकडे येत असत हमेशा."

बाईचें माहेर कोंकणांतल्या एका खेडेगांवांत होतें. त्या खरोखरच जुन्या वळणाच्या बाई होत्या. म्हणूनच तिचें मन आधुनिक सुधारक मुलींच्या दृष्टीनें कांहींसें कोतें होतें. स्त्रियांना भलतेंच स्वातंत्र्य देण्याचे प्रकार तिच्या मतें अनिष्ट होते. वाटेल त्या वेळीं वाटेल तिकडे फिरावयास जाणें, याचा तिला फार राग येई. अंबूच्या लग्नाच्या बाबतींत अंबूताईच्या बापाच्या अनुरोधानेंच सर्व कांहीं चाललें होतें; व त्याला सहजच बाईना मान तुकवावी लागली. लग्नाच्या बाबतींत देखिल अपरिपक्क बुद्धीच्या अल्लड पोरींना अधिक स्वातंत्र्य देणें बरें नाहीं

असें ती समजे. एकामेकींच्या संमतीने विवाह ठरला ह्मणून बापाने संमति दली. आणि बापानें ठरविले ह्मणून आईने रुकार दिला. तथापि आईचा—ह्या बाईचा दुसरा एक विचार होता. नवऱ्याच्या कुलगोताबरोबर त्याची इस्टेट, जमीनजुमला वगैरे दूर दृष्टीनें पाहणाऱ्या जुन्या लोकांतली ती होती. नवीन वळणाच्या मताचीं माणसे नवरा विद्वान्, तरुण व हुषार असला ह्मणजे मग तो घरचा श्रीमंत नसला तरी त्यास पसंत करतात. बाबासाहेब बरेच श्रीमंत असल्यामुळे बाईंना एक प्रकारचा आनंद झाला होता. मला त्यांनीं आता तया-रीकरितां इशारतीची खूण दिली आणि अंबूताईला हांक मारिली. थोड्याच वेळानें शोकाने फिकट कृश झालेली अंबूताई जड पावलांनीं एकदाची येऊन आपल्या आईशेजारी जमिनीवरच बसली.

" डाक्टर, " बाई ह्मणाल्या, " बघा बरं अंबूच्या चेहऱ्याकडे. ती फारच क्षीण होत आहेसं मला दिसलं. "

" कशाला आई, मला आतां डॉक्टर ? माझं व्हायचं तें सर्व कांहीं होऊन गेलं. आतां माझंहि एकदांचं बर वाईट झालं लवकर तर तेवढं बरंच मी ह्मणतें. आणि तूं हें काय आरंभलं आहेस ? एवढ्याचसाठीं डॉक्टर आज आले कीं काय ? " तिनें माझ्याकडे तीक्ष्ण दृष्टीने पाहत ह्मटले.

त्याच वेळीं मी तिच्याकडे पाहिले. तिचे ते कुकुमतिलकविरहित फक्फकीत कपाळ पाहून मलाहि कसेंसेंच वाटलें. तितक्यात बाई म्हणाल्या,

" हल्लीं पहाटेला केव्हांची उठून तूं फिरायला जातेस ? आज तर खूबच रात्र धरली होतीस; आणि मग सबंध दिवस झोंपून काढलास. मग कायशी वाचीत बसली होतीस. ह्मणून मी तुला त्या वेळीं डॉक्टर आल्याचें कळविलें नाहीं. पण काय हो, डॉक्टर ! सकाळचं फिरून आलं असतानां दिखिल माणसं अधिकाधिक खंगतात का हो ? "

" डॉक्टर, " अंबूताई मोठ्या कष्टाच्या स्वरानें ह्मणाली. " मी तुह्माला सांगेन तेवढं ऐकून घ्या. माझ्याविषयीं आई आतां विनाकारण आपला जीव काळजींत घालीत आहे. तिला चार शब्द आपण माझ्याकरितां सांगा. त्या

दवशीं माझ्या हातांत तिनं भागवताचं पुस्तक वाचण्याकरितां दिलं मला भाग-
वत ठाउक आहे. रामायण, भारत, भागवत मी जाणतें. आतां आणखी तींच
तींच बुकं वाचून मला काय करायचं आहे? तेव्हां आईला माझ्याकरितां ह्मणून
कांहीं सांगून बघा. तिने मला तपासण्याकरितां किंवा समजुतीच्या गोष्टी सांग
ण्याकरितां ह्मणून तुह्मांला बोलावलं असलं पाहिजे हें मी समजत्ये. पण मला
कशाला पाहिजेत त्या गोष्टी?"

हें बोलणे चाललें असतां मी तिच्याकडे नजर लावलीच होती; परंतु तिच्या
शरीरावर दुःखाचा परिणाम फारसा झालेला मला कांहीं आढळून आला नाहीं
वैधव्याचा प्रसंग आला ह्मणजे एखाद्या परिचित स्त्रीने परिचित माणसांशीं कांहीं
दिवसांनतर जशा दुःखपूर्ण स्वरानें बोलावें तशीच ती बोलत होती. केवळ
अतिवात्सल्यामुळें बाईनीं ताईच्या स्थितीची अतिशयोक्ति केली होती असेंच
माझ्या प्रत्ययास आलें इतक्या अवधींत ताईच्या मुखांतून एकहि सुस्कारा
निघाला नव्हता. ती अतिशय दुःखी दिसत नव्हती किंवा वेड्यांत घालण्या-
सारखी अतिशय आनंदीहि दिसत नव्हती. मधूनमधून ती इकडचे तिकडचे
प्रश्न विचारी. कस्तुरबद्दल तिनें विचारलें तेव्हा मी वरचेंच उत्तर दिलें. नंतर
थोड्याशा वेळानें ती ह्मणाली—

"पोलिसांना पुढें कांहीं सुगावा लागला नाहीं का?"

"कां—हीं नाहीं" मीं उत्तर दिलें.

"कसले पोलीस आणि कसला तपास? कोणाचं कोणाला अगत्य. भाडोत्री
पोलीसांना काय! जीव लावून काम करायचें थोडंच अडलंय त्यांचं? कुठून तरी
डायरी भरली, पगार घेतला, काम झालें. आपलें कपाळ!" असें ह्मणून तिनें
आपलें कपाळ दोन्ही हातांनीं धरलें आणि मान खालीं घातली.

"खरेंच," बाई बोलल्या "पोलिसांनीं मन लावून काम केलें असतें तर
शोध लागल्याशिवाय राहता ना."

"शक्य तेवढा सर्व प्रयत्न बिचाऱ्या पोलिसांनीं केला आहे;" मी ह्मणालों,
"अति प्रख्यात अशा दोन नामांकित डिटेक्टिवांच्या हातांत ही केस वरिष्ठ
अधिकाऱ्यांनीं दिली होती आणि त्या दोघांनींहि कसून प्रयत्न केला आहे."

" आणि काय झाले शेवटीं ? " निराशेच्या स्वरानें ताई ह्मणाली. " कांहीं नाहीं. तुह्मी कांही ह्मणा अगत्यावांचून सर्व कांही फुकट ! "

" माझा मित्र–संजीवन–तुह्मी त्याला ओळखतां–त्यानें देखिल त्यांत लक्ष घातलें आहे. "

" पण त्यांनीं का गुप्त पोलिसाचा धंदा केला आहे कधीं ? "

" होय होय, होय. त्याचें कामच ते पोलीसच्या पद्धतीहून त्याची पद्धत मात्र अगदीं वेगळी आहे. तो स्वतंत्र धद्याचा माणूस असल्यामुळें त्याचा कोणाला संशय येत नाहीं. तो आपलें काम गाजावाजा न करिता करीत असतो. आजपर्यंत त्यानें कमींत कमी दहा बारा गुन्हे तरी पकडले असतील. "

" त्यांनीं ह्यांत लक्ष घातलं आहे ह्मणतां ? " तिनें चमत्कारिक मुद्रा करून मला चटकन् विचारलं.

" होय. होय. "

" त्यांना कोणी सांगितलं ? "

" त्याला कोणी सांगायला नको. त्याला असल्या कामांत मोठीच मौज वाटते. "

" असं कसं होईल ? कांहीं तरी स्वतःचा हेतु असल्याशिवाय आपला वेळ आणि चिकाटी इतका कोण धंदेवाला खर्चील बरं ? "

" छे ! छे ! त्याला अशा बाबतींत कसलाहि हेतु असावा लागत नाहीं. "

" बरं, त्यांनीं तरी काय पुढें आणलं ? "

" तें मला कांहीं ठाऊक नाहीं. " मी ह्मटलें. " आह्मी दोघे मित्र आहों. पण असल्या गोष्टी त्याची स्वतःची खात्री झाल्याशिवाय तो मला कधींहि सांगायचा नाहीं. मी मात्र तुह्माला खात्रीपूर्वक सांगतों कीं, तो ह्या कामांत अगदीं जिवापाड मेहनत करीत आहे. "

" हल्लीं ते कुठं आहेत ? "

" त्याच्या हालचाली दुसऱ्या कोणाला समजावयाच्या नाहींत. तो जाईल एकीकडे, सांगील दुसरेंच नांव. परंतु एखाद्या केसींत त्यानें मन घातलें तर पल्ल्याला पोंचविल्याशिवाय तो बाहेर पडावयाचा नाहीं. "

" त्यांना तरी यश येवो ! " ती दुःखानें पुन्हा हात डोकीवर ठेवून म्हणाली. " जर एकदां पत्ता लागता—"

" धीर धरा ताई ! सर्व गोष्टी क्रमाक्रमाने आपोआप ईश्वरकृपेनें घडतील. असलीं कामें आपल्या इच्छेप्रमाणें चुटकीसरशीं होत नसतात. "

" पण इतक्या महिन्यांत पोलिसांनीं केलं तरी काय ? " ती पुन्हा बारकाईनें माझ्याकडे पाहत म्हणाली.

" जरा धीरानें घ्यावें म्हणतों ना ? पोलीस कांहीं करोत. माझी सर्व मदार संजीवनावर आहे. तो सर्व कांही पुरे उघडकीस आणल्याशिवाय स्वस्थ बसणारा माणूसच नव्हे, समजलांत ताई ? "

संजीवन माझ्याकडे जे वारंवार निराशेचे उद्गार काढीत होता ते मुळींच मी बोललों नाहीं. नंतर पुनः कस्तुरचा उल्लेख तिनें एकवार केला. एकंदरींत तिच्या बोलण्यावरून दोघांहि बहिणींच्या मनांत कांहीं तरी तेढ आली असावी असें दिसलें. पूर्वीप्रमाणें तिच्या मनांत कस्तुरविषयीं नसावेंसें वाटलें. आपल्या विवाहापूर्वी बाबासाहेबाशी कस्तुरचें लग्न त्या दोघांनींच गुप्तपणें ठरविलें होतें, ही गोष्ट आता अंबुताईला कळली असेल काय ? अशीहि शंका एकवार माझ्या मनांत येऊन गेली. ही शंका येतांक्षणीच तिच्याकडे मीं पाहिलें. त्या दुर्दैवी बालविधवेची प्रतिमा करुणास्पद दिसली. नवरा जिवंत असतां त्याची किंमत न कळून तो मृत झाल्यावर पश्चात्ताप पावणाऱ्या स्त्रियांच्या दुःखाची छटा तिच्या मुखावर होती. आई व मुलगी दोघीहि विधवाच. मला त्या दोघींचीहि कींव आली.

बोलत असताना मी तिच्याकडे पुष्कळ वेळां बारकाईनें पाहिलें होतें; तिच्या प्रत्येक हालचालीकडे बारीक नजर ठेविली होती. परंतु, तरी देखल बाईंनीं जें कांहीं आल्याबरोबर मला सांगितलें होतें त्याचें कांहींच चिन्ह दिसेना.

हो. एक सांगायला मी विसरलों. बोलतां बोलतां तिच्या नवऱ्याच्या गुणाचा मी उल्लेख केला होता. तेव्हां तिच्या डोळ्यांतून खरोखरच भळाभळ अश्रुप्रवाह सुरू झाला होता. माझें आंथरूण वगैरे घालून तयार असल्याचें बाईंनी मला

सांगितलें व दाखविलेल्या खोलीत मी निजावयास गेलों. या वेळीं **भजमासें** दहा वाजले होते.

पलंगाशेजारच्या एका आर्मचेअरवर बसून सिगारेटच्या धुरांत मी थोडा वेळ घालविला. वारा पडला होता व उकाडा तर सारखा होत होता. नुकत्याच बोललेल्या साऱ्या गोष्टी मनांत घोळत होत्या. त्यामुळें झोंप येण्याचें चिन्ह दिसेना. ह्मणून मी "कोननडॉयल्" ची एक डिटेक्टिव् नॉव्हेल् वाचावयास घेतली.

मध्यरात्रीचा सुमार झाला. तरी झोंपेचें ठाव ना ठिकाण. खिडकीपाशीं जाऊन मी पडदा दूर केला. रात्र चांदणी होती, पण मधून मधून ढग येत होते. गाड्यांचा घरघराट आतां बंद झाला होता. लांब कुठें तरी बाणकोटी बाल्याच्या भजनाचें ढोलकें व त्याचें कर्कश ओरडणें ऐकूं येत होतें. मला समुद्रकांठी एखाद्या बांकड्यावर अंग टाकून पडावेंसें वाटलें. डोळे तारवटून गेले होते. आह्मां डॉक्टर लोकाना कुठलें आलें आहे चांदणेन् बिदणें. आज मात्र बाहेर जावेंसेच वाटलें. उष्मा होतच होता. तथापि मी अंगात शर्ट व कोट देखिल घातला. डोकीवर टोपी ठेवली. पायांत फक्त मऊ वहाणच घातली व हातांत काठी घेऊन पायऱ्यांवरून उतरतांना आवाज न करतां मरीनलाईन् स्टेशनच्या बाजूला निघालों. आज मी अशाच घरगुती पोषाखानें बाईच्या घरीं मुक्काम करावयाचा असल्यानें आलों होतों.

हळूहळू रेल्वेच्या गेटमधून मी पलीकडे गेलों व एका बांकावर बसलों. तरी मला हवा तसा वारा येईना. आकाश अभ्राच्छादित होऊं लागलें. माझ्या अंगांतून सारखा घाम निथळत होता. मलमलीचा सदरा भिजून चिंब झाला. ह्मणून अगदीं समुद्राच्या कांठच्या धक्क्यावर बसावें ह्मणून मी उठलों तों दूरच्या लता--कुंजांतून दोन व्यक्ति बाहेर पडल्याचा भास झाला ! मी आल्यापासून एक दोनदां कुजबुज झाल्याचा ध्वनि माझ्या कानीं आला होता. आतां दोन व्यक्ति दिसल्या. पण मुंबईंत माझ्याचसारखीं कोणी माणसें गार वाऱ्याची झुळूक घ्यावयास आलीं असतील असें वाटून तीं गेल्यावर समुद्रतीरावर जावें असें

ठरवून मी मध्येंच एका लतामंडपाखालीं तिकडेच पाहत उभा राहिलों. माझ्या मनांत आतापर्यंत सारखे अंबुताई व कस्तुर यांच्या बद्दलचेच विचार घोळत होते. मी निजावयास जाता जाता जेव्हां अंबूताईकडे पाहिलें, तेव्हां तिच्यांत थोडासा लहरी चमत्कारिकपणा, व मनांतील दुःख परकी माणसाच्या समोर दाबून ठेवल्याने होणारी कष्टप्रद स्थिति ही दिसून आली होती.

त्या लताकुंजांतून त्या दोन व्यक्ति सारख्या चर्नीरोडच्या दिशेनें जात आहेत असे अंधुक अंधुक दिसू लागलें. पुनः एकदां स्पष्ट चंद्रप्रकाश पडला. त्या दोन व्यक्तींतील एक स्त्री व दुसरा पुरुष होता.

हें उष्म्यास कंटाळून बाहेर पडलेलें एखादें जोडपें आहे असे समजून मी समुद्रतीरावर जावयास निघालों. तें दांपत्य पाहतांक्षणींच माझ्या मनांत गतायुष्यातील प्रसंग पुनरपि एकदम आले. हाय ! कस्तुरच्या व माझ्या शुद्ध-प्रेमांत अंतर न पडतें तर आम्हीहि अशीच चांदण्या रात्री दोघेहि फिरावयास आलों असतों. परंतु आतां काय ? निराशेचा अंधार !

अंधार ! खरोखरच चंद्र लुप्त होऊन एकदम चारी बाजूनीं ढग भरून आले आणि काळोख पडला. त्याबरोबर त्याचें बोलणेंहि गोठ्यानें येऊं लागलें. त्यांतील स्त्रीचा आवाज ओळखीचासा ऐकूं आला !

पुनः एकवार जरासा प्रकाश पडल्यासारखा झाला. माझी दृष्टि त्या समोरून जात असलेल्या जोडप्यावर गेली. मी तेथल्या तेथेच ताठ होऊन गेलों. माझ्या डोळ्यांवर माझाच विश्वास बसेना.

हायस्कूलांतून कॉलजांत गेल्यावर देखिल व अद्याप पावेतो माझे चांदण्या-रात्रीं बाहेर फिरणें फार आवडीचे; चांदण्या रात्री चांदण्यात बसून वर चाद-ण्याकडे पाहत राहिले असतां मला माझ्या आयुष्याची, आयुष्यांतील दगदगीची व सुखदुःखाची क्षणभर विस्मृति पडून मन तल्लीन होऊन शेवटीं सुप्रसन्न होतें, असा माझा नेहमींचा अनुभव. आज उष्म्यानें कहर केल्यामुळें मौजेखातर ह्मणून मी समुद्राच्या कांठावर आलों. मला पुढे कांही विचित्र प्रकार दिसणार

अशी माझी अटकळ नव्हती व त्याची मी आगाऊ तयारीहि केली नव्हती. अशा स्थितींत अगदीं अनपेक्षित रीतीनें माझ्यासमोर जें मला दिसलें त्या देखाव्याने मी तटस्थ झालों नसतो तर माझ्यांत कांहीं असाधारण, अमानुष—अलौकिक शक्ति वास्तव्य करीत आहे असं मला व कोणाहि तिऱ्हाईताला वाटलें असतें.

त्या दोन व्यक्तींना मी ओळखल्याबरोबर मी समुद्रकांठ सोडला व रस्त्याच्या बाजूला वळलों, परंतु त्याच्या मागोमाग तीं जातील तिकडे मात्र जाण्याचा विचार मी मनाशीं कायम केला. समुद्राच्या धक्क्यावरून चाललों असतों तर माझ्या समांतर तीं एखादे वेळीं आल्यास आकाशाच्या आड माझी आकृति त्यांस दिसून त्यांना शंका येईल म्हणून मी झाडीच्या बाजूनें, रस्त्याच्या बाजूनें त्यांना डाव्या अंगास ठेवून त्यांच्या बरोबर काळोखांतून चालूं लागलों. आतां काळोख अगदीं दाट पडला होता. परंतु म्युनिसोपालिटीच्या दिव्याचा प्रकाश लांबून माणसाची ओळख दाखविण्याइतका नव्हता.

वाचक ! आपणाला वाटेल कीं, ज्यांना पाहून मी आश्चर्यस्तंभित झालों तीं माणसें तरी कोण ?

त्यांतील स्त्री होती ती आपल्या परिचयांची अंबूताई; आणि पुरुष ? पुरुष कोण सांगा बरें ? चालते आपली कांहीं कल्पना ? पुरुष ते मेलेले बाबा-साहेब देशपांडे !



# प्रकरण १७ वें.

## ब्यॅंकबेवरील संभाषण !

बाबासाहेब देशपांडे तरुण असतांना, बलवान्, पुष्ट, काटक आणि सतेज होते. त्यांना लहानपणापासूनच तालमीचा नाद. तालमीचा नाद देशावर बहुतेक असतोच. कोकणांतच आतां कुठें जागृति होऊं लागली आहे. तसेंच ते मूळचे श्रीमंत असल्यामुळें पक्के विलासी होते. त्यामुळें ते अखेरपर्यंत सशक्त होते. रोगानें त्यांची शेवटीं शेवटीं शक्ति हरण झाली होती.तथापि लग्नाचे वेळीं सर्वच तरुण मुलीचें मन आकर्षण करण्याइतका जरी नाहीं तरी श्रीमंतीचा उपभोग घेऊं इच्छिणाऱ्या एखाद्या तरुणीला त्यांच्याकडे पाहिल्याबरोबर तिटकारा न येण्याइतका रुबाब त्यांच्यापाशीं होता. अंबूताई प्रथम अशाच फसल्या. पहिल्या प्रथम त्यांनीं एकदम त्यांची मागणी नाकारली नाहीं. त्यांचें मन विचारांतच राहिलें इतक्यांत आईबापांनीं संमति दिली; आणि तदनंतर आईबापांची आज्ञा प्रमाण मानणाऱ्या अंबूताईनें बाबासाहेबांस आपला पतिदेव जीवें भावें मानलें. त्यानंतर ती त्यांच्यावर मनापासून प्रेम करू लागली. बऱ्याच ठिकाणाहून मला मिळालेली ही अशी माहिती आहे.

सीक पडण्यापूर्वीं बाबासाहेब जशा प्रकारच्या तरतरीनें फिरत असत; तशीच तरतरी त्या रात्रीं मला त्यांच्यांत प्रथम दिसली. ही गोष्ट वाचून आपणहि माझ्याचप्रमाणें आश्चर्यस्तंभित झालां असाल. कारण अशक्य कोटींतली गोष्ट शक्यतेंत प्रत्यक्ष रूपांतरित दिसल्यावर कोणाला नाहीं आश्चर्य वाटणार ? आणि ज्याची जखम मी प्रत्यक्ष माझ्या ह्या दोन्ही डोळ्यांनीं तपासली होती; तोच माणूस आपल्या बायकोबरोबर चांदण्यारात्रीं असा एकाद्या आषक तरुणासारखा फिरतांना पाहून माझी तरी काय स्थिति व्हावी ? बरें ही आषुकमाषुकांची जोडी खोटी म्हणावी तर माझ्या डोळ्यांसमोर धडधडीत उभी ! रात्र चांदणी असूनहि अमावास्येहून अंधेरी एका अर्ध्या तासांत बनली. आणि आतां वारा सुटून वीजहि चमकं लागली. त्या जोडीला कसलाच संशय नस-

त्यामुळें ती निर्धास्त होती. पण माझें लक्ष त्यांचेकडे लागलें होतें. विजेच्या प्रकाशांत मी पाहिलें तों बाबासाहेबांबद्दलची पक्की खात्रीच होऊन गेली. संशय बिलकुल उरला नाहीं. अंबूताई मात्र रात्रीं अगोदर मी पाहिली होती तशी विषण्ण दिसली नाहीं विजेच्या क्षणिक प्रकाशांतहि तिच्या चेहऱ्यावरचे समाधान मला दिसून आलें. कारण ती झपाझप पुढें चालत गेलीं असतील अशा अदमासानें मी पुढें गेलों होतों. मागाहून बोलण्याचा आवाज येण्याबरोबर मी मागें वळून पाहिलें तोंच वीज प्रथम चमकली. त्याबरोबर मी त्यांच्यामागें राहिलों. सुदैवानें त्यानीं माझ्याकडे लक्ष दिलें नाहीं. त्यांचें बोलणे ऐकण्याकरितां म्हणून त्यांच्यामागें राहिलों खरा; पण चर्नीरोडजवळच्या बागेपर्यंत जाईतों माझ्या जीवांत जीव नव्हता. बागेपाशीं पोंचल्यावर मी मधूनच बागेंत प्रवेश केला आणि गेटकडच्या बॅंक्बेच्या बाजूच्या टोंकाकडे जाऊन लपून उभा राहिलों. ही जोडी हळू हळू तेथपर्यंत आली. आणि सुदैवानें या वेळी त्यानीं समुद्रतीर सोडून ती अगदी बागेच्या कुंपणाजवळूनच चालली होती. त्यामुळें परत एकवार मला त्यांना स्पष्टपणें पाहावयास सांपडलें. बाबासाहेबांनीं अंबूताईशीं गुप्त खलबत करतांना मी स्पष्ट पाहिलें. दोनच तासापूर्वींचा अंबूताईचा शोकपूर्ण चेहरा आणि आतांचा तिचा आनंदी मोहरा यांत जमीन अस्मानाचें अंतर होतें. गुलबकावली, हातिमताई अशासारख्या जुन्या बाष्कळ गोष्टींत पुष्कळ असंभाव्य गोष्टींचें वर्णन आपण वाचतों. पण नेहमीच्या अनुभवांत मेलेलें माणूस जिवंत होऊन चालूं बोलूं लागलें हें मी प्रथमच पाहिलें. आणि वाचक, मी आपणास सांगून ठेवतों कीं मी कांहीं कोणी कल्पक कवि, कादंबरीकार, काल्पनिक गोष्टी लिहिणारा लेखक नाहीं. मी प्रत्यक्ष गोष्टीच पाहणारा डॉक्टर आहें आणि म्हणूनच आपणहि माझ्या लिहिण्याबद्दल भलभलते कुतर्क करूं नयेत माडीवरच्या खोलींत गांवदेवीवरील बंगल्यांत ज्या बाबासाहेबांना जखमेच्या घायानें मरून पडलेलें मी पाहिलें होतें, तेच हे बाबासाहेब देशपांडे ! त्यांची चाल, त्यांची हळू हळू खोंकण्याची पद्धत, त्यांचा चेहरा ही सर्व माझ्या पूर्ण परिचयाचीं. मी तीं कधींतरी विसरेन काय ?

त्या रात्रींचें तें माझें धाडस अगदीं अपूर्व होतें. जीव मुठींत धरून मी तेथें उभा होतो. माझा यत्किंचित् जरी संशय आला असता तरी मग पुढील त्यांचें बोलणें मला ऐकतां आलें नसतें; आणि उलट तिसराच प्रकार होऊन गेला असता. ह्मणून मला फार सावधगिरी घ्यावी लागत होती.

जगांत काय प्रकार चालले असतात याची कोणास कल्पना तरी होईल काय? हीच अंबुताई पाहा. जगाला ही विधवा दिसत होती ना? तथापि ही सकेशा रात्रौ आपल्या नवऱ्याला एकांतांत भेटत होती! बाबासाहेब देशपांडे जगाच्या दृष्टीनें, सरकारच्या दृष्टीनें, लोकांच्या दृष्टीने, आप्तेष्टांच्या दृष्टीनें, पोलीसांच्या दृष्टीनें व डॉक्टरांच्या दृष्टीनें मेले होते. परंतु खरोखर ते जिवंत होते! तर मग विधवेचें सोंग करून जगाला फसवणारी ही हिंदु स्त्री मोठी कावेबाज असून कसला तरी मोठा कटहि करीत असली पाहिजे खास; असे माझ्या मनानें घेतलें. ज्याच्यावर पोस्ट मॉर्टेम् केलें, ज्याच्या मृत्यूवर सर्टिफिकेट देतांना मी सही केली, तो माणूस अशा अपरात्रीं बायकोशीं जगाला, खुद्द तिच्या आईबहिणीला देखिल कळूं न देतां खलबतें तरी कसलीं करतो हें जाणून घेतल्याशिवाय माझ्यानें कसें राहवेल?

मी तेथेंच दबा धरून बसलों; परंतु ही जोडी जराशी पुढें गेली आणि चकचकीत विजेच्या बत्तीच्या प्रकाशांतून पुढें जाण्यापेक्षां बागेतच येण्याचा त्यांनीं बेत ठरवला असावा. कारण तीं तेथूनच मागें परतलीं आणि बागेच्या गेटच्या रोखानें येऊं लागलीं. त्याबरोबर कुंपणाच्याच आधारानें ओणव्या ओणव्यानेंच मी लवकर लवकर कांहीं पुढे घुसलों; व अगदीं एका बाजुस दाट काळोखांतल्या एका बांकाजवळ बसून त्याच्याच बाजूस कुंपणांत मी भुईसरपटत उपडी राहिलों. माझ्या आंगावरून कुंपणालगतच्या बागेतील झाडाच्या व कुंपणांतील झुडुपांच्या डहाळ्या पसरल्या होत्या. मला जागा तर उत्तम मिळाली; पण ही जोडी आतां बसते कोठें इकडे माझें लक्ष गेलें. कर्मधर्मसंयोगानें त्याच बांकावर ती जोडी येऊन बसली.

तोंपर्यंत मी पूर्वी पाहिलें तें काय आणि आतां पाहतों आहे हें काय, आणि या दोहींतलें खरें कोणतें याचा माझ्या मनाशीं निर्णय लावण्याचा प्रयत्न करीत होतों.

बाबासाहेब मेले ही गोष्ट खरी कीं जिवंत आहेत हें खरें? मला काय समजणार? ईश्वरास ठाऊक ! काय दिसतें तें पाहावें व काय कानावर येतें तें ऐकावें असे ठरवून मी उपडी पडून राहण्याचा बेत केला. खोंक आली तरी दाबून धरली पाहिजे, शिंक आली तरी दपटली पाहिजे, कसलेंहि चळवळ, श्वासदेखिल मोठ्यानें होऊं देतां कामा नये. केवढा हा विचित्र प्रसंग ! त्या वेळची स्थिति माझी मींच जाणें.

मी माझे कान तयार ठेवले होते. प्रत्येक शब्द झेलून घेण्याला ते अगदी तयार होते. परंतु त्याचें बोलणें स्पष्टच होईना. तीं पुटपुटल्यासारखीं बोलत होतीं. आतां जरी वीज बंद झाली होती तरी प्रथम मी पाहिलें तेव्हां मला अंबूताई बिनकांठाचें एकरंगी काळें तलम पातळ नेसलेली व बाबासाहेबहि तसाच काळसर निळसर पोषाख केलेले दिसले होते. बोलताना मधून मधून आपल्या सभोंवार वारंवार निरखून पाहत ते कसल्या तरी घडून आलेल्या अनेक प्रसंगाची हकीगत सांगत होते; आणि अंबुताई हुंकारहि न देता निमूट-पणें लक्ष लावून ऐकत होती.

बाबासाहेबांनीं सभोंवार इकडे तिकडे पाहिलें कीं माझ्या छातींत धस्स होई. कदाचित् माझा त्यांना संशय येऊन तीं मला पाहतील काय अशी मला भीती वाटे. मी श्वासदेखिल अगदीं जपून चालविला होता.

माझी त्या वेळची स्थिति तुमच्या लक्ष्यांत येणें कठीण आहे. माझे भावी सुख, माझ्या आयुष्यांतील भावी सुखाची सर्व मदार याच क्षणावर अवलंबून होती त्या खुनाचें गूढ कोडें सोडविणें ह्मणजे माझ्या कस्तुरवरील दोषारोपाच्या शंकेचें निरसन करणें. तें जसें बरें अथवा वाईट होईल तसें माझें पुढचें सर्व आयुष्य होणार हें ठरलेलें. तेथें उपडी पडून ऐकणें हाच एक मार्ग मला त्या वेळीं मोकळा होता. उठून बसेन ह्मणावें तर तें देखिल आतां शक्य नव्हतें. पडल्या स्थितींतच काय कानावर येईल तें खरें; अशी स्थिति !

समुद्राच्या लाटा हळूहळू सळसळत होत्या. वाराहि वाहत होता. या दोघांच्या तडाख्यांतून सुटणार तें माझ्या कर्णपथावर आदळणार. एखादें झाडावरील

गाखरूं केव्हांतरी फडफडे, वाऱ्याच्या जोरानें झाडे व त्यांच्या फांद्या केव्हांतरी वाजत, त्यांचा फायदा घेऊन मी केव्हांतरी हळूं आंग हालवावें. माझ्याबरोबर जर संजीवन असता, तर तो निराळयाच तऱ्हेने वागता. माझ्या अंगांत ही कला शिकाऊपणानें, सहवासानें आली होती; पण संजीवनच्या ठिकाणीं ती उपजतच होती. तो जात्याच डिटेक्टिव होता. ह्मणून त्यानें जर मी त्याला मेलेल्या बाबासाहेब देशपांडयांना अंबुताईबरोबर फिरतांना पाहिलें ह्मणून सांगितलें असते तर त्यावर त्यानें विश्वास ठेवला असता काय? कोणीहि ठेवणार नाहीं. अगदीं अविश्वसनीय गोष्ट ही! खुद्द मलाच कोणीं असे सांगता तर मी त्याला वेडयांच्या हॉस्पिटलांत स्वतः होऊन कोंडलें असते! इतरांची गोष्ट अशाला सांगूं?

तीं दोघें अगदीं एकमेकांच्या शेजारीं आंगाला आंग लावून बसलीं होतीं कांहीं सुरसुरल्याचा आवाज झाल्याबरोबर त्या दोघांनीहि आपलें बोलणें एकदम थांबवून आजुबाजूस पाहिलें. माझें धाबें दणाणलें. तितक्यांतच आणखी माझ्या पायांतल्या वहाणेस कुंपणांतलें कांटेरी झुडूप लागून पुनः सरसर आवाज झाला. त्याबरोबर ह्मातारा उठला आणि त्यानें त्या बाजूस आपल्या काठीचें टोंक लावलें. नशीब माझें बलवत्तर ह्मणून मी बचावलों. ह्मातारा पुनः आपल्या जागेवर अंबुताई शेजारीं बसून व आपला एक हात तिच्या खांद्यावरून टाकून बोलूं लागला.

" कस्तुर एकदां ह्मणाली होती खरें असेंच अगोदर देखिल. मोहनची एवढी गैरमर्जी कां व्हावी कळत नाहीं. गरीब पोरगी ती! अगदीं निराश होऊन गेली आहे ! "

" त्याला तिचा संशय आला आहे. " ताई ह्मणाल्या.

" पण त्याला असा संशय यायला कारण तरी कोणतें घडलें ? "

मी जमिनीला खिळल्यासारखा झालों. माझ्याचबद्दल त्यांचें बोलणें चाललें होतें ! समुद्राच्या लाटांचा व बागेंतील वाऱ्यानें हालणाऱ्या झाडांच्या पानांच सळसळाट जसा वाढला तसे त्यांचेहि शब्द जरा मोठयानें येऊं लागले. त्यामुळे आतां मला स्पष्टपणें ऐकूं येऊं लागलें.

" हें प्रकरण सर्वांसच गहन गूढ होऊन बसलें आहे, ही गोष्ट तरी खरी ना? मग ? तें सोडवण्याचा तो आपल्या संजीवन नांवाच्या मित्राबरोबर अगदी कसून प्रयत्न करीत आहे. " ताईनीं सांगितलें.

" धाड भरो त्या संजीवनावर ! " रागानें बाबासाहेब उद्गारले. संजीवनची त्यांना यावरून पूर्ण ओळख होतीसें वाटतें. कधींची कुणास ठाऊक !

" जर कदाचित् त्या दोघांनीं खरी गोष्ट शोधून काढली तर मग कठीणच आहे ! " ती भीतीनें ह्मणाली.

" त्याची भीती नको. " हांसून बाबासाहेब ह्मणाले " मेलेल्या माणसाची जळून राख झाल्यावर व त्यावर आणखी कॉरोनरचा निकाल झाल्यावर त्याला कोणीहि जिवंत समजणार नाहीं; समजलं. त्याची तुला मुळींच. भीती नको. आमचं गुपित कोणालाच समजणार नाहीं. "

मी मनांतल्या मनांत हांसूं लागलों. बाबासाहेब—अथवा हें बाबासाहेबांचें भूत—ज्याच्याबद्दल बोलत होतें तोच मी स्वतः त्यांचें सर्व बोलणे प्रत्यक्ष ऐकत होतों; याची त्यांला कल्पनाहि नव्हती.

" पण डॉक्टरच्या मर्जीतून उतरलेली कस्तुर, त्यांच्या प्रीतीस पुनरपि पात्र होण्याकरितां आमचें गुह्य उघडीस आणील, याची वाट काय ? " अंबुताईनी शंका काढली.

" तिची छाती नाहीं ब्र काढण्याची. " बाबासाहेबांचें उत्तर आलें. "तिच्या पासून ह्मणशील तर बिलकूल भीती बाळण्याचें कारण नाहीं. जोंपर्यंत तूं हें विधवेचें सोंग पूर्णपणे घेतलें आहेस; आपल्या सर्व हालचाली जपून विचारपूर्वक करीत आहेस, आणि मला भेटतांना धोरण आणि सावधगिरी ठेवित आहेस तोंपर्यंत आमचें गुह्य बाहेर फुटण्याचें नांवच नको ! "

" छे, तरी देखिल मला कस्तुरचीच भीती वाटते. ती मोहनवर जशी प्रीती करीते; तशी, ज्या स्त्रीच्या ठिकाणीं असते ती आपल्या प्रियकराशीं बोलतांना बाकीचे सर्व विचार, भीती, शंका, कल्पना खात्रीनेंच सांगतें तेव्हां

ती आपणास पार धुडकावून लावील." अंबूताईनीं सुचविले " त्यांच्या दोघांमध्यें जी फूट पडली आहे ती आमच्यापासून. तिच्या तोंडांतून एकच शब्द बाहेर फुटेल तर सर्वच बेंड बाहेर फुटेल आणि त्या दोघांचें मन निर्मळ होऊन डॉक्टरचे मत बदलून तो तिला पनुरपि पूर्वीप्रमाणें वागवूं लागेल. याचीच मला भीती वाटत आहे."

" तुझी भीती अगदीं फुकट आहे." निश्चयाच्या स्वरानें बाबासाहेब ह्मणाले " आह्मां दोघांशिवाय तीच काय ती एक आहे परकी, आमच्या कटांतलें मर्म जाणणारी. पण हें गुह्य फोडील तर त्यात तिचा स्वतःचाच नाश होईल हें तूं विसरतेस."

" आतांपर्यंत आपण केलेला सुखाचा त्याग–स्वार्थत्याग—पुरेसा झाला असें तिला नाहीं का वाटायचं ?"

" तर मग तिनें आतां स्तब्ध राहिलेंच पाहिजे; नाहीं तर तिच्या अब्रुवरच बाजू येईल."

या उत्तरानें ताईचें कांहीं समाधान पुरतेंसें झालें नसावें. ती जी एवढी माझ्याशीं कस्तुरबद्दल चौकशी करीत होती ती याच करितां. कसला तरी मोठाच गुप्त कट चालला होता ही गोष्ट आतां सिद्धच झाली. आणि दुसरी एक मला नवीन गोष्ट आतांच कळली ती ही कीं ही सर्व हकीगत फक्त एक कस्तुरलाच ठाऊक असून ती माझ्याकडे त्याबद्दल अवाक्षरहि बोलली नाहीं. माझ्यासमोर बोलणारा हा माणूस तर खरोखर बाबासाहेब देशपांडेच. तर मग ' दुधारी सुरीनें' मेलेला माणूस कोण ?

इतक्या गुतागुंतीनें ह्या सर्व गोष्टी उकलण्यास अवघड झाल्या होत्या, आणि कटवाल्यांनीं इतक्या सावधगिरीनें आणि काळजीपूर्वक सर्व गोष्टी घडवून आणल्या होत्या कीं खुद्द बाबासाहेबांच्याच मतें त्या तिसऱ्या कोणास उमगणें शक्य नव्हतें. असें असूनहि आश्चर्य असें कीं आपला वेष न बदलतां हे बाबासाहेब रात्रौ झाले तरी कसे फिरत होते ? आतां एवढें खरें कीं ती बोलतांना

जो भाग मी आणखी ऐकिला होता त्यावरून त्यांचीं नेहमींची भेटण्याची जागा एक नव्हती. पूर्वीच्या जागेवर त्यांना संशय आल्यामुळें त्यांनीं इथें भेटण्याचें ठरविलें, व पुढल्या खेपेस हीहि जागा बदलावयाची असें ठरलें होतें! ह्या भेटीहि फक्त कारणापुरत्या क्वचितच् होत. वारंवार होत नसत. आणि अंबूताईनेंहि विधवेचा बहाणा उत्तम वठविला होता.

पूर्वीं बाईनीं जें अंबुताईचें दोन दोन दिवस नाहींसें होणें, पहाटेस फिरावयास जाणें, दिवसा निजणें वगैरे सांगितलें होतें त्याचाहि मला आतां उलगडा झाला. थोड्या वेळानें बाबासाहेब बोलले—

“ डॉक्टर आज बाईकडे आला आहे याची मला कल्पना नव्हती, नाहीं तर आज मी आलोंच नसतों. त्याच्या दृष्टीस पडणें ह्मणजे सर्वनाश करून घेणेंच.”

“ जेवणें होईपर्यंत तो आल्याची मला बातमी देखिल नव्हती. आईनेंच त्याला मुद्दाम बोलावून आणला होता. पण तो उद्यांच जाईल निघून. तो ह्मणत होता कीं रोग्यांला टाकून फार वेळ आपल्याला राहतां येणार नाहीं ह्मणून. ”

“ इथें येण्यांत कांहीं शोध बोध काढण्याचा हेतु आहे ह्मणत्येस त्याचा? ” बाबासाहेबांनीं विचारलें.

“असेल कदाचित्. कोणी सांगावें? अखेरपर्यंत आईनें मला तो आल्याची बातमी कळविली नाहीं; किंवा तो येणार असल्याचें पूर्वींहि कळविलें नाहीं. मला कसेंसेंच झालें त्याला पाहून. मला त्रासच आला होता. कारण त्याच्या दृष्टीस पडूं नये अशी माझी फार इच्छा होती. पण मग आलेली बाजू घेतली कशी तरी एकदांची सांवरून. ”

“ असेना का ! जाईल तो सकाळी निघून. राहतो कशाला इथें झक् मारून शेण खायला ? ह्या वेळीं पडला असेल घोरत बिछान्यांत डुकरासारखा ! ”

याच्यावर उत्तर देण्यांचें माझ्या अगदीं जिभेवर आलें. पण मी बळेंच आत्म-संयमन केलें. मिळालेल्या माहितीबद्दल मला मनांत आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या.

# प्रकरण १८ वें.



## अनपेक्षित आघात.

सकाळी सुमारें आठ वाजतां रात्रीच्या जागरणामुळें डोळे चोळीत चोळीतच मी बाहेर आलों. प्रातर्विधि आटोपून येतों तोंच बाईंनी अंबूताई रात्रीं नाहीशी झाल्याचे मला सांगितलें. मी मात्र रात्रौ जो प्रकार पाहिला होता त्यावरून मला वाटलें की पुढें काय घडतें आणि अंबूताई परत आल्यावर आपलें विधवेचें सोंग कसे करते हें अधिक सूक्ष्मपणें निरखून पाहण्यास मला राहावयास सांपडतें तर बरें होतें. परंतु पेशंट्स्‌कडे गेलेंच पाहिजे होतें

मी जाण्याकरितां पोषाख करूं लागलों, तोंच कॉफी आली. इतक्यांत बाईहि येऊन ह्मणाल्या—

" डॉक्टर, तुह्माला मी मुद्दाम ज्याकरितां बोलावलें त्याबद्दल तर तुह्मी अगदी मौनच धरलें. रात्रीं तुह्मी अंबूला पाहिलीना? तिच्याबद्दल आपला काय अभिप्राय आहे? परिणाम वाईट होण्यासारखी जरी कांहीं हकीगत असली तरी सांगावयास कचरूं नका. शक्य तितकें वाईट ऐकून घेण्याची मी मनाची तयारी करूनच ठेविली आहे. तेव्हां खरें कांहीं असेल तें स्पष्टपणें सांगण्यांत छपवाछपवी मुळींच करूं नका.

क्षणभर तिच्याकड पाहून मी ह्मणालों—" खरोखर मला तिच्यांत तसा मोठा बिघाड झाल्यासारखा दिसला नाहीं. "

" तर तिची मुद्रा का हो अशी कावरीबावरी, आणि बघते एकीकडे, करते भलतेंच, लक्ष तिसरीकडेच असें कां बरें तर मग ? "

" खरं सांगायचं तर, बाई, मी आपल्याला सांगतों, असले प्रकार कांहीं मला दिसून आले नाहीत. मी तिला नीट पाहिली. बाबासाहेब गेल्यामुळें तिच्या मनावर जें दुःखाचें दडपण पडलें त्याच्याशिवाय आणखी कांहीं नाहीं भिण्यासारखें. बाई, खरोखरच नाहीं त्याच्यांत कांही. "

" तर मग तिचा मेंदू ठिकाणावर आहे म्हणतां अजून ? "

" होय. तिच्या मेंदूला कांही एक झालेलें नाही. ती जे कांहीं विचार करीत असेल ते तिच्यासारख्या अशक्त मानसिक प्रकृतीच्या स्त्रीला एवढें दुःख झाल्यावर न करणें अपरिहार्य आहे. "

" तिच्याकडे पाहिल्यावर माझा जीव मला नकोसा होतो हो ! सारखी आपली रडतच बसते. पूर्वी ती असें नांव घेत नसे. आतां ती नांव घेऊन जणू कांही बाबासाहेब समोर उभेच आहेत असें समजून संभाषण करीत बसते. काय एकन्‌दोन; किती सांगावे तिचे प्रकार ? इथून निघून कुठे तरी लांब एखाद्या हवाशीर ठिकाणीं किंवा नरसोबाच्या वाडीसारखा कृष्णाकाठच्या तीर्थक्षेत्री जाऊन राहावेंसे मनांत कित्ती कित्ती येते म्हणून सांगू ? पण करणार काय हिच्यापुढें ? ज्याचे नांव तें. कबूल होत नाहीं. बोलायचीच मग बंद होते ! "

ती मुंबई सोडण्यास कबूल कां होत नाही हें मला ठाऊक होतें. रात्रौ मेलेल्या ( ? ) नवऱ्याला भेटून मग खांद्यावर हात घालून फिरावयास जावयाला मिळालें नसतें. अंबुताईच्या ह्या " विधवेच्या सोंगाने " बिचारी बाई मात्र खरोखरीच घाबरून गेली होती. अथवा तीच का ? खुद्द मलाच वाटत होते कीं बाबासाहेबांकरितां अंबुताई मस्तक हलकें होऊन जाईपर्यंत शोक करीत आहे. प्रत्येक हालचाल, प्रत्येक कृति ती इतकी जपून करी कीं तिच्याबद्दल पाहणाराच्या मनांत दया व कींव उत्पन्न व्हावी. त्या बाईला मला कितीतरी वेळ मी रात्रौ जें काय पाहिले होतें तें सांगून टाकावेंसे वाटलें. पण तसें करणें योग्य नव्हतें. कारण वर लिहिलेली ' बॅकबेवरील संभाषणाची ' हकीगत जर मी लिहिलीं आहे तशीच कुणास सांगितली असती तर ती कोणासच खरी वाटती ना. उलट माझी मात्र वेड्यांत गणना झाली असती. शेवटी ही हकीगत तर मला बाईला सांगतां येईना आणि तिचें समाधान होईल असें दुसरें कांहीं बोलावयास सुचेना. अशा स्थितींत मोठ्या दिलगिरीनें तिची परवानगी घेऊन निघून जाण्याशिवाय मला कांहीं गत्यंतरच नव्हतें.

मी बाहेर पडतांना मला पोंचवावयास म्हणून माझ्या मागून दादरापर्यंत येत असतां बाई म्हणाली—

" तुम्ही तर आतां जाताच. पुन्हां केव्हा याल तेंहि समजत नाहीं. मला मात्र अंबूची फारच काळजी लागून राहिली आहे. "

" तिच्याबद्दल तुम्ही निश्चिंत राहा. तिला कांहीं होणार नाहीं. हवा बदलावयास तिला न्यावयास मिळेल तर बरें होईल. तथापि नाहीं मिळालें तरी तिला बळजबरीनें मात्र कुठे घेऊन जाऊं नका. तिच्या मनाला विश्रांति पाहिजे होती. सध्यां नवऱ्याच्या मृत्यूच्या विचारापासून तिचें मन परावृत होईल तेवढें केलें पाहिजे. परंतु या मुंबईत असेपर्यंत तसे होणे शक्य नाहीं. आणि त्याला काही इलाज नाहीं बरें, येइन मी पुनः केव्हा तरी " असें म्हणून खाली गेल्यावर पुनः एकवार मी तिला ओरडून सांगितले—

" अथवा जरूर लागेल तेव्हां मला कळवा म्हणजे मी येईन. "

परत जातांना गाडींत माझ्या मनांत तेच विचार घोळत होते. संजीवन मला भेटतो केव्हां आणि त्यालाहि आश्चर्य वाटेल अशा फक्त मीच पाहिलेल्या गोष्टी त्याला सांगतों केव्हा असें मला होऊन गेले होतें. वृद्ध बाबासाहेब अद्याप हयात आहेत हा शोध लहानसान नव्हता. त्या अद्भूत गोष्टीवरून एकंदर खुनाच्या चमत्काराचा तलास लावणें अगर ती अद्भूत गोष्ट कशी घडली असावी याबद्दल कारणमीमांसा करीत बसणें निरर्थक होते. मी स्वतः प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांनीं त्याना पाहिलें होतें; आणि स्वतःच्या कानांनीं प्रत्यक्ष त्याना बो[illegible]तांना ऐकले होतें. प्रत्यक्षाला प्रमाणांची जरूरी काय ? विचिकित्सा क[illegible] मी सोडून दिलें. कारण त्या त्याच्या संभाषणांत अंबूताईनीं बाबासाहे[illegible] भेटण्याचें सांगितले तें मी ऐकले होतें. तेव्हां तिच्या आगमनाची [illegible] राहाण्याचे मी ठरविलें.

खरोखर अंबूताई मला येऊन केव्हां भेटतील असें झालें [illegible] तेव्हां तिच्याकडून सर्व हकीगत काढावयाची; आपल्या तों[illegible] महत्वाचा शब्द उच्चारावयाचा नाहीं असा मी ठाम नि[illegible] अद्भुत चमत्काराचा पत्ता मीच लावणार अशीहि आतां म[illegible] डिटेक्टिव् कादंबऱ्या स्वतः मी पुष्कळ वाचल्या आहेत;

स्यमय गुंतागुंतीची प्रत्यक्ष घडलेली ही हकीगत अगदीच नवीन. बाकीच्या प्रसिद्ध केलेल्या कादंबऱ्या म्हणजे लेखकांच्या कल्पनेचे खेळ होत; आणि मी ज्यांत गुरफटलों गेलों आहें ती खरीखुरी हकीगत असून ती जर पुढ मागें लिहावयास घेतली तर आपणच तिचे नायक होऊं असें वाटून तशा सभयस्थितींतहि मी एक प्रकारच्या भावी आनंदाचा अनुभव घेऊं लागलों.

मी हॉस्पिटलांत दोन वाजेपर्यंत होतो. त्यानंतर मी कोटांत डॉ. नियोगींच्या दवाखान्यांत रोजच्याप्रमाणें त्याच्या केसीस चालविण्याकरितां जातों; तर आज कित्येक दिवसांनीं दवाखान्यांत डॉ. नियोगी स्वतःच हजर असलेले पाहून मला अचंबा वाटला. कारण डॉ. साहेबांची आज आपण येणार असल्याबद्दल आगाऊ सूचना वगैरे कांहीं नव्हते.

" कसे काय मोहन ? कसा अगदीं अनपेक्षित आलों ना मी ? " डॉ. नियोगी हंसत हंसत मोठ्यानें ह्मणाले. " आज सकाळीं मला अगदीं साफ बरें वाटलें आणि ह्मणून मी आज आलों "

" बरें झालें एकदांचे आलांत ते, " मीहि आनंदानेंच ह्मटलें. " आज हॉस्पिटलांत देखिल आपली चौकशी चालली होती. "

"मोहनराव! काल रात्रीं तुह्मी बाहेर गेला होता ह्मणून ऐकलं, खरं काय ? "

" होय, निकडीच्या बोलावण्यावरून गेलो होतों खरा; " मी हंसतच उत्तर ंतु मी कुठें गेलों होतों हें मात्र त्यांना सांगितलें नाहीं. कारण कस्तुर ग भाग्योन्नतीच्या मार्गांतला एक खडक आहे; अशी त्यांची नेह- पसे. तेव्हां तिच्या आईकडे मी गेलों असें कळल्यावर तें देखिल यांनीं एखादें लांबलचक लेक्चर द्यावयास सुरवात केली असती. कस्तुरच्या विरुद्ध कोणी बोलल्यास मला तें मुळींच सहन खून झालेला इसम मयत नसून हयात आहे या एकाच ुनाचें कोडें गूढतम करून टाकलें असलें तरी कस्तुरबद्द- ' अंदेशा तिनें घालवून दिली होती. जरी बाबासाहेबांशीं

केलेला पत्रव्यवहार तिनें मजपासून अद्याप चोरून ठेविला होता, तरी एरवी ती या खुनाच्या बाबतींत पूर्ण निर्दोषी होती अशी माझी खात्री झाली.

डॉ. नियोगी व्हिजिट्सनां निघून गेले. आलेल्या पेशंट्सना मी औषध देण्याकरितां प्रिस्क्रिपशनें लिहूं लागलों. मनुष्याचें मन स्वस्थ नसलें ह्मणजे तो आवश्यक काम करावयाचें ह्मणून कसें तरी यंत्राप्रमाणें ढकलीत असतो. मीहि त्या दिवशीं आलेल्या आंजाऱ्यांना नेहमींचे कांहीं ठराविक प्रश्न विचारले आणि इजा न होईल अशी साधारण ठराविक प्रिस्क्रिप्शने लिहून दिलीं. वास्तविक डॉक्टरीसारख्या धंद्यांत असे बेफिकीरपणें वागणे हें क्रूरपणाचें लक्षण आहे हें मी जाणतों. तथापि डॉक्टर हा देखिल कोणी ' भवसागर तरून गेलेला तापसी " नसून तो आपल्या सारखाच संसारांत राहून सुखदु:खें भोगणारा व्यवहारी माणूस आहे हें पेशंट् लोक नेहमीं विसरतात असें कष्टानें ह्मणावें लागतें. जरूरींच्या वेळीं, संकटाच्या वेळीं प्रथम बोलावतील डॉक्टराला, पण बिलें चुकवतानां–चुकवावयाचीं मनांत आलींच तर–सर्वांच्या शेवटीं आठवण होणार बिचाऱ्या डॉक्टरंची !

सुमारें पांच वाजतां मी बिऱ्हाडी आलों. माझ्या टेबलावर नोकरानें ठेविलेलें पत्र माझ्या दृष्टीस पडले.

" ठाणें सोडून आपण बाहेर फिरणे बरें नव्हे. तथापि हें पत्र पोंचतांच कस्तुर कोठें आहे ती चौकशी काढून तिच्या तपासांत राहावें, कांहीं तरी नवीन प्रसग घडला आहे, पण काय हें मला अद्याप उमगलेलें नाही. तुला तें समजण्याचा बराचसा संभव. याकरितां ताबडतोब निघावें. परंतु आपण चौकशी करीत असल्याचा संशय मात्र कोणासहि येऊं देऊं नये. "

—" संजीवन. "

माझ्या अगोदरच्या क्षुब्ध मनोवृत्तींत ही आणखी एक पुन्हा भर पडली. हे आणखी नवें काय उद्भवलें ? संजीवन यावरून खुनाच्या शोधांत आहे हें उघडच झालें. पण त्याला कांहीं खरा सुगावा लागत आहे काय ? हा प्रश्नच होता. त्याला खरा सुगावा लागला असता तर माझ्या मतें अझूनहि आता

कस्तुरच्या मागे त्याचा ससेमिरा राहिला नसावा. मी अशा विचारांत असतांच कपडे करून कस्तुरच्या मावसबहिणीकडे जावयास निघालों.

कस्तुरच्या मावशीच्या मी फारसा परिचयाचा नव्हतों. तरी एक दोन वेळां ती मुंबईस बाबासाहेबांच्या घरीं आल्यामुळें माझी व तिची अगदींच ओळख नव्हती असें मात्र नाहीं. मी गेलों तेव्हां घरीं पुरुष मंडळी कोणी नव्हती.

मी गेल्यावर व्हरांड्यांत एका आराम खुर्चीवर बसलों. मावशीबाई आंतूनच माझ्याशीं बोलूं लागल्या—

" बरी कशी वाट चुकलांत इकडची ? "

" दवाखान्याचें काम आणि खासगी प्रॅक्टिस् ही दोन्ही सभाळून वेळ मिळेल तेव्हां ना ? "

हें एकच ठराविक उत्तर सर्वांना द्यावयास मला कंटाळा येई.

" म्हणूनच म्हटलं, आज कसा वेळ मिळाला ? "

मलाच कांहींच उत्तर सुचेना. मी हातरुमाल घेऊन डोकीचा घाम पुसण्याचे निमित्त करून खिशांतून उगीच घड्याळ काढून पाहूं लागलों, तोंच कस्तुरची मावस बहीण चहा व शिरा ठेवून गेली. ती जात असतां मी तिच्याकडे वर मान करून पाहिलें. माझी निराशा झाली. कस्तुर असती तर ती स्वतःच चहा घेऊन आली असती. तिची मावस बहीण पुढें आली त्या अर्थी ती इथें नाहीं खास हें मी तेव्हांच ताडलें.

माझ्या मनांत उडालेली चलबिचल ताडूनच कीं काय मावशीबाई म्हणाल्या " कस्तुर आज इथं नाहीं. "

मला हवा होता तोच विषय निघाल्याबरोबर मी आतुरतेनें विचारलें " तर कुठें ? "

"आपल्या वर्गातल्या एका बालमैत्रिणीच्या बोलाण्यावरून ती आतांच ठाण्यास गेली आहे. बरोबर तिची थोरली मावस बहीणहि आहे. दोघीहि गेल्या आहेत, तेव्हां कदाचित् राहातील आजचा उद्यांचा दिवस. आणि तिला कुठें आतांशा करमत नाहींसें झालें आहे; तेव्हां वेळ घालविण्यास मिळेल तिकडे ती जाते. "

" होय, बाबासाहेब गेल्यापासून तिकडे अंबूताई आणि इकडे ही दोघीहि सारख्याच झाल्या आहेत. " मी मुद्दाम ह्मटलें. " पण आतां सगळा जन्म काय असाच घालवावयाचा आहे. ? कांहीं तरी विचार करून वागलें पाहिजे. कोणी ह्मणाले तरी ? "

" बाबासाहेब गेल्यामुळें परिणाम झाला तेवढाच असता, तर ती इतकी निराश झाली नसती. पण माणसानं मनाशीं बाळगून ठेवलेली आशा नाहींशी झाली ह्मणजे त्याची वेड्यासारखी स्थिति होते. तशांत आपला झालेला तोटा सहन करावयाचा तेवढाच भार जर शिरावर पडेल तर सहन करतां येईल, पण कस्तुरच्या सारख्या कोवळया मुलीला आपला जन्माचा तोटा सहन करूनहि आपल्या तरुण व सुखी मैत्रिणीच्या चेष्टा जेव्हां ऐकाव्यां लागतात, तेव्हां सारं आयुष्यच तिला कंटाळवाणं वाटल्याशिवाय कसं बरं राहील ? "

यावरून कस्तुरनें आमच्या दोघात घडलेली सर्व गोष्ट आपल्या मावशीला सांगितली आहे हें कळून चुकलेंच. पण मला मात्र वाईट वाटलें. मावशीनें ही कस्तुरची हकीगत सांगतांना अप्रत्यक्षपणें मला दोष दिला तो योग्यच होता. मला तरुण मुलींच्या जातीचा त्या वेळीं मनापासून फार राग आला. बाबासाहेब हयात आहेत हें प्रत्यक्षपणें पाहिल्यापासून तर उगीचच्या उगीच कस्तुरचा संशय घेऊन मी तिचें मन दुखवलें असें मला वाटून मी स्वतःला खूप दोष दिला. पण आतां झाली गोष्ट सुधारावी कशी ह्याच विचार माझ्या पुढें होता. संजीवननें तर मला कस्तुरवर पाळत ठेवावयास सांगितलें होतें ।

" एरवीं तिची प्रकृति नीट आहेना ? नाहीं तर थोडासा हवापालट होतो आहे तो बराच आहे " मी उत्सुकतेने म्हटलें.

"सगळी प्रकृतीन् बिकृती मनावर अवलंबून ना? मग एकटें मनाचे दुःख शभर शरीराच्या दुःखांना उभें करील. तिची प्रकृती देखिल पूर्वीसारखी नाही. अगदी फिकट होऊन गेली आहे. मी त्या दिवशीं तिला सांगून देखिल टाकलें की तुला आतां कोणाच्याच औषधाने गुण पडणार नाहीं. त्याला आतां डॉक्टर एकच—"

" कोण तो ? " मी मध्येंच उतावीळपणें विचारलें.

" डॉक्टर मोहनराव ! "

मी हांसलों. खरोबरच. तिचें मानसिक दुःख वाढत गेले तर कशावर घालील याचा नेम नाहीं. आतां याला औषध एकच आणि तेंहि आतांच दिलें पाहिजे होतें. दोघांचींहि मनें निर्मळ करून पूर्ववत् दिलसफाई याच घटकेला झाली पाहिजे होती. पण या वेळीं कस्तुर हजर नव्हती. खरोखरच प्रत्येक बाबतींत आम्ही पुरुषच फार उतावीळ असतों.

" बरें, ती नक्की कधीं येईल म्हणालांत ? "

" कां ? कां बरं ? कशाला पाहिजे ती ? " मावशीबाई मुद्दाम म्हणाल्या.

" आपलें सगळें बोलणें माझ्या ध्यानांत आलें. माझा त्या बाबतींत गैरसमजच झाला. आणि तो दोष माझाच आहे. म्हणून त्याबद्दलचा गैरसमज दूर करावयाचा आज माझा विचार होता. " मी गंभीरतेनें उत्तर दिलें.

" खरंच कीं काय ? " मावशीबाई चमत्कारिक चेहेरा करून म्हणाल्या. "तर मग आपण फार उशीरां आलांत. आपली आजपर्यंत तिनें वाट पाहिली; पण याउपर आपणाला अशी बुद्धि होईल असें तिला वाटेना तुमच्याकडून एखादें पत्र तरी येईल म्हणून तिनें किती तरी वाट पाहिली. कधीं कधीं तर ती एकटीच रडत देखिल बसे. माझ्या बोलण्याचा राग येऊं नये, पण स्त्रियांची आपल्यावरील प्रेमाची कसोटी पाहण्याकरितां अथवा केवळ लहरी खातर म्हणून परीक्षेची दोरी पुरुष इतकी ताणतात कीं शेवटीं ती तुटून जाऊन तिचीं दोन टोकें दोन बाजूस जाऊन पडतात. आणि शेवटीं ती स्त्री आपला आयुष्याचा एक कुठला तरी निर्णय लावून टाकण्याच्या मार्गास लागते. "

हे शब्द ऐकण्याबरोबर मी घाबरलों.

" आणि कस्तुरनें इतकी मजल गांठली कीं काय ? " मी विचारलें. ती रागानें बोलत होती. पण टोंचून बोलण्याची तिची पद्धत मात्र निराळीच होती.

" हें काय बरं ! आपण अजीबात तिची वास्तपूस्तच जर सोडली तर तिनं मग काय करावं बरं ? ती आतां दुसऱ्याच एका नादाला लागली आहे ! "

" काय म्हणतां ? कसला तो नाद ? " मी उद्वेगानें म्हणालों.

" पण आतां तिला सोडूनच दिल्यावर इतकी चौकशी तरी कशाला हवी? तो नाद कसला का असेना. आतां तिच्या शरीरावरहि नाहीं आणि मनावरहि आपली मालकी राहिली नाहीं ! "

" म्हणतो कोण ? मी तिचा त्याग केलेला नाहीं. " मी तिच्याकडे वळून आवेशी येऊन जोरानें उत्तर दिलें.

ती फक्त हांसली. तिच्या मुद्रेवरून तिच्या त्या रागाच्या टोंचून बोलण्यांत असत्य मुळीच नव्हतें हे मी समजून चुकलों. पण कस्तुरनें कसला नाद लावून घेतला हें मात्र तिनें मला सांगितलें नाही. तो नाद पापविषयाचा असता तर ती इतकी धिटाईनें ते शब्द बोलून नर आणखी हांसली नसती. मी पुन्हा एकवार तो नाद कसला म्हणून विचारलें; तेव्हां देखिल तिनें मला पूर्वींचेंच उत्तर दिल्यावर मग मला त्या मावशीचा देखिल भारीच राग आला.

वाचक ! इतक्या हकीगतीवरून आपण माझ्या कस्तुरची कड घेऊन तिला विनाकारण दु:ख दिल्याबद्दल माझ्यावर दांत ओंठ खात असाल," पण तिचा संशय घेण्यास मला त्या वेळीं तशीच कारणें मिळालीं हे आपण देखिल नाक-बूल करणार नाही. मी तिचा बुद्धिपुर:सर त्याग केला होता काय ?

ह्या खुनाच्या प्रसंगापासून आतां इत:पर पुढें माझ्या आयुष्यांत सुखच लिहिलेलें नाहीं असें मला वाटलें. मावशीबाईची परवानगी घेऊन मी उठून स्टेशनवर गेलों.



## प्रकरण १९ वें.

### रांकट रोगी !

खूप शिकस्त केली, पण माझ्या डोक्यांतून ते विचार जाईनात. कस्तुरच्या मावशीनें सांगितलेल्या हकीगतीपासून माझें मन अधिकच अस्वस्थ होऊन गेलें. " ती आतां दुसऱ्याच एका नादाला लागली आहे, " हेच तिच्या तोंडचे शब्द. कस्तुरला लागलेला हा नाद कसला ? माझ्या मनांत भलतेच कुविचार येत होते. ते तसले विचार अगदींच असह्य. पण ते जरी आवडत नसले, सहन होत नसले तरी हटकून येतातच. पण माझी पूर्ण खात्री कीं, जशा प्रकारचे कुविचार माझ्या मनांत काहूर करून सोडीत होते तसला नाद माझ्या कस्तुरला कधींहि लागावयाचा नाहीं. तिला कसलाहि नाद लागलेला असो, त्यामुळें ती स्वतःच्याच शरीराला वैतागून त्रास करून घेणार होती हें ठरलेंच. याकरितां तिला पत्र पाठवावें असें मी ठरविलें. कारण यांत दोषास पात्र मीच होतों. निर्मळ व प्रेमळ मनाच्या मानी स्त्रियांला अकारण लाविलेला दोष कधींहि खपत नाहीं; मग तो उघडपणें दूर करणें अशक्य झालें तर त्या स्वतःच्या जीवाचे हाल करून घेतील पण त्या बाबतींत दोष लावणाराला आपण ह्मणून हार जाणार नाहींत.

मी घरचा श्रीमंत नव्हतों हें कस्तुला माहीत होतें. मुंबईत एकवार प्रख्यातीस आल्यानंतर एखाद्या लहानशा शहरांत प्रॅक्टिस करून थाटानें व सुखासमाधानानें राहावयाचा माझा बेत कस्तुरला माहीत होता; एवढेंच नव्हे तर तिला तो फारच पसंत पडला होता. आपला संसार पुढें कसकसा थाटावयाचा याबद्दलचा ती वारंवार विचार करीत राही. अशा प्रसंगीं हा अकस्मात् घडून आलेला विपरीत परिणाम पाहून तिचें मन व मस्तक बिघडून गेल्यास नवल कसलें व त्यांत तिचा दोष तरी कसला ?

नोकरीकरितां मुंबईस राहिलेल्या नवऱ्याबरोबर गेलेली मैत्रिण आपल्या गांवीं आली ह्मणजे तिचा थाटमाट काय विचारतां ? मुंबईस जरी एखाद्या गल्लीकुचीं-

तल्या गुजराथ्याच्या चाळींत दरमहा ७ रुपये भाड्याच्या एखाद्या नासक्या खोलींत ती राहिली असली, तरी गांवांत आल्याबरोबर आपला सर्व सांठा काय असेल तो बाहेर काढतांना मुंबईंतील स्थळांच्या व वस्तूंच्या व इतरहि अनेक प्रकारच्या दुसऱ्यांच्या तोंडून ऐकलेल्या उसन्या गोष्टींचा सांठा देखिल ती आपल्या खेडेगांवांतील मैत्रिणीपुढें काढून त्यांचा पसारा मांडते. मुंबईत नवऱ्याचा पगार या महिन्याचा त्या महिन्यांस न पुरल्यामुळें तिथें हाल काढून उरलेल्या पैशांची येतांना बिस्किटें, चहा, फळें, बटाटे, डबे, खेळणीं अथवा दुसऱ्या हरएक तऱ्हेच्या वस्तू व तिकडील अर्धवट भाषा व चालीरीती आपल्या बरोबर येतांना सांभाळून आणून आपल्या गांवांत त्यांचें प्रदर्शन ती अशा रीतीनें मांडील कीं, खेडेगांवांतलीं बायकापोरें सारीं आश्चर्यानें चकभूल होऊन तिच्या गोष्टी तोंड उघडून ऐकत बसतात. म्हाताऱ्यांना आपल्या पोरांबाळांनीं पुढें मुंबईसच जावें असें वाटूं लागतें, तरुणी आपल्या नवऱ्यांस त्या दिवसापासून मुंबईस जाऊन नोकरीस रहाण्यास सुचवितात. म्हणजे हेतु असा कीं, आपणांस देखिल मग आपल्या मुंबईवाल्या मैत्रिणीच्यावर कडी करतां यावी. आणि मुलगे तर आपण चार अक्षरें येण्याबरोबर मुंबईस जाण्याचा निश्चय करूनच बसतात. तशांत त्यांना थोडासा अभ्यास केलेल्या मुलांनासुद्धां मुंबईत मोठमोठ्या नोकऱ्या मिळतात असें जर का कळलें तर मग त्यांनीं शाळेंतल्या अभ्यासाला रामराम ठोकला म्हणूनच समजावें. लहान मुली बापड्या आपल्या मनांतल्या मनांत मुंबईस राहिलेल्या अथवा रहाण्यास जाण्याचा संभव असलेल्या नवऱ्याच्या पदरीं पडण्याबद्दल देवास नवस करीत असतात. कारण तिकडे बरोबर वडीलधारें माणूस कोणी नाहीं, म्हणून स्वेच्छाचारी वागणूक, व शेवटीं गांवांत आल्यावर सर्वांसमोर नसती श्रीमंती मिरवावयास मिळण्याची बलवत्तर आशा या दोन गोष्टींमुळें त्यांना आपण मुंबईस केव्हां जाऊं असें वाटूं लागतें.

त्यांतहि एखादीला थोडें बहुत लिहितां वाचतां येत असलें तर कादंबऱ्यांतील व मासिकांतल्या गोष्टींतील मुंबईतील रहाणीच्या गोष्टी वाचून तशा गोष्टींतील

नायिकांसारख्या आपण अभक्या बाई कधीं होऊं ह्मणून त्या जशा कांहीं वाट पहात बसतात. त्यांतूनहि एखाद्या मैत्रिणीमंडळांतून जिच्या नशिबीं शेजारच्याच गांवांतील एखाद्या तरुण परंतु सुदृढ व घरची व्यवस्थाच पहात राहिलेल्या नवऱ्याच्या पदरीं पडण्याचें येईल, तिला स्वतःला व तिच्या मैत्रिणींला तिचें नशीब कोतें वाटूं लागतें. आतां खेड्यात रहाणारे कांहीं लोक कमी शिकलेले व डामडौलाची मिजास नसल्यामुळें साध्या वागणुकीचे असतात खरे, परंतु अशाच तरुणांचा वांटयास आरोग्याचा बराचसा वांटा आलेला असतो हें पुष्कळांच्या ध्यानांत येत नाहीं. तुटपुंज्या ज्ञानावर मुंबईस जाऊन शरीर झिजवून महिन्याकांठीं मिळविलेले कांहीं रुपये भाडयाच्या, महाग राहाणीच्या, डामडौली संवयीच्या व करमणुकीच्या साधनांच्या हिश्शास हिश्शेरशीनें वांटून देऊन, व आपलें आरोग्य तर सगळेंच चहाच्या पेल्यास समर्पण करून काडीपहिलवान बनल्यामुळें हातांत काठी घेतलेल्या, कपाळाचे बसलेले आंख दिसूं नयेत ह्मणून केंस राखिलेल्या, दृष्टीची मंदता बाहेर येऊं नये ह्मणून जणूं काय फॅशनकरतांच ह्मणून लावण्याच्या बहाण्यानें सुंदर फ्रेमचा चष्मा लावलेला, भरीव दागिना अंगावर ठेवण्याची ऐपत नसल्यामुळें दीड अडीच रुपयांचे घडयाळ खिशांत बाळगणाऱ्या व शरीराची काठी निदान अखेरच्या पाळीपर्यंत तरी दृष्टीआड रहावी ह्मणून पोटास चिमटा घेऊन केलेलें शर्ट कोट घातलेल्या, अशा यांच्या मतें नाजूक, गोऱ्या, चाकरमानी व सुंदर नवऱ्याच्या गृहिणी होण्याच्या नादीं हल्लींच्या मुली लागतात हें कांहीं इतकेंसें समाधानकारक नाहीं. माझी कस्तुर या मुलींच्या वर्गाला अपवाद होती. तिला मुंबईत रहावयाचा हव्यास नसून उलट माझ्याबरोबर एखाद्या खेड्यांत रहाण्याचा तिचा निश्चय होता. वयाचें मला महत्त्व कां वांटलें हें वरील वर्णनावरून वाचकांच्या नीटपणें ध्यानांत येण्यास हरकत नाहीं असें वाटतें.

मुंबईतच जन्मलेली आणि मुंबईतच लहानाची मोठी झालेली असून कस्तुरला माझ्याबरोबर मीं जाईन तिथें एखाद्या निमखेडयांत—शहरांत रहावेसें मनापासून कसें वाटलें याचें मला राहून राहून कौतुक वाटे. मी तिला पत्र लिहावयास

बसलों. परंतु मला प्रियकरणीला तिचें मन वळेल असें
सुचेना. इतर बहुतेक डॉक्टरांप्रमाणें मी देखिल आपल्या
मी कांहीं कवि अथवा खंदा लेखक नव्हतों. त्यामुळें प्रियार
मला लिहितां येईना. फक्त मी तिला भेटण्यास गेल्याची ख
ण्याची इच्छा त्या पत्रांत दर्शविली. माझा स्वतःचा अपराध
कबूल केला व तें पत्र लिहीत असतांच बाबासाहेबांच्या टे
पाहिलेलीं पत्रें अतःपर विसरून जाण्याचें मनाशीं ठाम ठरवि
[illegible] वित असतांच अंबूताईवर नजर ठेवण्याचाहि गुप्त निश्च

[illegible] कस्तुरला निराळाच नाद लागला " हे शब्द मला रा
लागले. माझें मन व्यग्र होऊन गेलें. मला कांहीं सुचेना. त
पडलों [illegible] पत्र कस्तुरच्या वांद्याच्या मावशीच्या पत्त्यावरच पो
टाकलें आणि सँढर्स्ट रोडच्या बाजूनें गांधर्व विद्यालयाकडे वळ
गांधर्वविद्यालय हल्लीच्या जागीं आलें नव्हतें. गांधर्वविद्यालयांतील
ध्यापक माझे स्नेही होते. त्यांचें मला नेहमीं आमंत्रण येई, पण
कधींच गेलों नव्हतों. तेव्हां आज अचानक मी अनाहूतपणें आले
त्यांनाहि मोठें नवल वाटलें. त्यांनीं मला निरनिराळीं वाद्यें, व त्य
आपण तयार केलेल्या शिष्यांची प्रवीणता दाखवून बरेंच खूष क
खरोखर गायन ही एक स्वर्गीय कला आहे. गायनवादनासारख्या कल
अंगीं नाहींत व केवळ पोटाच्या मागेंच लागण्यांत व पैसा सांठविण्यांत
धन्यता वाटते ते दुर्दैवी प्राणी होत असें मला त्या वेळीं वाटलें. माझ्य
दशांशानें जरी माझ्या अंगांत गायनवादनाची कला असती तरी
भाग्यवान् समजतों. परंतु माझ्या वांटयास तें अंग नव्हतें.

परंतु इतक्यांत मला, सहज येथपर्यंत आलों आहें तर नळबाजा
असें वाटलें. पण तेथें अगदीं नवें फर्निचर देखिल बरेंच कमी किंम
असतें; व मलाहि कांहीं वस्तु विशेषतः आरशांचीं कपाटें एकदो
होतीं. आतां कांहीं घेण्याचा वेळ नव्हता; कारण संध्याकाळचे स
ले होते परंत गेलेल्या खेपेसच एकदम घ्यावयास मिळतें अ

. अदमास काढावा ह्मणून मी बाहेर पडलों. शिवाय
ह्रास यावें म्हटल्यास कधींच साधावयाचें नाहीं. एक, दोन,
हिंडलों. आरशांचीं कपाटें माझ्या मनाजोगतीं आढळेनात.
च्या किंमतीहि तशाच साग लागले अवाच्या सवा ! शेवटीं
ाबर मी किंमत ठरवून उद्यां न्यावयास माणूस घेऊन येतों
न जावयास निघालों, तोंच जिकडे तिकडे दिवे लागले होते.
होती. अजमासें साडेसहा—सातांचा सुमार असावा. मी एक-
ास्त्यांतून घाणेरड्या बोळांतून वाट काढीत चाललों होतों.
रस्ते ते ! मुसलमानी व इतर घाणेरड्या राहणीच्या गलिच्छ
रस्त्यांवरूनच कोठें मोडक्या कुलुपांखिळ्यांच्या राशी, तर कोठें,
स्या लांकूड सामानाचे ढंगच्या ढीग टाकून दिलेले. असल्या
लस्कर लवकर झपाझप पावलें टाकीत चाललो होतों. एकाएकीं
ून कोणी तरी येत असल्याचा मला भास झाला. म्हणून मागें
हेलें तों मध्यम बांध्याची व गोरटेलीशी एक स्त्री मला दिसली !
तिच्याकडे नजर जाण्याबरोबर श्वास लागल्यामुळें अडखळत ती

करा, माझ्या ह्या विनंतीबद्दल ! पण अगोदर माझ्याबरोबर चला.
ह ! डॉक्टर मोहनराव तेच आपण का ? "
कार दिला.
करा आणि मला या प्रसंगांतून सोडवा हो ! " ती दुःखपूर्ण
णाली. " माझ्या बाबांना वांचवा ! "
लणें हिंदुस्थानींत चाललें होतें. परंतु मला जरी हिंदुस्थानी लिहितां
ालें येत होतें, तरी बोलण्यांत मी तितका पटाईत नव्हतों. तथापि
। स्त्रीबरोबर मी नळबाजारांतल्या रस्त्यावरच्या सामानासारख्या
क्या हिंदींतच बोलत होतों. पण तीं माझीं उत्तरें देऊन वाचकांस
डविण्याचें कृत्य करणें मला पसंत नसल्यामळें मी तो संवाद
आहे.

मला तिची दया आली खरोखरच डॉक्टरीच्या धंद्यांत मनांत असल्यास बराच परोपकार करावयास सांपडतो, तसा दुसऱ्या कुठल्याहि धंद्यांत सांपडत नाहीं. दुसऱ्याच्या उपयोगी पडल्यानंतर मनाला जें समाधान वाटतें तें ज्याचा तोच जाणे.

" काय ? तुझे वडील आजारी आहेत ? " मी विचारलें. रस्त्यावरचा कंदील तिच्या पाठीमागें असल्यामुळें मला तिचा चेहरा स्पष्ट दिसला नव्हता. परंतु तिच्या आवाजावरून ती तरुण असावीशी दिसली.

" अगदीच बेसुमार अवस्था आहे त्यांची. हो, अकरा वाजतांच त्यांना कायसें झालें. मी तुमच्याकडे येणार होतें, पण मला ते येऊं देईनात. डॉक्टरी औषधें न घेणाऱ्या म्हाताऱ्या लोकांच्या वर्गांतले ते आहेत. "

" असे खूप म्हातारे असतात खरे, परंतु शेवटीं त्यांना डॉक्टरांकडे गेल्याशिवाय चालत नाहीं " मी उपकारकर्त्याच्या आढ्यतेनें म्हटलें. "मी काय करावें म्हणतेस, तुझ्या बाबाला पाहायला यावें होय ? "

" मग मोठीच मेहरबानी होईल साहेब. आतां फारच संध्याकाळ झाली आहे; तथापि आपण येथवर आलां आहांत; आणि आमचें घरहि कांहीं फार लांब नाहीं. त्या तिथं आहे. मी तुम्हाला वाट दाखविते चला ! " ती आपल्या घराकडच्या बाजूकडे बोट करून म्हणाली व वाटेला लागली देखिल. मीहि लगेच तिच्या मागोमाग चाललों. अशा पुष्कळ निराश्रित गरीब रोग्यांस फुकट औषधें देऊन बरें करण्याबद्दलचा माझा बराच लौकिक होता. गरिबांस मदत करण्याचा प्रसंग आला म्हणजे मला एक प्रकारचें स्फुरण चढे. तशाच स्फुरणानें प्रेरित होऊन मी तिच्या मागून चाललों असतां तिला तिच्या बापाच्या आजारीपणाबद्दलची हकीगत विचारली. पण तिला नीटपणें कांहींच सांगतां येईना. कदाचित् बापाच्या काळजीनें घाबरून गेल्यामुळें तिला कांहींच सांगतां येत नसेल असें मला त्या वेळीं वाटलें. पण होता प्रकार निराळाच !

तिच्याशीं झालेल्या संभाषणावरून तिला आई नव्हती, आणि बापाला हल्लींच दारू पिण्याचा नाद लागला होता. तो नेहमीं आतांशा दारुड्यांच्याच

संगतींत मिसळून राही. तो चांगला हार्मोनियममेकर असून त्याला फोर्टमधील एका मोठ्या दुकानांत हार्मोनियम दुरुस्त करण्याची चांगली नोकरी होती. अठरा वर्षेपर्यंत त्या धंद्यांत त्याला बराच पैसा मिळत होता. परंतु त्यानंतर बायको वारल्यामुळें त्याला करमेनसें होऊन तो दारूच्या नादीं लागला वगैरे कांहीं माहिती मला समजली.

" तिथून पुढें त्याला दारूचा छंद लागला ? " मी विचारलें.

" होय, साहेब; " ती म्हणाली. "आमची आई व बाबा भांडतांना मी कधींच ऐकलीं नाहींत. " ती डोळ्यांत पाणी आणून म्हणाली.

"आतां त्यांना होत आहे काय ? पोटांत दुखते आहे कीं मस्तकांत ? "

" त्यांना कायसेंसं होतं आहे. काय होतं तें मला कांहीं समजत नाहीं. " थोडेंसें बावरल्यासारखें करून तिनें उत्तर दिलें. तिचीं ती उत्तर देण्याची पद्धत पाहून मला थोडासा संशय वाटला. आपल्या बापाच्या आजारीपणामुळें तिचें देहभान उडालें होतें. पण त्याच्या आजाराची कांहींच हकीगत तिला सांगतां येत नव्हती. तिनें एकच गोष्ट मात्र नक्की सांगितली आणि ती ही कीं, सीक पडण्याच्या आधल्या दिवशीं मात्र तो दारू प्यावयास गेला नव्हता.

नुकत्याच आलेल्या वाटनें मला परत जावें लागत होतें. आडव्या तिडव्या वाटेनें कित्येक रस्ते ओलांडून एका कंदीलाच्या बाजूनें चाललों असतां तिचा चेहरा मीं त्या कंदीलाच्या उजेडांत पाहिला. तो दुःखपूर्ण चेहरा मी केव्हांतरी पूर्वीं पाहिला असावा असें वाटलें. तत्क्षणींच मला आठवलें कीं, काहीं दिवसांपूर्वीं बोरीवलीहून येतांना माझ्याच गाडींत जी स्त्री बसली होती तीच ही असावी तिचे केस निष्काळजीपणामुळें विखुरलेले होते. मी तिला पूर्वींची ओळख दाखविली नाहीं. वळणें घेत घेत केव्हां उजेडांतून तर केव्हां काळोखांतून अशा रीतीनें गलिच्छ वस्तींतीले ते घाणेरडे रस्ते तुडवीत शेवटीं एकदांची ती स्त्री निदान बाहेरून तरी स्वच्छ दिसणाऱ्या एका घरासमोर उभी राहिली.

या बोळांत म्युनिसीपालिटीचा कंदील मुळींच नव्हता. तें घर त्या लाइनीच्या अगदी शेवटचें होतें व जरासें अलग बाजूलाच होतें. पण आजूबाजूची वस्ती मात्र घाणेरडीच होती.

दरवाजा उघडून ती आंत गेली. तिच्या मागोमाग मीहि आंत गेलों. तिनें पेटीवर काडी ओढून दिवा लावीपर्यंत मीं खिशांतील माझें थर्मामिटर व स्टेथॉस्कोप् चांचपून पाहिला. तिने दिवा लावून मला आपल्या मागून माडीवर येण्यास खूण केली. पोषाख मराठी आणि भाषा हिंदी बोलणाऱ्या त्या स्त्रीच्या मागोमाग मी माडीवर गेलों. तेथल्या एका खोलींत मला बसावयास सांगून आंत बापास वर्दी देण्याकरिता ती गेली व जाताना तो दरवाजा तिने ओढून घेतला. तेथें हार्मोनियमच्या मोडक्या फळया, एक दोन दुरुतीसाठीं आलेल्या पेट्या, व इतरहि कांहीं लहान लहान हत्यारें फडताळांतून पडलेलीं होती. केसरी, जागरूक, ज्ञानप्रकाश वगैरे वृत्तपत्रांचे कांहीं जुने अंकहि तेथें होते. त्यांतील जागरूकचा एक अंक हातास जवळच सांपडला तो घेऊन उघडला तो त्यांतील " ब्राह्मण व ब्राम्हणेतर " या अग्रलेखावर माझी नजर गेली. तो वाचण्यांत मी इतका गढून गेलों कीं, क्षणभर मी कुठें आहें याचें स्मरण देखिल मला झालें नाहीं. मागासलेल्यांचा कैवार घेऊन हा लेखक जीव तोडून लिहीत असतो असें मला वाटलें, मात्र विरुद्ध वर्गास द्यावयाच्या शिव्यांचें प्रमाण जरा कमी झालें असतें तर लेखाचें स्वारस्य बिघडलें नसतें; उलट अधिकच वाढले असतें. त्या लेखाच्या वाचनांत अजमासें दहा मिनिटें माझीं गेलीं असतील, इतक्यांत आंतील बाजूच्या खोलींत कोणीतरी म्हातारा माणूस बोलत असावा असें मला ऐकूं आलें. त्याचा आवाज हलका आणि बसला होता, त्यामुळें तो काय बोलत होता तें मला समजले नाही. इतक्यांत लवकरच ती तरुण मुलगी आली आणि तिनें मला शेजारच्या खोलींतील एका बिछान्याकडे नेलें.

त्या खोलींत एका कोंपऱ्यांत एकच चिमणी लावलेली होती. तीहि वापरून वापरून बरीच जुनी झालेली व स्वच्छ न पुसल्यामुळें कांचेच्या चिमणीच्य आंतील बाजूस वरून बरेंच काजळ पडल्यामुळें प्रकाश फारच अधुक पडलेला होता. तशांत त्या दिव्यावर भोंक पाडून एक कागद अशा रीतीनें चिमणीवर बसवून दिला होता कीं, त्याची छाया आजाऱ्याच्या सर्व बिछान्यावर पडली होती. रोग्याच्या डोक्याकडच्या बाजूस त्या खोलीला एक दरवाजा होता, पण तो पूर्णपणें झांकलेला नव्हता अथवा सताड उघडाहि नव्हता. आणि चमत्का-

राची गोष्ट अशी कीं, त्या रोग्याची निजावयाची खाट उत्तम लोखंडी असून त्याच्या दोन्ही टोकांना पितळेचा कठडा होता. गाद्या देखिल उंच व मऊ असून आंथरूणपांघरूणाचे कपडे बरेच उंची दिसले मला रोग्यापाशीं बसावयास सांगून लगतच्या दारानें ती मुलगी आत शिरली आणि तिनें दरवाजा झांकून घेतला.

त्या काळोखांत उशीवर--उशी देखिल मखमलीची होती—काळ्याकुट्ट दाढीचा रांकट चेहरा मला दिसला.

" आपणाला काय होत आहे ? " माझ्याकडे त्यानें पाहिल्याबरोबर मी त्याला विचारलें. " आपली मुलगी तर फारच घाबरून गेली आहे. "

" मला कालपासून बरें वाटत नाहीं" घोगऱ्या आवाजांत तो हळू बोलला. " पण एवढ्याकरितां तिनें तुम्हाला त्रास द्यावयाचा नव्हता. खुळीच पोरगी!"

" जरा थांबा हं ! " मी इकडे तिकडे पाहत व जवळ बोलावयास दुसरें कोणी माणूस नाहीं असें दर्शवीत म्हटलें. " मी दिव्याचा प्रकाश जरा मोठा करितों. या काळोखांत कांहींच दिसत नाहीं. "

" अंहं:--नको, नको, नको. मला दिव्याचा उजेड अगदींच सहन होत नाहीं. यांतच काय दिसेल तेवढें तुम्ही बघून घ्या. दिवा पुढें आणूं नका, किंवा वातहि मोठी करूं नका. " म्हातारा म्हणाला.

" बरं नाहीं आणीत दिवा बरं मी ! " असें म्हणून माझें वॉच् बाहेर काढून मी ते एका हातांत घेतलें आणि त्याचा हात घेतला.

" मला ताप आहे असेंच तुम्ही आतां मला सांगाल, " तो रांकट रोगी थट्टेच्या स्वरांत म्हणाला. त्यावरून वैद्यांच्या औषधांना कस्पटाप्रमाणें मानणाऱ्या लोकांच्या वर्गांतील तो होता हें मी तेव्हांच ताडलें.

त्याचा हात धरून मी बसलों असतांच घड्याळाचे कांटे पाहण्याकरितां म्हणून मी उजेडांत हात पुढें लांबवून मान लांब करून पाहूं लागलों तोंच एक आकस्मिक प्रकार घडला.

माझ्यामागें पिस्तुल उडाल्याचा आवाज आला. त्याबरोबर मीं दचकून उठलों. रोग्याचा हात सोडून जिकडून आवाज आला त्या दरवाजाकडे मी वळून पाहतों आहे तोंच दुसरा आवाज झाला; व एक भयंकर माणूस पिस्तूल रोखून माझ्यासमोर उभा राहिला !

माझ्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला. माझी सोन्याची सांखळी आणि सोन्याचें घड्याळ या दोन वस्तूंनीं ही माझ्या जिवावर पाळी आणली हें मीं ओळखलें. ११ साइझचें, १८ कॅरेट् गोल्ड्चें व तीन वर्षांच्या गॅरंटीचें, नवीन फॅशन्चें १७५ रुपयांचें माझें सोन्याचें घड्याळ होतें. व छेडा देखिल १८ कॅरेट् गोल्ड्चा १३० रुपये किंमतीचा होता. चोरांची ही फसवेगिरी मला पूर्वी ऐकून माहित होती; आणि आतां प्रत्यक्ष माझ्या प्राणावर बेतली होती. आजारी माणूस ते आवाज ऐकल्याबरोबर बिछान्यावरच ताडकन उठून बसला आणि तत्क्षणींच तसलेच दोन काळेकुट्ट रांकट बेरड माझ्यावर त्या खोलींतून चटकन बाहेर येऊन तुटून पडले. अर्थातच हा सर्व कट पूर्वी जुळवूनच ठेवलेला होता. आणि त्या मारेकऱ्यांना शेजारी आवाज ऐकतील कीं काय वगैरेबद्दलची भितीहि वाटत नव्हती असें स्पष्ट दिसलें. ही जागा वाईट आहे हें मला ऐकून ठाऊक होतें परंतु अशारीतीनें अकस्मात् माझ्यावर हल्ला होईल अशी मला कल्पनाहि नव्हती. मी इतका घाबरून गेलों होतों कीं, क्षणभर काय करावें हें न सुचून मी नुसता ताठ उभाच राहिलों. त्यांचा हेतु काय हें मला समजेना. त्यांचा एकच हेतु मला ठार मारण्याचा त्यांच्या लाल नजरेंतच प्रतिबिंबित झालेला मला दिसला.

निमिषार्धांत त्यांनीं माझ्यावर हल्ला चढविला. माझ्या हृदयांत धडकी भरली. पळून जाण्याचा प्रयत्न फुकट होता. मी त्यांच्या हातांत एकाकी सांपडलों.



## प्रकरण २० वें.

### बहीणीचा कळवळा कीं सोंगाची संपादणी ?

"झटपट ! " तो आजारी धटिंगण बोलला. त्यानें माझे दोन्ही हात आंवळून धरिले होते. त्या खोलींतला एक इसम स्पंजवर बाटलींतून कांहींसें ओतीत होता. वासावरून तें क्लोरोफॉर्म होतें हें मी तेव्हांच समजून चुकलों.

सुदैवानें मीहि कांहीं काडीपेहलवान् नव्हतों आणि अजूनहि तसा नाहीं. दोन तीन हिसक्यांनींच त्या रांकट रोग्याला मीं इतक्या जोरानें झोंकून दिलें, कीं, तो भिरभिरतच लांबच्या कोंपऱ्यांपर्यंत पसरला. जलदीनें डाव साधण्यांतच माझी सुरक्षितता होती. क्लोरोफॉर्म एकवार का माझ्या नाकासमोर येतें कीं साराच बाजार आटोपला असता. हे मारेकरी भयंकर पठाण असून त्यांचा मला मारण्याचा निश्चय मी ओळखून चुकलों.

त्या रांकट रोग्याला लोळवलेला पाहतांक्षणींच त्याचे दोघेहि साथीदार फारच खवळले. त्या क्रोधावेशांत हातांतील स्पंजाचा तुकडा बाजूला ठेवून ते दोघेहि माझ्यावर धावले. ती स्पंज ठेवलेली जागा लक्ष्यांत ठेवून मी त्यांना माझ्या अंगावर घेण्याकरितां ह्मणून मागें सरकलों. आणि डुकराशीं झगडतांना जसें करतात, त्याप्रमाणें त्यांना धावण्याचा रोख घ्यावयास लावून ते जड शरीराचे पण माझ्यावर येईपर्यंत मी दिव्याच्या बाजूला हलक्या आंगानें चपळाई करून पळालों. इतक्यांत ते माझ्यावर येऊन कोसळलेच. तत्क्षणींच त्यांतील एकाच्या कंबरेचा सुरा, त्याचें तिकडे वळण असतां मीच हिसकून घेऊन दिवा मालवून टाकला; व एका हातांत तो पडलेला स्पंजचा तुकडा आणि दुसऱ्या हातांत सुरा घेऊन दोन्ही हात सारखे चक्राकार फिरवीत राहिलों.

एवढ्या अवधींत तो रांकट रोगीहि तोल सांवरून माझ्यावर येत होता. परंतु माझ्या हातांत कोणत्या वस्तु आल्या होत्या हें त्याच्या लक्षांत आलें नसल्यामुळें माझ्या सुऱ्याच्या वाराला पुन्हा तोच बळी पडला. हाताची शीर तुटल्यामुळें त्यानें देवाचें नांव घेऊन लोळण घेतली तो पुन्हा उठलाच नाहीं.

इतक्यांत मी दरवाजा उघडण्याचा प्रयत्न करूं लागलों. तें त्यांतील एकाच्या लक्षांत येऊन तो पुढें येत होता; तोंच त्याच्या नाकाशीं मी स्पंज पिळला. दुसऱ्यावरहि तोच प्रयोग केल्यावर मी दरवाजा उघडून पळत सुटलों.

पळत सुटलों, पण तितक्यांत मला एका गोष्टीची आठवण झाली. त्या घराचा पत्ता व खाणाखुणा टिपून घेतल्याशिवाय पोलीसला वर्दी देतां येणार नाहीं; म्हणून परत फिरावें असें माझ्या मनांत आलें. परंतु हा विचार सुचेपर्यंत मी इतका दूर पळत आलों होतों कीं, आतां फिरून मागें जाणें त्या वेळीं तरी मला शक्य नव्हतें.

तोंड बींड पुसून मी एका कॅब्स्टँडपाशीं जाऊन गाडींत बसलों आणि माझ्या बिऱ्हाडीं जाऊन पोंचलों. खोलींत जाऊन आरशासमोर दिव्याच्या उजेडांत जेव्हां माझे ते विसकटलेले केंस, मुटलेली कॉलर व शिवणींतून उलटलेली [illegible] कोटाच्या हाताची बाही पाहिली, तेव्हां रूममध्यें बसून न येतां [illegible] करून बसून येण्यांत केलेल्या शहाणपणाबद्दल माझी मलाच पाठ थोपटावीशी वाटली. त्या गडबडींत व धक्काबुक्कींत माझ्या कोंपरास जरासें लागलें होतें व गालासहि लागून तेथील चामडी खरचटली होती व त्यांतून थोडेंसें रक्त आलें होतें.

इतकें झालें तरी माझें घडयाळ, साखळी, पिन, वगैरे सर्व कांहीं जशाचें तसें होतें. जर त्यांचा चोरीचाच हेतु म्हणावा तर तो फसलाच होता. त्या काफरांना आतां पकडणें फक्त त्यांना केलेल्या दुखापतींच्या खुणावरून शक्य होतें. पण तेंहि या अवाढव्य मुंबई शहरांत साध्य नव्हतें. जवळपासचा कोणाहि डॉक्टराचा दवाखाना बघून त्यांतून ते औषध घेतील हें मी जाणून होतों.

नंतर या झाल्या प्रकाराबद्दल अधिक विचार न करतां मी थोडासा फराळ करण्याकरितां शेजारच्या हॉटेलांत गेलों आणि मग त्या दिवशीं जेवण वगैरे न करतां स्वस्थ झोंपीं गेलों.

सकाळीं उठल्यावर पुन्हा रात्रीं घडलेल्या प्रकाराबद्दल माझ्या मनांत विचारमालिका सुरू झाली. माझ्याजवळच्या वस्तूंसाठीं नव्हे तर माझ्या प्राणावरच

हा बुद्धिपुरःसर केलेला हल्ला होता, हें विचारांतीं मला अधिकाधिक पटत चाललें. पण यांचा हेतु तरी काय ? प्रथमच ज्या वेळीं ती ओळखीच्या चेहऱ्याची स्त्री मला रस्त्यात भेटली, त्या वेळींच मला आलेल्या शंकेचा मी पूर्ण विचार केला असता तर बरें झालें असतें. त्या स्त्रीनें देखिल " डॉक्टर मोहन तुह्मीच काय ?" असें मला सत्कृद्दर्शनींच विचारलें होतें. त्यावरून देखिल मला पकडण्याकरितां जाळें पूर्वीच तयार झालें होतें ही गोष्ट सिद्ध होत होती. आपल्या बापाच्या (?) प्रकृतीविषयीं तिला माहिती का सांगतां येईना याचें कारण आतां मला उमगलें. माझ्या घड्याळावर वगैरे त्यांचा डोळा मुळींच नव्हता. शिवाय त्या " रांकट रोग्याची " मी नाडी तपासीत असतां माझ्यावर धरलेला पिस्तुलाचा नेम देखिल हें अनुमानच खरें ठरवितो. ईश्वराच्या कृपेनेंच मी त्या दिवशीं त्या चोरट्यांच्या तडाक्यांतून बचावलों.

आज देखिल डॉ. नियोगी दवाखान्यांत न आल्यामुळें मलाच सर्व काम पाहावें लागलें. संध्याकाळीं पांचाच्या सुमारास मी लवकरच घरीं गेलों व बाहेर जाण्याकरितां तयारी करीत आहें तोंच बरोबर मोलकरणीला घेऊन अंबुताई आंत आली.

अंबुताईची अपेक्षा मी केली होतीच; परंतु तिनें आपल्या समजुतीप्रमाणें " माझें येणें अनेपक्षित तर झालें नाहीं ? " असें ह्मटलेंच.

अंबुताईची प्रकृति कशी बिघडली होती हें आतां वाचकांस कळून चुकलेंच आहे. तिला शुद्धी नाहीं ह्मणावी तर असे, आणि खरें पाहातां नसे. बाबासाहेबांच्या मृत्यूपूर्वींची ती लाज, भीड, विनय वगैरे स्त्रीसहज स्वभावधर्म बऱ्याच अंशानें तिच्यांतून नाहींसे होत चालले होते, हें वारंवार घडलेल्या प्रसंगांवरून आढळून आलेंच आहे. मला मात्र हें इतर कोड्यांच्या भरीला आणखी एक कोडें पडलें होतें. आणि ह्मणूनच या खेपेस हिच्याबरोबर तिच्या आईनें मोलकरणीला दिली असावी. खुळी बिचारी! एकदां मस्तक फिरलेलें माणूस खुळें असूनहि शहाणें भासतें आणि तें पाळतीवर असलेल्या माणसास केव्हां कसा गुंगारा देतें तें मागाहून कळतें, प्रथम त्याचा अंदाज करतां येत नाहीं. रात्रीं

आपल्या नवऱ्याला दिलेल्या वचनाप्रमाणें ती मला भेटावयाला आली होती हें मी समजलों व ती काय बोलणार ते ऐकत राहिलों.

" आज जी मी आल्यें आहें ती कस्तुरबद्दल चार शब्द सांगण्याकरितां. " तिनें सुरवात केली.

" बरें मग ? त्याबद्दल काय ? " मी तिच्या नजरेकडे पाहिलें तों त्यांत मला कांहीं निराळाच अर्थ दिसून आला. तिच्या बाहेरील प्रयत्नांस न जुमानतां हालणाऱ्या खालील ओंठावरून वळणाऱ्या बोटांच्या टोंकांवरून तिच्या अंतरांत चाललेली खळवळ बाहेर उमटत होती.

" मी आपली उघडपणेंच बोलत्यें. मोहनराव, आपण कस्तुरचा त्याग केला हें बरं नाहीं केलंत. "

" मीहि जरा उघडपणेंच बोलतों, " मी ह्मटलें. "त्याग केला असें ह्मणून, आपण मी तिचा पूर्वी स्वीकार केला होता असें गृहीत धरतां, पण तें खरें आहे काय ? "

" प्रत्यक्ष विधिच काय तो व्हावयाचा राहिला होता ना ? बाकी लोकांत तुह्मां दोघांचें लग्न होणार ही अफवा पसरायची तर राहिली नव्हती ना ! कस्तुर तर आतां जिवावर उदार झाली आहे. "

" लोकांतल्या अफवेशीं मला अथवा तिला काय कर्तव्य आहे ?"

" तुह्मा पुरुषांच्या बाबतींत तें ठीक आहे, पण स्त्रियांनां कर्तव्य आहेच. मोहनरावांनीं हिला कां टाकली असा संशय कोणालाहि आल्याशिवाय कसा राहिल ? आणि तिचें तुमच्यावर इतकें लक्ष असतांना आजपर्यंत संशयहि येऊं न देतां आज तिचा एकदम धिक्कार करावा हें तुह्मांला बरें वाटतें ना ? माझी देखिल तुह्मांला दया येत नाहीं ना ?" ती आपल्या बहिणीचा कैवार घेऊन बोलत होती—बाबासाहेबांस त्या रात्रीं सांगितल्याप्रमाणें अगदीं बरोबर ती बतावणी करात होती मला दुधखुळा समजून माझी ती समजूत घालीत होती, पण तिचें सर्व कारस्थान मला कळून चुकलें होतें हें तिला काय ठाऊक ? तथापि काय होतें तें पाहावें असाच माझा कल आतांशा होत होता.

" खरें सांगूं का, मी तिच्याकडे मुद्दाम डोळेझांक केलेली आहे. ती मला नको असें मुळींच नाहीं. शिवाय हल्लीं कामाच्या त्रासामुळें मला सवडहि झाली नाहीं हें तितकेंच खरें आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, मी तिला पुष्कळ दिवस न पाहिल्यामुळें तिच्या मावशीच्या घरीं देखिल गेलों. इतकें कळल्यावर तरी माझ्याविषयींचा आपला गैरसमज दूर होईल ना ? परंतु आश्चर्य असें कीं, तेथें देखिल मला ती दिसली नाहीं. "

" तर मग ती गेली होती कुठें ? " अंबूताईनें विचारलें.

" ती ठाण्याच्या बाजूला आपल्या थोरल्या मावसबहिणीबरोबर गेल्याचें मला कळलें. " मीं ह्मटलें.

" अस्सं. आतां समजल्यें. मला तिनं मला यांतलं कांहींच कां कळूं दिलं नाहीं तें. " ती आपल्याशींच परंतु मोठयानें ह्मणाली. " परंतु, हें पाहा मोहनराव, ती आमची मावशी मात्र फार वेडगळ आणि विचित्र बाई आहे. ती काय बोलेल आणि काय नाहीं याचा नेम नाहीं. तुह्माला कसं वाटतं ? "

" ते कांहीं मला बरोबरसें सांगतां येणार नाहीं, परंतु कस्तुर मात्र आतां घरीच फिरूं लागली आहे. " मीं मुद्दाम ह्मटलें.

" आणि ह्मणूनच तुमच्या वृत्तींत असा फरक पडला असावा. पण माझ्याबरून मी सांगत्यें कीं, तुह्मी संशयित वृत्ति धारण करूं लागलांत तेव्हांपासून तिला वाईट वाटून व जीविताचा कंटाळा येऊन ती बाहेर राहून आपला काळ कंठीत असते. मी इतक्या ह्या थोडयाशा अवधींत कशी आणि कोठवर फिरतें, आहे का ठाऊक ? " तिनें विचारलें. लागलीच तिच्या डोळ्यातून खळखळ धारा गळूं लागल्या. पतिविरहाच्या दुःखाची काय बतावणी ही ! खरोखर मला वाटलें एखाद्या हल्लींच्या स्त्रीनाटक कंपनींत ती शिरती तर बराच लौकिक कमावती.

" अंबूताई ! अशा रडूं नका. कालावधीनें आपले दुःख कमी होइल जगाच्या रहाटीकडे पाहून आपण वागलें पाहिजे. " सांतवन करण्याच्या उद्देशानें मी ह्मणालों.

" नाहीं—हो—" दुःखाचें अधिकच भरतें येऊन ती ह्मणाली. "त्या दुःखांत भर घालायला मेली ती सरकार चौकशी झाली की नाहीं तिचा देखिल अझून पुरा छडा लागत नाहीं—आणि—"

हे शब्द ऐकतांच मी तिजकडे बारीक नजरेनें पाहूं लागलों. खरोखर ती हें ढोंग करीत होती कीं हें तिच्या अंतःकरणाच्या उमाळ्याचे शब्द होते बरें ?

" होय. तें गूढ मात्र उकललें नाहीं खरें अजूनहि. " मी उत्तरलों.

" सरकारनें नाहीं तर नाहीं—आपल्या मित्राकडून—मला वाटतं संजीवन असेल त्यांचं नांव—त्यांच्याकडूनहि कांहीं सुगावा नाहीं ना लागत ? " डोळे पुसीत तिनें विचारलें.

" किरकोळ एक दोन मुद्दयांशिवाय कांहीं अझून बाहेर आलेलं नाहीं. "

" एकून शेवटीं तेच. " ती सुस्कारा टाकून बोलली. त्या सुस्काऱ्यांत मला वाटलें दुःखापेक्षां समाधानाचीच झांक अधिक होती.

मी स्तब्धच राहिलों.

" तर मग काय त्यांनीं तो यत्न आतां सोडून दिला कीं काय ? "

" तेंहि मला समजलें नाहीं. मला हल्लीं तो बरेच दिवसांत भेटला नाहीं. आणि कांहीं आधार सांपडल्याशिवाय तो कधींहि कांहीं आपल्या माहितीबद्दल दुसऱ्यास सांगावयाचा नाहीं. त्याचा हा स्वभावच आहे. "

अकस्मात् तिच्या चेहऱ्यावरून चिंतेची छटा येऊन गेली.

" बरं, " ती किंचित् हंसून ह्मणाली, " तुमचं तरी काय मत आहे ? "

" [illegible]नीं हात टेंकलें, तेथें माझें मत कसलें विचारतां आपण ? त्या [illegible]याचा हेतु जर का कळता तर पुढची गुंतागुंत सोडवतां आली असती. [illegible] कळत नाहीं तेथें पुढचें काय समजणार ? "

" [illegible] मग ही शोधचौकशी आतां बंद होणार कीं काय ? " त्या प्रश्नाब-[illegible]तली तळमळ लपवून ठेवावयाचें भान न राहून ती ह्मणाली.

" [illegible] असेल, बहुतकरून. " मी उत्तर दिलें.

माझ्या उत्तरावरून तिला बरेंच समाधान झालें असावें, असें तिनें टाकलेल्या सुस्कान्यावरून दिसलें.

" अद्याप यश न आल्यामुळें संजीवनानीं देखिल शोधाचा प्रयत्न सोडून दिला कीं काय ? " तिनें पुनः विचारलें.

" असा माझा तर्क आहे. बाकी तो कांहीं मला हल्लीं बरेच दिवसांत भेटला नाहीं "

ती स्वस्थ विचार करीत राहिली. परंतु आतांच घाबरल्यासारखें, पुन्हां अमळशानें स्थिरावल्यासारखें तिचें मन जें वारंवार हेलकावे खाई, त्याचें कारण मला कळेना. तिच्या डोळ्यांतल्या लकबीवरून तिच्या आईला तिच्याबद्दल जशा प्रकारचें भय वाटत होतें तें खरें असावें असें वाटे. तिच्या प्रकृतीचें अनुमान—निदान—करण्याचा मी प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष रीतीनें आटोकाट प्रयत्न केला परंतु व्यर्थ.

पुन्हा तिनें आपल्या बहिणीचा विषय काढला.

" माझ्या कस्तुरबद्दल मला किती ममता वाटते हें मी माझ्याच तोंडानें बोलून दाखविलें पाहिजे असें नाहीं, तिला तिच्या पतीबरोबर नांदतांना केव्हां पाहीन असें मला झालें आहे. तिच्यावर तुम्ही कृपा करून तिला पूर्ववत् मानता ना ? कांहीं भांडण बिंडण झालें नाहीं ना ? " तिनें काकुळतीनें विचारलें.

" नाहीं, तसा कांहीं एक प्रकार नाहीं. " मी लगेंच उत्तर दिलें.

" तर मग तुम्ही दोघांनीं अशा तऱ्हेनें वागावें, हें अधिक आश्चर्य; " ती म्हणाली. " तर मग यावर मी जें आतां बोलणार तें बोलण्यास आपल्या पूर्वीच्या व्यवहारावरून मला हक्क आहे असें समजून बोलणार आहे, तुम्हाला राग नाहीं ना येणार ? "

" राग ? मुळींच नाहीं. इतका आपला परिचय आहे, कीं काय बोलावयाचें असेल तें निर्धास्तपणें बोला. "

" तर मग माझें ऐका; आणि लवकरच कस्तुरची गांठ घ्या. आपल्याविषयीं तिच्या मनांत आदर आणि प्रीति किती आहे हें तिच्याहिपेक्षां मी

अधिक जाणतें. तुमच्या साशंक वृत्तीनं तिचं हृदयकुसुम कसं करपून गेलं आहे तिकडे लक्ष द्या. हें आपलें मानसिक दुःख वृद्ध आईला कळेल म्हणून ती मुंबईस देखिल येईनाशी झाली. दोन अंतःकरणें अशा रीतीनं थोड्याशा गैरसमजुतीनं—चार शब्दांत जिचा उलगडा करतां येईल—अशा क्षुल्लक गैरसमजुतीनं दुःखित व्हावीं हें किती विचित्र आहे! माझी ही वकिली आहे असं आपणाला वाटेल. परंतु मी इथें येईपर्यंत मला कस्तुर भेटलेली नाहीं, तिची माहिती आतां प्रथम मला तुमच्या कडूनच मिळत आहे. एवढं कळलं म्हणजे मला वाटतं आपली खात्री होईल, कीं तिनं मला आपल्यातर्फे बोलण्यास पाठविलेलं नाहीं तुमचं एकमेकांबद्दल जें प्रेम आहे तें पाहिलं म्हणजे तुम्हीं दोघांनीं असं मनांत किल्मिष बाळगून जीवित दुःखांत घालवावं हें गैरशिस्त आहे, असं मला वाटतं. यापासून पुढचें आयुष्यदेखिल मातीमोल होऊन जाईल. मोहनराव, इकडं पाहा—माझ्याकडं बघा, मला मनापासून सांगा—तुमचें तिच्यावर अझून खरं प्रेम आहे ना?" तिनें कळवळयाने विचारलें.

"आहे." मी स्पष्ट उघड उत्तर दिलें आणि तें अगदीं खरोखर खरें होतें.

## प्रकरण २१ वें.

### गांठ अधिकच घट्ट बसली !

कुंकुमतिलकविरहित अशा तिच्या त्या मुखावर—तिच्या फिकट झालेल्या मुखावर माझ्या उत्तरानें समाधानाची छटा उमटलेली दिसली.

" तर मग, डॉक्टरसाहेब, आपली दोघांची दिलसफाई जितकी लवकर होईल तितकें बरें नव्हे का ? " तिनें प्रश्न केला.

" कां बरें? तिचें मन दुस—" मी मधेंच जीभ चावली. मावशीबाईनें पूर्वी मला ' कस्तुर आतां दुसऱ्याच एका नादाला लागली आहे ' हे शब्द उच्चारतांना जी शंका माझ्या मनांत आली होती तिनेंच पुनरपि उचल खाल्ली. परंतु माझ्याकडे माझें अर्धे वाक्य ऐकून तिनें अशा दृष्टीनें पाहिलें कीं, तें वाक्य मला पुरें करणें भाग पडलें. परंतु माझे शब्द न घालतां मी मावशीचेच शब्द उच्चारले.

" तिचें मन आतां दुसऱ्याच नादाला लागल्यानंतर आमच्या दिलसफाईचा काय उपयोग व्हावयाचा आहे ? "

" म्हणूनच तर आतां खरा उपयोग आहे. एकवार हातचा बाण सुटल्यावर मग तो परत घेतां येईल का ? "

" तो विचार बाण सोडणाराचा—माझा नव्हे. "

" हें तुमचं बोलणं मला उमजत नाहीं. ती आतां दुसऱ्याच नादाला लागली आहे, म्हणजे काय समजलांत तुम्ही ? "

यावर मी उत्तर काय देणार ? तें वाईट उत्तर देखिल माझ्याच तोंडातून निघालेलें तिला ऐकावयाचें आहे कीं काय असें मला वाटलें. मी अशा विचारांत क्षणभर स्तब्ध राहिलों. तों तीच म्हणाली—

" मला देखिल ती शंका [illegible] आहे. कस्तुरचा स्वभावच असा आहे कीं, ती आपल्याकडून [illegible] नाहीं. तसेंच तिची सहनशीलताहि वाखाणण्या

सारखी आहे. परंतु इतकंहि करून तिचा नाइलाज झाला तर मग ती मनास येईल तें करावयास चुकावयाची नाहीं. ती आतां—"

पुढें ती काय बोलणार याचा मी अंदाज केला, व हेंच महत्वाचें व आनंदाचें वर्तमान मला कळवावयास ही मुद्दाम आली कीं काय असें वाटून मला आलेला त्वेष खालील शब्दांनीं बाहेर पडला--

" ती आतां काय करणार तें मला माझ्या या कानांनीं—मी जिवंत असे-पर्यंत ऐकण्याची इच्छा नाहीं. आपलें काम हेंच होतें काय? " वास्तविक ती आली होती कशाकरितां तें मी स्वस्थ मनानें ऐकून घ्यावयाचें सोडून वरील शब्द बोललों.

" ती आतां सेवासदनांत जाऊन जनसेवेला आपली काया अर्पण करील अथवा पंढरपुरची वारी घेऊन संतीण बनेल, अथवा—कुणी सांगावं? ती कदा-चित् प्राण देण्याच्याहि तयारींत असेल—अशाच प्रकारच्या एखाद्या नादाला ती लागली असली पाहिजे. "

मी तेथल्या तेथें गारठून—थिजून गेलों. माझ्या विचारी मनानें ज्या सम जुतीनें " ती आतां एका दुसऱ्याच नादाला लागली आहे " या शब्दांचा अर्थ लावला, त्या समजुतीशिवाय दुसऱ्या दृष्टीनें त्या शब्दांकडे मी आतांपर्यंत पाहिलेंच नाहीं. आणि कुतर्कांचे मजल्यांवर मजले रचीत माझें शरीर व मन त्यांच्या भाराखालीं चिरडून टाकिलें. आतां ही दुसरी गति मनाच्या विचारांस मिळाली खरी व तिनें थोडेंसें समाधान झालें हेंहि खरें, पण तें कायम टिक-णारें नव्हतें. पुन्हा दुसऱ्या दिशेनें काळजी उत्पन्न झालीच. माझ्याकरितां माझ्याच चुकीमुळें घडलेल्या अद्दलीवरून तिच्यावर एवढा परिणाम झालासें पाहून माझी कंबर खचली, व अंबुताईच्या वरील विनंतीची किंमत पटली. त्वकर दिलसफाई झाली नाहीं तर विपरीत परिणाम घडल्याशिवाय राहाव-याचा नाहीं असें माझ्या मनानें घेतलें. माझ्या मनांत चाललेले विचार तिनें ओळखले. ती म्हणाली—

" ती दुसऱ्याच एका नादाला लागली आहे, याचा अर्थ तुम्ही पुरुषपद्ध-तीनं विशेषतः संशयी पुरुषाच्या मनानं लावला होता ना? वरं ती ' दुस-

त्याच नादाला लागली आहे ' ही कल्पना आपणाला स्वतःच आली, कीं ती कोणी आणून दिली ? "

मी खजील झाल्यामुळें मला उत्तर द्यावयास कांहींच सुचत नव्हतें. आता मात्र ह्या प्रश्न उत्तर द्यावयास बरा मिळाला असें वाटून मीं लगेंच ह्मटलें—

" मला ही हकीगत कस्तुरच्या मावशीनें सांगितली "

" हात्तिच्या !—हें मला अगोदर कळतं तर बरं झालं असतं. ह्या मावशीचा स्वभाव तुह्माला ठाऊक नाहीं. ही अगदींच वेडगळ बाई आहे. मावशी खरी, पण तिचा स्वभाव चमत्कारिक. चमत्कारिक ह्मणजे दुष्ट नव्हे पण खेडवळ अडाणी. तिला बोलतांना कांहींच समजत उमजत नाहीं. आपली तोंडाला येईल तसं बरळत सुटायची. आपण काय बोलतों, त्याचा परिणाम काय होईल वगैरेसंबंधीं रामाकृष्ण वासुदेव ! ती आपली सहज बोलून गेली आणि आपण मुंगीचा गज केलात "

" होय. तसें झालें खरें. " मी शरमून ह्मटलें.

" मोहनराव, " ती विधवा एकदम डोळ्यांत आंसवें आणून ह्मणाली, "तुमच्या मनांत असली घाणेरडी शंका तिच्याबद्दल उत्पन्न तरी कशी झाली ? स्त्रियांसंबंधानें तुमची हीच कल्पना काय ? तुमच्यावर ती किती प्रेम करते, हें तुह्मांला अझूनही समजलं नाहीं काय ? तिचं तुमच्यावर किती प्रेम आहे ह्मणून सांगू. मी स्वतः माझ्या—वर केलं नाहीं—" तिच्या डोळ्यांतून एकदम घळकन् अश्रूंची रांग लागली.—" इतकं प्रेम तिचं तुमच्यावर आहे ईश्वरानं तुमच्या दोघांच्या गांठी बांधल्या आहेत, त्या कधींहि सुटणार नाहींत. तुह्मी दोघेंहि सुखांत नांदाल. तुमचं दोघांचं कल्याण होईल. माझी हा इच्छा ईश्वर पूर्ण केल्याशिवाय राहणार नाहीं. "

क्षणाचपूर्वी माझ्यावर आग पाखडण्याकरितां आलीशी वाटलेली ती ताई माझें पुढील भवितव्य वर्तविणारी, कोणी भविष्यज्ञान जाणणारी स्वर्गीय देवता असावी असें मला वाटूं लागलें.

ती इतक्या कळवळ्यानें प्रेमाच्या उमाळ्यानें—सदिच्छेच्या सहज स्फूर्तीनें बोलत होती कीं, शेवटीं बोलण्याच्या भरांत ती कस्तुरचें व माझें विरसलेलें मन,

आपल्या नवऱ्यास आश्वासन दिल्याप्रमाणें आपलें गुपित बाहेर न पडावें म्हणूनच जुळविण्याकरितां आली होती हें मी विसरूनच गेलों.

परंतु आतां तें लक्षांत येऊन मी मुद्दाम म्हटलें,

" आपण म्हणतां तशा जर ईश्वरानेंच गांठीं बांधल्या आहेत, तर आम्हाला त्यांत रदबदली कशाला करावयाला हवी ? "

" म्हणजे माझ्या बोलण्याची तुम्हाला शंका आल्यासारखी दिसते. माझ्या जोखाईची माझ्या घरच्या देवीची शपथ घेऊन सांगतें कीं, कस्तुरची व तुमची जोडी ब्रह्मदेवानंच जुळवून ठेविली आहे. माझं मन असंच मला सांगत आहे. ती जुळणार आणि तुम्ही दोघें आनंदानें संसार करणार. "

" परंतु हें किती अशक्य—" आतां मात्र माझ्या जिभेचे तुकडे पाडावेस मला वाटलें. आजपर्यंत जें तें माझें स्वतःचें एक गुपित आजपर्यंत कोणाला माहित नव्हतें—वाचका हो मी तुमच्यापासून देखिल जें आतांपर्यंत लपवून ठेविलें आहे तें ह्या माझ्या विविध आनंददुःखाच्या विचारविकारांनीं खळबळून गेलेल्या वेळीं अचानक बाहेर पडण्याच्या बेतांत होतें. मी लगेच वाक्य बदलून पुन्हा म्हटलें—" परंतु हें मध्या तरी किती अशक्य आहे? "

" कां ? अशक्य असं आपण कां म्हणतां ? "

" गरिबींत लग्न करणें म्हणजे स्वतःचा जीव दुःखांत लोटणेंच नव्हे तर दुसऱ्या एका जीवालाहि बरोबर दुःखांत घालणें नव्हे काय ? "

" आपण असं कां म्हणतां डॉक्टरसाहेब ? तुमच्यासारख्या तडफीच्या कर्तबगारीच्या कर्त्या हुषार डॉक्टरला पुढं किती आशाजनक जीवित आहे ! मी डॉक्टर नियोगींनादेखिल पूर्वी असें किती तरी वेळ म्हणतांना ऐकलं आहे. मीच म्हणतें असं नव्हे कांहीं. "

मी नुसता हंसलों झालें.

" डॉक्टर नियोगी म्हणत कीं, डॉक्टरीच्या धंद्यांत पुढं मागं मुंबई शहरांत मोहनराव पहिल्या नंबराचाच नव्हे तर पहिला डॉक्टर होईल. "

"असो, ईश्वराची मर्जी ! डॉक्टरसाहेबांची इच्छा तर ठीक आहे. परंतु तें खरें कसें होणार याचीच मला शंका वाटते. हॉस्पिटल्मधल्या इतर शेंकडों डॉक्टर-

रांपेक्षां मी कांहीं अधिक जाणत नाहीं. हें विनयानें नव्हे, अगदीं खरें खरें तेंच सांगतों. नांव कमावण्यास अथवा खरें म्हणावयाचें तर आपलेंच घोडें पुढें काढण्यास आजकाल निराळ्याच तऱ्हेचा माणूस लागतो. हिंदुस्थानांत काय जगांत काय, तसेंच ह्या महाराष्ट्रांत काय, जसें वाङमयाच्या आणि वकिलीच्या बाबतींत तसेंच डॉक्टरीच्या धंद्यात. जो खरा मर्मज्ञ जाणता असेल तोच पुढें येतो असें नाहीं; तर साधारण प्रतीचाच परंतु खासगी वशिल्याचा ज्याला जोर आहे, आणि पुढें पुढें करून स्वतःची जाहिरात द्यावयाची कला ज्याला साधली आहे, अशाच माणसाची आजच्या जगांत बोलबलाय होते. आजचें जग म्हणजे असें आहे कीं, एखाद्या माणसानें आज भरभराटीस चढावें, नांवालौकिकांस यावें आणि दुसऱ्याच दिवशीं कोठल्या कोठें गडप व्हावें. कायमपणा कशाचच नाहीं अर्थात् अपवाद सोडून मी बोलतों आहें हें."

"कसेंहि असलें तरी तुमच्या बाबतींत हें लागू होणार नाहीं हें मी निश्चयानं सांगतें डॉ. नियोगींच्या सहचार्यानं तुम्हीं लवकरच पुढचं स्थान पटकावून तें कायमचं टिकवून बसाल."

पुढील भवितव्याच्या ह्या गोड स्वप्नांत मी पुन्हां चढूं लागलों. माझे पुढील आयुष्यक्रमाचे बेत मी अंबूताईला सांगूं लागलों. ते माझे बेत मी कस्तुरला अनेकवार सांगितले होते. वाचकानांहि ते पूर्वी एकावार कळले आहेतच खेड्यांतील उघड्या हवेंत राहावयाचें माझें मत. जेथें आगगाडीच्या अथवा चाळीच्या चिमणीचा धूर लांबूनहि दिसूं नये, जेथें मोटारीचा अगर सायकलीचाहि आवाज–नव्हे–घोड्यांच्या गाडीच्या घंटेचा आवाज देखिल ऐकूं येऊं नये अशा साधारण शहरांत राहावयाचा माझा बेत, आणि बरोबर माझी आवडती प्रिय कस्तुर. खरोखरच मुंबईंत त्या दुर्दैवी प्राण्याला राहणें भाग पडलें तो ईश्वराच्या निकमे देणग्यांस आंचवला ही माझी प्रामाणिक ठाम समजूत.

"अशा प्रकारचं हें अकल्पित गैरसमजुतीचं पटल तुमच्या दोघांच्या आड आल्यामुळं तुमचं आतां कस्तुरवरचं प्रेम खरोखर उडालं काय?" अंबुताईनें प्रश्न केला.

" तसें नव्हे कांहीं, परंतु मावशीबाईच्या बोलण्याचा मला उलगडा झाला नाहीं. " मी हळूहळू उत्तर दिलें. " शिवाय तिचीहि हल्लींची वागणूक पूर्वीच्याहून कितीतरी भिन्न आणि अशा प्रकारची शंका घेण्यास जागा देण्यासारखी झाली आहे. "

" ती मावशी किती अजागळ होती हें मी आपल्याला सांगितलंच आहे. आतां माझा स्वतःचा अनुभव सांगितल्याशिवाय तुमची तशी खात्री होणार नाहीं. ह्या बाईनें मुद्दाम नव्हे परंतु बोलतां बोलतां अशाच अडाणीपणामुळें एकदां आह्मां दोघांमध्यें देखिल असंच त्रिटाळ आणलं होतं, परंतु तिकडची स्वारी समजूतदार, शांत डोक्याची आणि आह्मां दोघांमधील अकृतिम प्रेम ह्या त्रयींच्या जोरावर त्या दिव्यांतून मी कशीबशी पार पडले एकदांची ह्या मावशीबाईच्या हातून; नव्हे तोंडून, तिला स्वताला नकळत अशा प्रकारच्या गोष्टी घडतात; तेव्हां तिच्या स्वभावाला अपरिचित अशा माणसांशीं कदाकाळीं दुर्दैवानें संबंध आला ह्मणजे मात्र विलक्षण परिणाम होतो, आणि तसाच झालेला आज मला दिसत आहे. "

हेंहि अंबूताईचें बोलणें मला गैर वाटेना. पण माझ्या मनाची तळमळ समूळ नाहींशी होईना एवढें मात्र खरें. कस्तुरसारखी मनाची निर्मळ व निर्व्याज प्रेम करणारी स्त्री दुसरी क्वचित् सांपडेल असें माझें मन मला ग्वाही देत होतें. परंतु कस्तुरची व माझी दिलसफाई करण्याचा हाच व एवढाच आजच्या अंबुताईच्या येण्याचा उद्देश होता का ? तसा होता तर तिला कोणी पाठविली ? कीं ती केवळ भगिनीप्रेमाखातर आली ? बरें, इला ह्या वैधव्यदुःखांत—बहिणीच्या झाल्या ह्मणून काय झालें—पण प्रेमाच्या गोष्टी कशा बोलायला सुचतात ? वगैरे प्रश्न कसे या वेळीं माझ्या मनांत गिल्ला करून सोडीत होते. ही रात्रीं आपल्या नवऱ्याला भेटते हें मला ठाऊक आहे हें जर तिला कळतें तर खात्रीच तिनें माझ्यासमोर चालविलेलें वाक्पांडित्य चालविलें नसतें. परंतु ज्या पद्धतीनें ती बसली होती, ज्या पद्धतीनें बोलत होती त्यावरून ती केवळ प्रामाणिकपणाची व सरळ भावाची मूर्तिच आहे असें वाटत होतें. आणि या तिच्या

अशा परस्पर भिन्न आचरणांचा हेतू तरी काय ? बाकीच्या कांहीं प्रश्नांप्रमाणें हाहि प्रश्न मला सुटणारा नव्हता. मी आपला विचार कर करूनहि डोकें खाज-वावें एवढेंच

एकवार मला वाटलें कीं माझ्या मनांत खुदखुदत असलेलें सर्व तिला एक-दम सांगून टाकावें मी माझ्या डोळ्यांनीं स्वतः तिच्याबद्दल काय काय पाहिलें होतें तें तिला विचारून खऱ्या खोट्याचा छडा लावून घ्यावा. पण दुसऱ्याच क्षणीं अशा विचाराचा फोलकटपणा माझ्या ध्यानांत आला. अशा पासून माझाच कार्यभंग होणार होता व तो असमंजसपणा ठरला असता. मला तर सावकाश, विचारानें, धिमेपणानें निरीक्षण करीत जावयाचें होतें.

वाचक, माझ्या जागीं तुम्ही असतां तर तुम्ही काय केलें असतें ? नाहा, चौपाटीवर त्या रात्रीं मी जो देखावा पाहिला होता, त्याला कांहीं देखिल आगा पिछा नव्हता; अथवा तो कोणालाहि खरा वाटण्यासारखा नव्हता. मी सरळ-मार्गी मनुष्य आहे. न पाहिलेल्या गोष्टी पाहिल्या म्हणून सांगण्याची अथव पाहिलेलें तिखट मीठ घालून अतिशयोक्तीनें वर्णन करण्याची मला मूळपासून चीच संवय नाहीं. तेव्हां होत असलाच तर तो पाहिले तसें हुबेहूब वर्णन करतां येत नसल्यामुळें पाहिलें त्याच्याहून काहीं कमी वर्णन केल्याचा दोष येईल; पण अत्युक्तीचा खास येणार नाहीं. तो प्रकार पाहिल्यावर तिलाहि येई-पर्यंत मी पाहिलें तें जागेपणांत पाहिलें कीं निद्रीतावस्थेंत पाहिलें याबद्दल विचार करीत होतों.

थोडक्याच वेळानें ती माझा निरोप घेऊन आपल्याबरोबरच्या स्त्रीसह निघून गेली. जातांना मात्र पुन्हा एकदां तिनें मला कस्तुरला भेटवून घेऊन मनमोकळेपणानें दिलसफाई करून घेण्याविषयीं बजाविलें. तिला गाडींत बस-लेली पाहिली आणि मग मी परत माझ्या खोलींत परतलों.

अशा रीतीनें ही आमची मुलाखत झाली; पण मला याचा अर्थ उमगेना. मी जें कांहीं चौपाटीवरच्या रात्रीं ऐकलें होतें त्यावरून तिच्या सूतपतीची इच्छा माझी व कस्तुरची पुन्हा सांगड घालावी अशी होती व ती तृप्त करण्या-

करितां ती मुद्दाम माझ्याकडे आली होती. हा बेत फार सखोल व बरवर विचार करणारास कळून न येण्यासारखा होता. तथापि मी तो उकलण्यांत माझें बथ्थड डोकें खर्च करीतच होतों.

आतां लवकरच कस्तुर येईल असें मला माझ्या पत्रास तिनें पाठविलेल्या उत्तरावरून कळून चुकलें होतें. माझ्या पत्राचें उत्तर पाठविण्यास तिनें विलंब लावला नाहीं. तिला आल्याबरोबर सर्व गोष्टी बाजूला ठेऊन अगोदर बाबासाहेब जिवंत असून ते मेलेले असल्याबद्दलचें उठविण्याचा हा जो कल्पनातीत कट झाला होता त्याचें इंगित काय तें मी अगोदर विचारून टाकावयाचें ठरवलें होतें. परंतु मग तें रद्द केलें आणि स्तब्ध राहावयाचेंच ठरवलें.

दुसऱ्याच दिवशीं डॉक्टर नियोगी कांहीं भानगडीच्या केसीस तपासण्याकरितां हॉस्पिटलमध्यें आले आणि लगेच ताजमहाल हॉटेलकडे जाण्याच्या तयारीस लागले. कोणा एका बड्या संस्थानिकाची कन्या मुद्दाम डॉक्टरसाहेबांकडे ते स्पेशालिस्ट असल्यामुळें मुंबईस आली होती व तिला भेटावयास त्यांस जावयाचें होतें.

आतांच नुकते साडेतीन वाजत होते व जाण्याच्या पूर्वीं कांहीं सांगावयाचें असल्यास ऐकावें म्हणून मी जवळच उभा होतों. कारण घाई असली अथवा नसली तरी हल्लीं त्यांनीं केसीस स्वतः प्रथम तपासून पाहायच्या; मग आपल्या सूचना देऊन त्या माझ्या हवालीं करावयाच्या असाच क्रम चालविला होता. तथापि ते फारच घाईंत होते. शिवाय एखाद्याला कामाचा फार बोजा व्हावा व त्याचा मेंदू थकून जावा तसाच प्रकार झाल्यासारखे डॉ. नियोगी दिसत होते. पूर्वींची काम उरकण्याची तरतरी आणि शक्ति हल्लीं डॉक्टरसाहेबांच्या अंगांत नव्हती.

" हल्लीं बरें वाटत नाहीं काय ? '' मी त्यांना विचारलें.

" मला तसें कांहीं होत नाहीं, '' डॉक्टरसाहेब सुस्कारा टाकून म्हणाले, " मला वाटलें मला श्रम फार होतात, एवढेंच. ह्या बायकांच्या बडबडीनें मला ह्या स्थितीस आणून पोंचविलेलें आहे. त्यांना बजाविलें तरी आपल्या

रोगाची हकीगत सांगतानां घरादारांतील माणसें व नातलगें व त्यांच्याशीं झालेल्या बऱ्यावाईट प्रेमाच्या व रागाच्या तसेंच तटया भांडणाच्या गोष्टी सांगून ह्या मला जीव नकोसा करून टाकतात. सरळ असें जणूं कांहीं त्यांस बोलतांच येत नाहीं." ते जरासे थांबले व हंसून म्हणाले—" त्यांना वाटतें मी डॉक्टर असून शिवाय वकील, ज्योतिषी आणि देवास प्रसन्न करणारा पुजारी देखिल आहे !"

मलाहि या बायकांवरील टीकेचें हंसूं आलें. ते म्हणाले तें अक्षरशः खरें होतें. कारण मलादेखिल या गोष्टीचा बराचसा अनुभव होता.

" काय हो—काय बरें ह्मणत होतों—मी—हो—हल्लीं तुह्माला तुमचा स्नेही संजीवन भेटला का ?" ते सहज आठवल्यासारखे करून ह्मणाले.

" नाहीं, हल्लीं खूप दिवसांत मला तो भेटला नाहीं, कुठें बाहेर गेला असेल. कशासाठीं ?" मी विचारलें.

" कारण मी काल कीं परवां स्मरत नाहीं; पण कुठेंसा त्याला पाहिला खरा. गाडीत बसून चालला होता; पण त्याच्या डोक्यावर पट्टी बसविलेली होती. कांहीं तरी accident झालें असावें."

" ॲक्सिडंट !" मी घाबरून ह्मटलें; " मला त्या दिवशीं त्याचें पत्र आलें, पण त्यांत कांहीं असला मजकूर नव्हता."

" बाबासाहेबांच्या मृत्यूचें गूढ उकलण्याचा तो प्रयत्न करीत आहेसें वाटतें. होय ना ?" ह्मातान्यानें विचारलें.

" होय, मला देखिल तसेंच वाटतें."

" परंतु कांहीं जमत नाहीं—अँ ?"

" छे ! त्याला कांहीं यश येईलसें मला तरी वाटत नाहीं. बाकी मला त्यानें अजून कांहींच सांगितलेलें नाहीं." मी ह्मणालों.

डॉ नियोगींनी असामाधनतेचा एक हुंकार दिला. पोलीस लोकांना सुगावा लागत नसल्याबद्दल त्यांना ते कशी दूषणें देत तें मला ठाऊक होतें. गाडींत

ठेविलेलें सामान जपून ठेवण्यापलीकडे या पोलीसांना कांहीच करता येत नाहीं अशा प्रांजळ मताचे ते होते.

त्यानी घड्याळांत पाहिले, आपली रेशमी हॅट डोकीवर ठेवली, टाय दुरुस्त केली व आरशांत पाहून स्वारी जावयास निघाली

दुसऱ्या दिवशीं मला कस्तुरच्या आईचा नोकर पत्र घेऊन आला मला वाटले तें कस्तुरकडून आलें असेल म्हणून अत्यंत उत्सुकतेनें मी तें उघडून वाचतों तर काय ? त्या मजकुरावरून माझी नजर जातांच माझी खरोखरच नजर गेली, दृष्टि अध झाली, हृदयाची नाडी बंद पडल्यासारखें माझें मलाच वाटूं लागलें. धडधड उडणें कुठलें त्या वेळीं ?

त्या कागदावरील थोड्याशा ओळींनी पूर्वीचें कोडें अधिकच गुंतागुतीचें आणि रहस्यमय करून टाकलें ! आतां तें उलगडणे अगदी अशक्य झालें. आता शंभर संजीवन एकत्र मिळते तरी त्यांच्या शंभर मेंदूंतहि काही उतरणें शक्य नव्हतें ! गूढाची गांठ अधिकच घट्ट बसली.



# प्रकरण २२ वें.

## खून कीं आत्महत्या ?

तें पत्र घेऊन येणाऱ्याला घाई फार असल्यामुळे मी त्याला जावयास सांगितलें व मीहि तिकडे जाण्याच्या तयारीस लागलों.

जाण्याच्या पूर्वी पुन्हा एकवार तें पत्र उघडून पाहिलें. त्यांतील महत्वाचा मजकूर इतकाच होता—

" अंबुताई समुद्रांत पडून वारली ! लवकर निघून यावें ! "

खालीं जाणारी ट्राम पडकून मी बसलों आणि लागलीच अंबुताईच्या आईच्या घरीं जाऊन पोंचलों.

घरचा गडी धांवतच घावऱ्या घुबऱ्या पुढें आला आणि म्हणाला " बघा हो डॉक्टर आतां काय करावयाचें तें सांगा. ताई गेल्या आणि आईसाहेबहि उठत नाहींत " इतकें म्हणून त्यानें मला विळखा घालून घोंगट घातलें.

हा गडी म्हणजे मुंबईतला एखादा घाणकोटी बाल्या नसून तो त्यांच्या गावचा खासगी घरगुती पुष्कळ वर्षें घरांत राहून घरच्या माणसात मिसळून गेलेला गडी होता. मागच्या खेपेस याचा उल्लेख करण्याचा तितकासा प्रसंग आला नाहीं; कारण तो स्वतः आल्या गेल्याच्या अथवा पाहुण्यांच्या क्वचितच दृष्टीस पडे. आपलें काम भलें कीं आपण भला अशी त्याची वर्तणूक. शिवाय काम करून वेळ राहिलाच तर त्याची एक मेळ्यांच्या भजनाची " क्षीरसागर आणि कंपनीनें" प्रसिद्ध केलेली भजनाची वही होती ती घेऊन तो वाचीत बसे. तो देवभक्त होता. परंतु सगळया चाळींतले गडी एकत्र होऊन कुठें तरी मध्येच चाळीच्या आसपास जमून शक्य तेवढया मोठ्या आवाजाचीं भजनी वाद्यें जमवून रात्रभर जसा कुरणावरच्या गंधर्वांच्या आलापांत गोंधळ घालतात व सभोंवतालच्या चाळींतील लोकांस नको जीव करून टाकतात, तशांतला हा नव्हता व त्यांच्या भजनी कंपूत हा कधीं मिसळतहि नसे. अंबुताईनें व कस्तुरनें लहानपणीं शिकत असतां मधून मधून ह्या आपल्या घरांतल्या

गड्यास फावल्या वेळांत लिहिण्यावाचण्यास शिकविलें होतें व त्यालाहि त्याची गोडी लागली. आपल्या घरांतल्या हाताखालच्या गडी माणसास वागविण्याची ही पद्धत खरोखरच स्पृहणीय नाही असें कोण म्हणेल ? प्रत्येकाच्या घरांत सेव्यसेवक भावांतील ही गोडी कायम रुजेल तरी हल्लींच्या शिक्षणाच्या प्रश्नास थोडीशी का होईना पण मदत केल्यासारखी होईल. पण हें होईल तेव्हा खरें

" काय गोपी, झाले काय मला स्पष्ट आणि सावकाश काय ते सांग. असा बस इथें आणि सर्व प्रकार सुरळीत सांग– ' मी आत जात असता म्हटलें.

" सगळा प्रकार कांहीं आम्हांस ठाऊक नाही " म्हातारा गोपी सांगू लागला "सकाळीं मी जेव्हां तिच्या खोलीकडे गेलों तेव्हां बाहेरून दरवाजावर टिचकी दिली तरी आतून उत्तर आलें नाही. रात्रौ जाग्रणचिग्रण होऊन उशीरापर्यंत झोंपून राहिली असेल असं समजून पुन्हा अजमास आठ वाजता दरवाजा उघडून मी आत गेलो तर आत कोणी नाही ! रात्रौ बिछाना उघडलेलाहि नव्हता दरवाजा बाहेरूनच ओढून घेतलेला होता ! ताईंच असें झालें असेल असं मनीं मानसींहि नव्हतें म्हणून मीं ती हकीगत आई साहेबांना कळविली. परंतु त्यांना वाटले कीं नेहमीप्रमाणे ती रात्रौ कुठें लहरीच्या भरांत वेड्यासारखी हिंडायला गेली असेल. कारण हल्लीच घरात कोणासहि सांगितल्याशिवाय दोनदोन दिवस बाहेर भटकत राहण्याची संवय नवीन वेडापासून त्यांना लागली होती पहिल्या प्रथम-तिच्या नाहींसे होण्याचे कोणासच कांही वाटले नाहीं परंतु नतर नऊ दहा वाजल्यापासून गुण गुण ऐकूं येऊं लागली ह्या व आसपासच्या इमारतीतल्या ओळखीच्या मंडळींपैकी कांहीं माणसें समुद्रावरून जाऊन येऊं लागलीं, व आपआपसांत कुजबुजूं लागली. थोडक्याच वेळात समजले कीं मरीनलाईन्स स्टेशनच्या पलीकडील समुद्रांत कांहीं अंतरावर तरंगत असलेलें प्रेत पाहून पोलीसांनीं होडी घातली—आणि प्रेत सरकारांत नलें. प्रेत पाहून आलेल्या माणसापैकी शेजारचीहि कांहीं मंडळी होती. त्यानी तें ओळखिलें. मीहि धांवत धांवत जात होतो, पण तोपर्यंत तेथली गर्दी मोडत चालली व मीहि मागे परतलों. " *

" तिला–डॉक्टरनें तपासली होती काय ? "

" केव्हा ? "

" तिथून उचलून नेण्यापूर्वी "

" होय-होयसें वाटते,–म्हणजे कशावरून म्हणतां ? कीं आसपासचीं जमलेलीं माणसें म्हणत होतीं कीं " हिला कोणी ढकलेली नाहीं व ती आपोआप पडून मेली असेंहि नाहीं. डॉक्टरची तपासणी चुकीची आहे असेंच वरीचशीं माणसें म्हणत होतीं. मला यांत कांहीं कळत नाहीं "

" इतकंच ? "

" हां-आणखी थोडें राहिलें. माणसें म्हणत होती—कारण थोड्याशा अंतरावर अलीकडे एका वेलीच्या जाळींत तिच्या अंगावरची शाल सांपडली."

" आँ ? " मी आश्चर्यानें विचारलें, " मग ती शाल कोठें आहे ? "

" शाल देखिल तिकडेच.! "

मी त्या रात्रीं तिला पाहिली तेव्हां देखिल तिच्या अंगावर शाल होती; तेव्हां त्याच तिच्या मेलेल्या जिवंत पाजी नवऱ्यानें हें कठोर कृत्य केलें नसेल ना ? असें माझें मन मला आंतून विचारूं लागलें, संभवनीय होतें. "

" तिनें शाल घेतली होती त्यावरून तिचा बाहेर फार वेळ राहण्याचा बेत असावा असें मला वाटतें. "

" खुळाच आहेस! शाल काय बायकामाणसं बाहेर पडायाला लागलीं म्हणजे नेहमींच घेतात. " मी म्हटलें " पण मला वाटतें रात्रौ ती कुणा मैत्रिणीला वगैरे भेटायला गेली असेल नाहीं ? "

म्हाताऱ्यानें यावर नुसती मान हालवून म्हटलें:—

" हल्लींचा तो प्रसंग गुदरल्यापासून आमची ताई पूर्वींची राहिली नव्हती. ती शहाण्यासारखी बोलण्या चालण्यांत दिसायला, पण–वागणूक अगदीं वेड्यासारखी–म्हणजे आम्ही म्हणतों तसें वेड लागल्यासारखी. तुम्हीं काय वाटेल तें म्हणा, मला तर वाटतें कीं त्यांनीं जीवच दिला असेल. त्या आपल्या जिवाला अगदीं कंटाळून गेल्या होत्या. "

" पण रात्रौ कोणा मैत्रिणीसह फिरायला जाण्याची तिला सवय होती काय ? " मी पुन्हा प्रश्न केला.

गोपी हा गडी नसून कुटुंबांतलाच एक माणूस होता; एवढें लक्ष्यांत घेतलें म्हणजे घरांतली नाजूक गोष्ट त्याच्या मुखांतून बाहेर फुटणें अशक्य होतें हें निराळें सांगण्याची जरूर नाहीं. आणि माझ्या प्रश्नाला उत्तर खोटें बोलण्या-शिवाय देतां येणें शक्य नव्हतें. बरें आंत संकटांत रुतून बसलेल्या आईसाहे-बांजवळ या वेळीं जाऊन तिला याबद्दल कांहीं विचारणें हेंहि मला अशक्यच होतें. म्हणून मी त्याला म्हटलें—

" खऱ्या गोष्टी सर्व उघडकीस आल्याशिवाय राहावयाच्या नाहींत. तेव्हां आतां माझ्याकडे सर्व ठाऊक असलेलें सांगशील तर कांहीं उपयोग तरी होईल."

मी कांहीं कोणी परका नव्हतों मला तो ओळखीतच होता. मी वरील वाक्य उच्चारल्यावर गोपी बोलूं लागला.

" आतां तसं बोलायचेंच तर मला इतकंच माहीत आहे बघा. " तो इकडे तिकडे पाहूं लागला. " गेल्या आठवड्यापासून एक नवीन हकीगत मी ऐकिली होती. मी ती कोणास अद्याप माझ्या तोंडानें काही सांगितली नव्हती. पण त्यांत सांगण्यासारखें नाहींच काही काय सागयाचें त्यांत ? "

" आतां हें बघ असले आढेवेढे आणि संकोच घेऊं नकोस. खरा प्रकार काय असेल तो जितका लौकर कळेल तेवढी पुढील व्यवस्था तरी करतां येईल."

" आमच्या शेजारच्या पलीकडल्या खोलीत एक गुजराथी राहतोना ? त्याचा मुलगा रात्रौ फार उशीरापर्यंत अभ्यास करीत असतो. त्याची परीक्षा जवळ आली असल्यामुळें हल्लीं तो खूप रात्रपर्यंत जागत असतो. अजमासें आठ दिवसापूर्वी अभ्यास आटोपल्यावर रात्रीं त्यास झोंप येईना म्हणून समुद्रावरचा वारा घेण्याकरितां म्हणून तो मरीनलाइन स्टेशन ओलांडून पलीकडे गेला आणि एका कुंजांत बसला. नंतर थोड्या वेळानें तो समुद्र कांठा-वर गेला तों त्यास एका म्हाताऱ्या मनुष्याच्या अगदीं बरोबर आंगास आग लागे इतकें जवळून अंबूताई चालतांना आढळल्याचें तो मला सांगूं लागला.

ताईची वेड्यासारखी स्थिति झाली असल्याचें सर्वांस ठाऊक होतें. व म्हणूनच असली गोष्ट माझ्याकडे बोलण्यास त्यास अधिकसा संकोच वाटला नाहीं. पण मी ती गोष्ट उडवून दिली बाबासाहेबांना काय ते त्या वेळीं एक दोन महिने झाले होते. त्याच्या बोलण्यावर विश्वास कोण ठेवणार ? लोकाना कांहीं ते खरें वाटलें नाहीं. व मीहि ते खरें न वाटेल असेंच बोलत असे. "

" बरें जाऊं द्या. एवढेंच ना ? " मी म्हणालों; " कदाचित् ती गोष्ट खरीहि असेल. खोटें तरी कोणी म्हणावे. पण मला मात्र खरें वाटत नाहीं, समजलास गोपी. पण कायरे ? त्या गुजराथी विद्यार्थ्याशिवाय आणखी कोणी तिला पाहिलें नाहीं ना ? "

" नाहीं, निदान माझ्या तरी ऐकिवांत नाहीं. त्या एकट्यानेच पाहिलें खरें; पण आसपास ती गोष्ट गजबजून गेली. खुळें माणूस म्हटलें कीं त्याच्यावर सर्वांचीच नजर असते. निदान ती जरी स्त्री असली तरी साधारण मोकळे-पणानें तिच्याकडे पाहण्यास तिच्या वेडेपणानें इतर लोकांस एक प्रकारची सव-लत मिळाल्यासारखें होतें. पण मी मात्र ती गोष्ट होता होईल तितकी दडपून टाकीत असे. "

" बरं, ही कुजबूज खुद्द ताईच्या कानापर्यंत पोचली नाहीं कधींच ? "

" नाहीं हो ! कधींच नाहीं, " म्हातारा गोपी म्हणाला " असल्या दुष्ट पणाचा बातम्याचा तिच्या नाजूक मनावर किती वाईट परिणाम होईल हे मला ठाऊक होतें. आम्ही ती कुजबुज तिच्या कानावर जाऊंच दिली नाहीं. आधीच तिचें काळीज दडपून गेलें होतें. तशांत असली वार्ता तिच्या काळ जास झोंबल्याशिवाय राहिली नसती. " नंतर त्याच्या डोळ्यावर खरोखरीच अश्रु उभे राहिले. तो गद्गद स्वरानें म्हणाला— 'पाळण्यांतल्या मुलापासूनची मी तिला हातांखांद्यावर खेळवली, आणि आतां अशा वयांत पोरीवर असला प्रसंग कोसळला. आणि आतां आज तर तीच गेली- ही-! " म्हाताऱ्याला रडूं कोस ळले. आज जवळ जवळ तीस वर्षे त्या कुटुंबांत त्यानें नोकरी केली होती.

अर्थात नोकरी करली ? त्या घरांत तो आपलेपणानें नांदला होता. त्याचा स्वर बोलतांना कांपत होता.

नंतर मी त्याला कांहीं इकडचे तिकडचे प्रश्न केले. त्याच्याकडून मिळालेली माहिती ह्मणजे इतकीच कीं ती अलीकडे घरांतून वारंवार नाहींशीं होई आणि ती एकाच ठिकाणीं नित्याची जात असे असे नाहीं; आणि घरीं असल्या वेळीं ती नेहमीं आपल्याच खोलींत एकटीच बसून राही. शिवाय तिची वागणूक दिसण्यांत समजूतदारपणाची; परंतु एरवी अगदींच वहावल्यासारखी होती. ह्या अशा तिच्या वागणुकीनेंच ती समजुतींत असून नानाप्रकारचे ढंग करीत आहे व नवरा गेल्याचें तिच्या मनाला कांहीं दुःख होत नाहीं असे लोकांस वाटे व तसें कित्येक उघड बोलूनहि दाखवीत. असे अनेक प्रकारचे विचार अनेक माणसें बोलून सारीत. त्याची ही हकीकत ऐकून मलाहि ती मला भेटल्या वेळींची तिची चमत्कारिक वागणूक आठवली. ती माझ्याशी बोलत असतां तिच्या मनांतल्या मनाच्या कोपऱ्यांत तरी पतिवियोगाचे दुःख लपून बसलें असेल असे कुणास वाटलें नसतें.

नंतर मी आंत जरा इकडे तिकडे फिरल्यासारखें करून ताईचें प्रेत तपासून पाहण्याकरितां गेलों.

गेलों तर हॉस्पिटलांतले डॉक्टर तेथें होतेच. त्यांनीं मला पाहतांच सांगितलें कीं प्रेत पोलीसांच्या हातास लागावयाच्या पूर्वींच प्राण निघून गेला होता.

" अपघात झाला असेल ह्मणतां ? " मी विचारलें.

" छे, छे, मला कांहीं असें वाटत नाही. डाव्या गालावर थोडेंसें खरचटले आहे पण तें मृत्यूनंतर. "

" काय ह्मणतां मग ? "

" आत्महत्या. निःसंशय !

" कांहीं काळेंबेरें असेल असें तुम्हांस वाटत नाहीं ? "

" मुळींच नाहीं; मुळींच नाहीं. "

मी उत्तर दिलें नाहीं, परंतु माझ्याकडे पाहिल्यावर मला कसली तरी शंका आली आहे असें त्याला दिसलें.

" तुम्हाला कसला तरी संशय येतो आहेसें दिसतें. बरोबरच आहे. असल्या आत्महत्येसारख्या केसमध्यें संशय हा यावयाचाच. बिचारीच्या नवऱ्याचा खून झाल्यापासून तिचें मन अगोदरच दडपून गेलें होतें. तुम्हाला कळलें असेल कदाचित् तिच्या आईच्या निरोपावरून मी तिला अलीकडे एकदोनदां तपासलें होतें. मला त्या वेळीं तिच्या मेंदूवर फार वाईट परिणाम झाल्याचा संशय आला होता परिणाम म्हणजे खरें बोलायचें तर मेंदूवर दुष्ट पदार्थांचा प्रयोगच झाला असला पाहिजे. पण तसें मानावयाचें झालें तरी उघड कारणें अथवा संभव कांहीं दिसेना. म्हणून मेंदू बिघडला होता म्हणावयाचें झालें. पण तिच्या मेंदूची रचनाच बदलली होती. "

" होय, आपण तिला तपासल्याचें तिच्या आईकडून मला एकदां कळलें होतें. तिची आई तिच्याबद्दल हल्लीं फारच काळजी घेत असे. "

' ही मरून गेलीच पण हिच्या आईवर हे प्रसंग फार वाईट आले. "

" तें काय विचारावयाचें ? " मी उत्तरलों.

" शेवटीं हिच्या नवऱ्याच्या मृत्यूबद्दलचा कांहीं सुगावा पोलीसास लागला नाहींच ना अजून ? "

" छे ! कोरोनरच्या चौकशीच्या वेळीं जें काय बाहेर आलें त्याच्यापेक्षां नवीन कांहींच कुठून बाहेर पडलें नाहीं अद्याप. पूर्वींची सर्व माहिती आपल्याला आहेच. ',

" मोठें आश्चर्य बुवा ! "

डॉक्टरबरोबर मी तिला ठेवली होती त्या खोलींत गेलों. तिचे केंस विस्कटून खांद्यावरून खालीं पडले होते. आणि तिचे दोन्ही हात छातीवर एकांत एक घालून ठेवण्यांत आले होते त्या आडव्या ठेवलेल्या प्रेताची मुद्रा—जी त्या दिवशीं मी माझ्याशीं सलगीनें बहिणीच्या कळवळ्यानें बोलतांना पाहिली होती, तीच तिची मुद्रा आतां अगदीं शांत आणि विसावा घेत असल्यासारखी दिसत होती; जशी कांहीं तिला आतां शाश्वतची विश्रांति मिळाली होती !

मी त्या प्रेताकडे पाहत असता डॉक्टरांनी—त्या खोलीच्या खिडकीचा पडदा वर केला—चक्क सूर्यप्रकाश आंत आल्यावर मी संथपणें पाहूं लागलों. मला तिला मुद्दाम पाण्यांत बुडविल्याची खूण कांहीं सांपडल्यास पाहावयाची होती. बुडून मेलेल्या माणसांस—विशेषतः स्त्रियांस तपासतांना डॉक्टरलोक बहुधा मनगट, हात व मान हीच अधिक बारकाईने तपासतात कारण त्या ठिकाणीं बुडवणारा इसम त्यांस पकडीत असतो. परंतु एवढ्यांवरून खरा निर्णय होत नाहीं. कारण बुडविणारा दुष्ट माणूस लेचापेचा नसला—आणि बहुधा तो नसतोच—तर तो ज्याला बुडवावयाचे त्याला दाबून दपटून ढकलण्यापेक्षा त्यास येनकेन प्रकारेण पाण्याच्या काठाला नेऊन त्याला नकळत अचानक धक्का देऊनच पाण्यांत लोटीत असतो. यापासून प्रेतावर मागें कोणत्याहि प्रकारची खूण उघडकीस येण्याची भीती राहत नाहीं. आणि म्हणूनच पाण्यांत लोटून खून झालेल्या बहुतेक केसींवर सरकारी डॉक्टरचा "–आत्महत्या" असाच निकाल असतो कारण त्यांना प्रेताच्या शरीरावर कांहीं खूण सांपडत नाहीं!

आतां माझ्या समोर जें प्रेत होतें त्याच्या शरिरावरील डाव्या गालावरील खरचटण्याशिवाय डाव्या पायाच्या आंगठ्याला थोडेंसें खरचटल्यासारखें मला दिसलें. त्याशिवाय मात्र मला आणखी कांहीं नवीन जखम दिसली नाहीं. परंतु मला मात्र असा संशय येत होता कीं ती आपल्या मेलेल्या नवऱ्याला भेटली आणि त्याच्याच हातून तिला मरण आलें असलें पाहिजे. पण याला कांहीं कारण पुरावा लावणें शक्यहि नव्हतें व सोपेंहि नव्हतें.

मी आपला स्वतःशींच विचार करीत होतों कीं ही कांहीं स्वतःच्या खुशीनें आत्महत्या केल्याची बाबत मुळींच नव्हे. कारण जग ज्याची गणना मृतांत करीत होते अशा आपल्या विचित्र नवऱ्यास ती भेटत होती. हा विचार माझ्या मनांत सारखा जागृत होता.

बरें तो जर जिवंत होता तर गांवदेवीवरच्या बाबासाहेबांच्या बंगल्यांत मेला तो कोण?

मला इतकी कळलेली व मी प्रत्यक्ष त्या रात्रीं पाहिलेली माहिती अकल्पित होती. परंतु ती दुसऱ्या कोणास सांगण्याची सोय नव्हती. कारण असल्या

गप्पांवर विश्वास कोण ठेवतो ? तेव्हां मी आपल्या संजीवनची भेट होईपर्यंत माझी माहिती कोणास न कळवितां माझ्यापाशींच गुप्त ठेविली होती.

संध्याकाळच्या सुमारास मी व पोलीस अधिकारी मिळून चौपाटीपासून कुलाब्यापर्यंत सर्व समुद्र किनारा वरून खालून बारीकपणें निरखून पाहिला. रात्रपडेपर्यंत आम्ही सारखे पुन्हा त्याच त्याच वाटेनें फिरत होतो त्या रात्रीं मी तिचा व तिच्या मेलेल्या नवऱ्याचा संवाद ऐकते वेळीं चर्नीरोड गार्डन् मधील ज्याठिकाणीं मी दडी मारून बसलों होतो त्याठिकाणी समोर आल्यावर मला त्या रात्रीची पुनःपुनः आठवण होई. कालच ती मला भेटावयास आली होती. पण मी कांहीं तिला ह्या प्रकाराबद्दल कांहीं बोललों नाहीं. खरेंच मला वाटलें मी केवढी मोठी चूक केली पण मला तरी कुठें त्या वेळी ठाऊक होतें कीं आज अंबूताई समुद्रांत जलसमाधि घेणार होती म्हणून ? पण आतां काय ? सर्वच फसलें ? ती गेली आणि तिच्या बरोबर तें रात्रीचें गुह्य—तें गुपित गेलें !



# प्रकरण २३ वें.

## पुनर्मीलन.

कस्तुरला बातमी कळविण्यात आली होतीच व त्यापूर्वी माझें पत्र वगैरे तिला पोंचलें होते; तेव्हां ती आईला भेटण्यास आता तर आल्याशिवाय रहावयाचीच नाही याबद्दल मला बिलकुल शंका नव्हती. सध्याकाळच्या सुमारास परत मी तिकडे गेलों. घरात सर्वत्र शांतता होती. फक्त कस्तुरचे हुंदके व उसासे मधुन मधून ऐकूं येत होते. कस्तुर या वेळीं आपल्या ताईच्या खोलीत नुसत्या सतरंजीवर पडून हुंदके देत होती

आंत गेल्यांवर बोलण्यास सुरवात कशी करावी या विचारात मी पडलों. कारण विघडलेलीं दोन मने पुन्हां एकत्र जुळल्यावर प्रथम काय, कसें व कोणी बोलावयाचें हा प्रश्न दोघांनाहि सारखाच घोंटाळयांत पाडीत असतो. तशांतच आणखी ताईच्या मृत्युबद्दलच्या शोकाची भर ! मग काय विचारतां ? हिला कशी बोलती करावी हें मला सुचेना. तथापि मी दुसऱ्याच पाहुण्यांच्या खोलींत गेलों व गोपीस सांगून तिकडे तिला बोलावलें; तथापि ती शोकामुळें व लज्जेमुळें यावयास कबूल होईना. शेवटीं मलाच ताईच्या खोलींत जावें लागलें

आंत गेल्यावर मी दरवाजा झांकून घेतला. कारण असें करणें जरी एरवीं शिष्टाचाराविरुद्ध झालें असलें, तरी हा प्रसंगच असा होता कीं, असल्या शिष्टाचारांस मनांत थारा देण्याची कोणासच आवश्यकता वाटली नाहीं.

मी तिच्याकडे एकवार नजर फेकली. आज ही पहिलीच भेटण्याची वेळ होती आणि तीहि अशा दुःखमय शोकप्रसंगी. तिची ती दुःखाने रडुन रडून डोळे सुजून गेल्यामुळें केविलवाणी व शोकपूर्ण झालेली मुद्रा कोणाच्याहि मनांत सहानुभूति व दया उत्पन्न करण्यास पुरे होती. तिच्या त्या शोकपूर्ण परंतु निष्पाप व प्रेमळ मुद्रेकडे नजर जातांच मला सर्व पूर्वप्रसंग आठवले. तिच्याबद्दल मी कसले घाणेरडे संशय मनांत आणलेले ! कदाचित् तिच्या हातून घडणें

नर दूरच राहो; पण मनांतहि आले नमावेत असले क्षुद्र संशय मी मनांत बाळगले होते. खरोखर कसल्या तरी रहस्याची बाब असली म्हणजे स्त्रिया-विषयीं पुरुषांच्या मनांत असावी तशी चित्तशुद्धता असत नाहीं; आणि मत्सर अथवा हेवा अगर असूया ही अशा वेळीं मानवी मनांतील प्रेमाचा ओलावा पार सुकवून टाकतात.

" कस्तुर, " मी जवळ जाऊन व तिचा खालीं पडलेला हात माझ्या हातांत घेऊन तिला वर उठवीत म्हटलें " कस्तुर, ह्या असल्या प्रसंगीं तुझ्या दुःखी मनाला समाधानी देण्याकरितां झटेल असा एक माणूस अद्याप या जगांत आहे. तुझ्या बऱ्याकरितां झटणारा, तुझ्यावर प्रेम करणारा अजून एक माणूस आहे. डोळे उघडून तरी पाहा ! " माझ्या आवाजांत या वेळी कापरी येत होती.

तिनें किंचित् डोळे उघडले आणि माझ्याकडे पाहिलें. जणूं काय मी काय बोललों हें तिला समजलें नाहीं असें तिच्या त्या नजरेनें दर्शविलें प्रणय व्यव-हारांत तरबेज झालेला माणूस मी नव्हतों हें पूर्वीं मी सांगून टाकलेंच आहे. आणि म्हणून तिची ती नजर पाहून माझ्या ह्या शब्दांनीं तिच्यावर कांहीं भलताच परिणाम झाला काय, असें मला वाटलें.

ती आपल्या भगिनीच्या दुखांत असतांहि म्हणाली, " हेच शब्द जर तुमच्या अंतःकरणापासून–अगदीं थेट अंतःकरणांतून आले असते "—

" तर मग कुठून ? हे शब्द अगदीं बेंबीच्या देठापासून आले आहेत. माझें पत्र नाहीं मिळालें ? "

" मिळालं, मी तें वाचलंहि–पण काय ? त्या पत्रांतल्या प्रमाणेंच तोंडाचे शब्द देखिल त्यापूर्वीं मी काय थोडे थोडके ऐकले होते ? पण शेवटीं तशी पाळी आलीच नाहीं ? "

" सगळा दोष माझा आहे; मी हें उघडया मनानें कबूल करतों आणि आतां तुझी क्षमा मागतो. "

" पण हा प्रसंग मुळीं यावा तरी कां ? माझ्याशीं आपली अशी तुटकपणाची वर्तणूक होण्यासारखं घडलं तरी काय माझ्या हातून ? आणि आपण तरी अपराध कसला केला ? आणि क्षमा कसली काय—"

तिच्या प्रश्नांची ही मालिका ऐकून मी स्तब्ध राहिलों. माझेंहि मन मी मोकळें करूं का ? हिला सत्य काय तें प्रामाणिकपणें सांगून टाकूं का ? असें मला त्या वेळीं वाटलें.

" तशीच एक गोष्ट माझ्या नजरेस आली, ह्मणूनच माझ्या वर्तनांत आपोआप फरक पडला गेला. " शेवटीं मी एवढें उत्तर देऊन टाकलेंच.

" कोणती ती ? " किंचित् उत्सुकतेनें तिनें विचारलें.

" मला एक गोष्ट आढळून आली आहे. " मी ह्मटलें.

" माझ्याबद्दल ? "

" होय, तुझ्याबद्दल. " मी तिच्या नजरेला नजर भिडवून बोललों, परंतु माझे शब्द ऐकताच, तिचें तोंड उतरलें, व ती एकदम कावरी बावरी झाल्यासारखी दिसली.

" बरं तर, मग ती गोष्ट मला काय ती आतां कळली पाहिजे. " ती मनाचा धडा करून ह्मणाली.

" मी ही गोष्ट सांगितल्यामुळें काय बरा वाईट परिणाम व्हावयाचा असेल तो होवो, " मी म्हटलें; " पण ज्या अर्थी कोणतीहि गोष्ट मनांत ठेवून कुढत बसणें मला प्रशस्त वाटत नाहीं—शिवाय मनांत ठेवलेल्या गोष्टी एकमेकांनीं एकमेकांना स्पष्ट विचारून खरा काय तो निर्णयच केला नाहीं, तर मनें साफ तरी केव्हां आणि कशीं होणार ?—तसेंच ज्या अर्थी तूं आतां ती गोष्ट जाणून घेण्याचा हट्टच धरीत आहेस, त्या अर्थी मला आतां सांगणें भागच आहे कीं, बाबासाहेबांच्या कागदपत्रांच्या दप्तरांत तूं त्यांना पाठविलेलीं कांहीं पत्रें मिळालीं आहेत. कांहीं वर्षांपूर्वीं लिहिलेलीं तीं पत्रें होतीं. ताजीं नव्हत व त्यावरून मला माहीत नसलेली व माझ्या अंतःकरणाला धक्का देणारी एक गोष्ट—एक सत्य हकीगत मला कळून चुकली. "

" सत्य हकीगत ! कशाची सत्य हकीगत ? " तिने विचारलें.

" आपल्या हातच्या प्रणयपत्रिकांची ! "

माझ्या ह्या शब्दाच्या माझ्या अपेक्षेप्रमाणें परिणाम न होता उलटें तिच्या छातीवरचें भीतीचें दडपण नाहींसें झाल्यासारखा तिनें एक लांब श्वास सोडला. मी खरी हकीगत जाणली आहे असें जेव्हां म्हटलें तेव्हां तिला बाबासाहेबांच्या मृत्यूच्या ढोंगाची खरी हकीगत मला समजली असें वाटून तिला भय उत्पन्न झालें असावें. तिच्या प्रणयपत्रिकांची सत्य हकीगतहि वरील हकीगतीपक्षां तिला अधिक भीतिकारक अगर महत्वाची वाटत नव्हती हें यावरून सिद्ध झालें. कारण ते माझे शब्द ऐकून ती म्हणाली,

" आणि हेंच आपल्या वृत्तींत फरक पडण्याचें कारण ? "

ह्या तिच्या वर्तनामुळें आता मात्र मला पुन्हा संशय आला कीं, बाबासाहेबांच्या मृत्यूचें गुपित कस्तुरला ठाऊक असलेंच पाहिजे. मग तिचा प्रत्यक्ष त्यांत हात असो वा नसो.

" होय, तेंच मुख्य कारण. प्रथमपासून ही गोष्ट मजपासून चोरून ठेवली गेली आणि अखेरपर्यंत तुझें राहाणेंहि बाबासाहेबांच्या घरांत होतेंच. ताईचें लग्न झाल्यावरसुद्धां तूं त्यांच्यांच घरीं होतीस. "

" त्याला तसंच काहीं कारण होतं. " कस्तूरनें शांतपणें उत्तर दिलें " मी जी राहिलें ती स्वतःच्या खुषीनं नव्हे; तर राहणं कांहीं कामासाठीं भाग पडलं म्हणून "

" म्हणजे राहाण्याला कोणी जबरी केली होती कीं काय ? "

" नाहीं. जबरी नव्हे. राहणं माझं कर्तव्य होतं. " नंतर थोडा वेळ थांबून आपलें मुख दोन्ही हातांनीं झांकून घेऊन ती स्फुंदून रडूं लागली. ' हाय ! हाय ! " ती रडतच म्हणाली, " माझ्या कपाळीं कोणकोणचीं दुखं; कोणकोणते प्रसंग अनुभवण्याचं आलं तें जर आपणाला कळेल, तर आपणाला खात्रीनं माझ्याबद्दल संशय येणार नाहीं. वरून दिसायला दुर्दैवानें साऱ्या-झाडून साऱ्या

गोष्टी माझ्या विरुद्धच घडत गेल्या आहेत. मला हें ठाऊक आहे. त्या पत्रांवरून आपणाला वाटलं असेल कीं, मी कुलस्त्रीचा मान मिळविण्याला पात्र नाहीं; आणि शेवटीं त्याच बाबासाहेबांच्या घरांत जो मी अझूनपर्यंत राहिलें त्यावरून तर बाबासाहेबांच्या मृत्यूच्या प्रकरणांतहि माझं अंग असावं असं आपल्या मनानं घेतलं असेल, हें मी जाणून आहें. ईश्वर साक्ष आहे. सर्व गोष्टी उजेडास कव्हां येतील तेव्हां खऱ्या खोट्याचा निकाल लागेलच लागेल. पण तोंपर्यंत माझी स्थिति कशी चमत्कारिक होऊन गेली आहे. खरंच ना हें ? " तिनें माझ्याकडे पाहत विचारलें " खरं ना ? बाबासाहेबांच्या मृत्यूच्या प्रकरणांत माझं अंग असावं असा संशय आपणाला कधीं तरी आला कीं नाहीं ? "

मी स्तब्धच राहिलों. मी तरी काय उत्तर देणार ? उघड्या मनानें सरळपणानें बोलून संशयनिवृत्ति करणें नेहमींच चांगलें असतें असें माझें मत. म्हणूनच मी निव्वळ आणखी असेंहि बोलून दाखविलें कीं, त्या पत्रांवरून असल्या प्रकारचा संशय घेणारा मीच एकटा नसून माझा मित्र संजीवन हाहि होता.

" तर मग आतां सर्व समजलें मी ! तेव्हांच त्यांनीं माझ्या हालचालींवर आजवर एकसारखी नजर ठेवली होती ती पोलिसासारखी ! आज कित्येक दिवस मी ज्या ज्याठिकाणीं जाई त्या त्याठिकाणीं त्यांचा कुणी ना कुणी माणूस माझ्या पाळतीवर एकसारखा होताच. तुह्मा दोघांनाहि माझ्याबद्दल संशय आला. परंतु आतां मी निरपराधी आहे असं अझून तुह्माला मीच सांगितलं पाहिजे का ? तुम्हाला अद्याप तें कळून आलं नाहीं का ? बाबासाहेबाच्या मृत्यूच्या बाबतींत माझं कोणत्याहि प्रकारं अंग नव्हतं हें इतक्या वेळांत तुम्हांला समजून चुकलंच असलं पाहिजे. "

" आम्हांला शंका आली ती आमच्याच उतावळीपणामुळें आली. आह्मी प्रत्येक गोष्टीचा पूर्ण विचार केला नाहीं. आणि त्या आमच्या शंकेला बाबासाहेबांच्या मृत्यूनंतरच्या तुझ्या चमत्कारिक वर्तनानें दुजोरा मिळाला. "

" माझं वर्तन चमत्कारिक जरी असलं तरी तें स्वाभाविक होतं. बाबासाहेबांच्या मृत्यूमुळं तुम्हां पुरुषांवर जितका परिणाम झाला, तितकाच नव्हे तर

त्याच्याहून जास्तच परिणाम आम्हां दोघींवर झाला असल्यास नवल कसचं ! तेवढ्यांतच मला त्या माझ्या पत्राची आठवण होऊन तीं पोलिसांच्या हातीं लागतील अशी मला घडोघडी भीति वाटे. कारण तुमच्याप्रमाणंच त्यांनीं त्या पत्रांवरून मला खुनी मानलं असतं. विशेषत: शेवटच्या पत्राची तर मला फारच भीति वाटत होती. म्हणूनच मी वारंवार त्याबद्दल आज नवीन काय उघडकीला आलं अशा सारखे प्रश्न सारखी विचारीत आलें आणि त्यामुळेंच तुमच्या माझ्याविषयीच्या शंकेला बळकटी येत गेली. ''

आपल्या ह्या सर्व बोलण्याचा माझ्यावर काय परिणाम होतो हें ती पाहत होती आणि तिच्या त्या निष्पाप प्रेमपूर्ण पण मानी मुखकमलाकडे मी अनिमिष नेत्रांनीं पाहत होतों. शेवटीं माझ्या संशयखोरपणाबद्दल खजील होऊन मी तिला म्हटलें '' कस्तुर ! आपलें दोघांचें प्रेम असाधारण व निष्कपट आहे कारणाशिवाय मी तुझ्याविषयी संशय घेतले हें मी कबूल करतो व याबद्दल आतां मला मनापासून पश्चात्ताप होत आहे. हल्लींच्या ह्या वियोगामुळें तर माझा प्रेमौघ आतां दुप्पट जोरानें वाहूं लागला आहे; — आणि आतां तर माझी पक्की खात्री पटून गेली कीं, तुझ्याशिवाय मला जीवित काढणें शक्य नाही. माझ्या जीवनकक्षेंत तूच एका स्त्रीनें प्रवेश केला आहेस. इतर स्त्रियांना मी माता भगिनींप्रमाणें लेखतों. मी आज माझें मन त्याच्यावर एकहि पडदा न ठेवतां साफ उघडें करून तुझ्यापाशीं बोलत आहे. हें वरपांगीं बोलणें नव्हे माझ्या या शब्दांना परमेश्वर साक्ष आहे. जास्त काय सांगूं ? ''

ती यावर कांहींच बोलली नाहीं. तिचें आंग किंचित् कंपित झाल्यासारखें दिसलें. तिनें खालीं मान घातली; व मागील प्रसंग आठवून ती मूकरुदन करूं लागली.

'' कस्तुर ! अझून देखिल तूं मला क्षमा करणार नाहींस का ? '' मनांतलें सर्व एकदां ओकून टाकावयाचा आजपर्यंतचा माझा बेत मी आतां पार पाडल्यानंतर त्यावर तिच्या तोंडचें उत्तर ऐकण्यास मी अधीर झालों होतों. मी म्हणालों 'कस्तुर, परत तूं माझी होणार नाहींस का ? हें बाबासाहेबांच्या मृत्यूचे

किटाळ येण्यापूर्वी जशीं आपलीं मनें धुनलेल्या तांदळासारखीं स्वच्छ होतीं तशीं फिरून होणें शक्य नाहीं का ? माझ्यावरचा तुझा रोष जाणार नाहीं का ? ”

तिच्या मनात अनेक मनोविकारानी काहूर उठवून दिलेलें दिसलें. तिला आतां बोलावयास आरंभ करावयाला शब्दच सूचेनात. अशा स्थितींत कांहीं वेळ गेल्यावर अश्रूंच्या ओघळानी मलिन झालेला तांबूस चेहरा तिनें चट्कन वर केला आणि अडखळत अडखळत रुद्धस्वरानें ती म्हणाली,

“ माझा किती म्हणून अंत पाहायचा ? आपणच मला अगोदर अपराधी ठरवून पुन्हा वर माझीच क्षमा मागायची ही रीत तरी कुठची ? खरं म्हटलं तर मीच आपली क्षमा मागितली पाहिजे आणि ती मी मागतें. गैरसमजुतीचा प्रकार झाला ही गोष्टच मुळी आपण विसरून जाऊं. मला दुसरी कसलीच अपेक्षा नाहीं मागच्या सर्व संशयाच्या गोष्टी आपण विसरून जाण्याएवढीच आपणापाशीं माझी याचना आहे माझं मन मी बोलून कशाला दाखवूं ? तें आपोआपच बोलेल. त्याला मनुष्याच्या तोंडच्या शब्दाची जरूरी नाहीं. आता मात्र एवढं मला कबूल केलं पाहिजे कीं, आपली प्रथम भेट होण्याच्या पूर्वी ताईच्याहि लग्नापूर्वी एकवार अपरिपक्व बुद्धीच्या मुलींच्या स्वभावास अनुसरून त्या बाबासाहेबांच्या आपण पत्नी व्हावें अशी विचित्र वेडगळ कल्पना माझ्या मनांतून येऊन गेली खरीच. आमचीं म्हातारीं माणसें दुसऱ्यापणच्या लग्नाचं कौतुक करतात. दुसरेपणच्या नवऱ्याच्या पदरीं पडणं भाग्याचं असं तीं समजतात. पोरवयांत लग्न म्हणजे काय याची मुलींना कल्पनाहि नसते. आपणाला पुष्कळसे दागिने, घालणारा उंची उंची कपडे देणारा, मनाच्या सर्व हौसी पुरविणारा असा पति मिळावा असं अज्ञ बालिकांना वाटतं. शिवाय त्या वेळी मी जरी अगदींच पोरवयाची नव्हतें, व खेडेगांवच्या म्हाताऱ्या माणसांच्या समजुतींचा तितकासा परिणाम माझ्या मनावर होण्याचा संभव नव्हता, तरी दुसरी एक गोष्ट माझ्या मनांत त्या वेळीं वावरत होती. ती मी आपल्याला सांगणं गैरशिस्त. पण आतां आपलं मन उघड झालंच आहे, अशा वेळीं मी तरी मनाला आडपडदा कशाला ठेवूं ? खरंच सांगतें. कित्येक मुलांच्या आणि तसंच मुलींच्या वयांत असा एक काळ येतो कीं, त्या वयांत— ”

इतकें बोलून ती मध्येच थांबली. मघांचे माझें मनमोकळेपणाचे बोल ऐकून माझ्या निष्कपट कस्तुरने आपल्याहि मनावरचा पडदा साफ दूर केला होता. आजपर्यंत मी तिला इतक्या सलगिनें व उघडेपणानें बोलतांना कधींहि ऐकलें नव्हतें मला तिचें तें बोलणें ऐकून माझ्या भाषणाचा अनुकूल परिणाम झालेला पाहून आनंद वाटत होता. मी भुकेलेल्या कानांनीं तिचें सर्व भाषण ऐकत होतों सर्व भीडभाड बाजूला ठेवून जशा जिवलग मैत्रिणी एकमेकींशीं बोलतात तशाच प्रकारें ती आज माझ्यासमोर बोलत होती. मला वाटतें स्वत: अंबुताईशीं ती इतक्या मोकळेपणानें कधीं बोलली नसेल. आणि मी आलों त्या वेळीं तर ताईच्या शोकानें वांकलेली ती कुसुमकोमल लता अशा प्रकारें माझ्याशीं बोलेल असेंहि मला वाटलें नव्हतें पण एखाद्या दुःखाचा कडेलोट झाला म्हणजे नेहमींच्या वृत्तींच्या प्रतिबंधांना आळा पडतो आणि त्या स्वैर होतात. अत्यंत दुःखांत असूनहि माणूस क्षणांत अत्यंत आनंदी बनतो, तर तो दुसऱ्याच क्षणीं पूर्वींच्याहि पेक्षा शोकव्याप्त होतो. तसाच कांहीसा परिणाम एकंदर परिस्थितीनें तिच्या मनावर केला होता. मागील सर्व प्रसंगांची माझ्या बोलण्यानें तिला आठवण करून दिल्यामुळें जवळच्या—त्या क्षणींच्या परिस्थितीची—बहिणीच्या दुःखाची—तिला त्या क्षणीं तरी विस्मृति पडून मागील स्थितीचें चित्र तिच्या नजरेसमोर उभेंहि राहिलें आणि त्या बेभान स्थितींतच ती वरील सर्व आपले विचार निरर्गलपणें मनसोक्त बोलत सुटली होती. तथापि शिकलेली झाली अथवा कांहीं झालें तरी ती स्त्रीच ना? ती बोलतां बोलतां स्त्रीजातीच्या स्वभावाचें स्पष्टीकरण व विशेषतः पुरुषजातीच्या स्वभावावर बोलण्याचा ओघ येण्याबरोबर त्या ओघानें तिच्या वृत्तीच्या स्वैरतेला जरासें खेंचून धरलें. अथवा त्या ओघानें नव्हे—तर स्त्रीस्वभावसहज मर्यादेनें तिच्या वृत्तीच्या सैल सुटलेल्या लगामाला तिनें खेंचला असेंच म्हणणें सार्थ होईल. ती मध्येंच अडखळली. त्याबरोबर मी सहज वर पाहिलें. तिनेंहि पुन्हां आपले विचार उघड करण्यास सुरवात केली.

ती पुढें म्हणाली " कित्येक मुलांच्या आणि मुलींच्या वयांत असा एक काळ येतो कीं, त्या वेळीं जाणत्या माणसांना जें अयोग्य वाटतं तेंच त्यांना योग्य

वाटतं. मला नीटसं समजावून सांगतां यायचं नाहीं; पण जसं एखाद्या मुलाला आपल्यापेक्षां वयानं थोर असली तरी एखादी स्त्री आवडते—तिच्यावर प्रीति बसते, तसंच एखाद्या मुलीची आपल्यापेक्षां वयानं कित्येक पटीनं थोर असलेल्या पुरुषावर प्रीति बसते—तो तिला आवडूं लागतो. मी आपल्या चरणी माफी मागून खरी खरी गोष्ट सांगत्ये की, त्या वेळीं मला बाबासाहेब आवडूं लागले ते प्रकृतीनंहि निर्दोष दिसत व चालणं बोलणं कसं ऐटदार असे माझ्या मनावर ह्या सर्व गोष्टींचा परिणाम झाला व मी वेड्यासारखी त्या वेळीं वागलें ही गोष्ट खरी आहे. पण पुढं लवकरच माझ्या अविचाराची मला पूर्ण लज्जा वाटूं लागली. आणि आयुष्यातील एक भयंकर चूक मी केली असं माझं मन खाऊं लागलं. पण पुढं अशा प्रसंगीं माझ्या गळ्यास तींच पत्रं सुरी लावतील अशी मला कल्पनाहि नव्हती. त्या वेळीं मी ती चूक केली पण ती मी आपल्या कानांवर घातली पाहिजे होती ती मी अद्याप कळविली नाहीं ही प्रथम माझीच चूक ! नाहीं तर गोष्टी इतक्या थरावर पोंचल्याच नसत्या. त्या आपल्या मित्रास कांहीं वाटलं तरी त्यांच्याशीं मला काय करायचं ? जें मन मला निर्मळ असायाला पाहिजे तें तरी इतकं कलुषित झालं नसतं सगळा दोष माझा आहे मी आपली क्षमा मागत्ये ' असें ह्मणून खरोखरच तिनें डोळे पुशीत माझे दोन्ही पाय धरले आणि त्यांवर अश्रूंचा अभिषेक सुरू केला.

मी ही गोष्ट इथें सरळ एकाच फटक्यासरशी लिहिली आहे खरी, पण ही तिला सांगण्यास कितीतरी प्रयास पडले होते. तिच्या शब्दांत पश्चात्तापाचा स्पष्ट सूर निघत होता माझें मन नुसतें कळवळून गेलें !

" दोष आपणा दोघांचाहि आहे. दोघांनींहि मागल्या गोष्टी विसरून गेलें पाहिजे. " असें ह्मणून मी तिला हाताला धरून उठविलें. पण माझा पदस्पर्श झाला असतांहि माझा हस्तस्पर्श मात्र करून घेण्यास ती तयार नव्हती. ती झट्कन् मागें सरली. मीहि भानावर आलों. या तिच्या कृतीचा मला राग येण्याऐवजीं अथवा निराशेबद्दल खिन्नता येण्याऐवजीं उलट कौतुक व आदरच माझ्या मनांत तिच्याविषयीं तिच्या या दूर सरण्यानें उत्पन्न झाला

" मनातून माझ्याविषयी द्वेष देखिल उत्पन्न झाला असेल ना ? " तिनें अश्रुपूर्ण नेत्रांनीं मजकडे पाहत विचारलें.

" मुळींच नाहीं. द्वेष तर मुळींच नाहीं. मात्र तुझ्यांतली गुह्य गोष्ट तुला पक्केपणीं माहीत असून तूं ती मजपासून लपवून ठेविलीस अशी जबरदस्त शंका मला आली होती खरी. "

तिनें माझ्याकडे अशा दृष्टीने पाहिलें कीं, जणूं काय ती माझ्या अंतःकरणाचा ठाव घेत होती !

" पण खरोखरच सांगत्ये, मला त्यातलं काहीच ठाऊक नाहीं. "

" पण तुला त्यासंबंधींच्या काहीं अवांतर चमत्कारिक गोष्टी माहीत आहेत एवढें खास ! "

" अशा कांही गोष्टी मला माहीत आहेत कीं, त्यांना जोडणारा दुवा सांपडेल, तर त्याच्यावरून कांहीं खात्रीलायक अनुमानं निघतील. मी आज इतके महिने प्रयत्न करिते आहें पण मला कांहीं त्याची सांगड घालणारा दुवा हुडकून काढण्यांत यश आलं नाहीं. "

" तर मग ह्या बाबतींत आपण दोघांनीं मिळून प्रयत्न केल्यास बरें होईल नाहीं का ? ज्या वेळीं तो भयंकर प्रसंग घडला त्या वेळीं तूं त्या ठिकाणीं होतीस, त्या अर्थीं त्या घरातल्या एकंदर माहितीचा फायदा तूं मला देशील तर फार चांगलें होईल. "

" अं–हं " ती नकारार्थी मान हलवीत म्हणाली. " तेवढं मात्र मला आपण मला विचारूं नये. मला सांगता येण्यासारखंच नाहीं मुळीं. "

" तर मग तुझा माझ्यावर विश्वासच नाहीं म्हणायचा " मी कांहींसा रागानें कपाळाला आठ्या घालून म्हणालों.

"तसं नव्हे. हा विश्वासाचा प्रश्न नव्हे. याच्यावर इज्जत अवलंबून आहे ! "

" बर पण माझ्या ह्या एका प्रश्नाचें तूं उत्तर देशील ना! तूं बाबामहे- ब्यांच्या घरीं इतके दिवस कां राहिलीस ? आपल्या आईकडे, मावशीकडे, अथवा दुसरीकडे कुठेंच न जाता तूं तेथेंच इतके राहावयास तयार कशी झालीस ? "

" तें तर सर्वांला—तुह्माला देखिल पूर्वींपासूनच ठाऊक आहे. ह्मातारे बाबासाहेब वारंवार सीक पडूं लागले, ह्मणून ताईनें मुद्दाम मला आपल्या बरो- बर राहावयास नेलं. "

ही सबब किती अपुरती होती! मला तर ती ऐकून हंसूंच आलें. खरी वस्तुस्थिति सांगण्याची टाळाटाळ करण्याकरितां दिलेलें हें उत्तर होतें. तें उत्तर ऐकण्याची माझी अपेक्षाच नव्हती. कारण तें मला खरोखर पूर्वींपासून ठाऊक होतेंच. बाबासाहेब वारंवार सीक पडूं लागल्यामुळें अंबूताईनें कस्तुरला सोब- तीला आणण्याचें बाबासाहेबास सुचवून त्यांच्याकडून परवानगी मिळविली होती.

" ह्याहून काहीं अन्य कारण नाहींना ? " मी साधारण रागाच्याच शब्दां- नीं विचारलें. " खरें सांगायचें असेल तरच उत्तर दे. "

यावर ती थोडीशी विचारात पडली. या तिच्या वर्तनानें तर ती माझ्या- पासून काहीं गोष्टी लपवूं पाहते आहे—मी तिच्यावर इतकें प्रेम करीत असून व त्याबद्दल तिची खात्री असूनहि ती माझ्यापासून काहीं गोष्टी चोरून ठेवित आहे, हें मी ओळखलें.

" होय, दुसरांहि एक कारण होतं " शेवटीं खालीं मान घालून तिनें उत्तर दिलें.

" कोणतें तें ? "

" मला तें सांगतां येणार नाहीं. तें एक रहस्य आहे. "

" रहस्य! माझ्यापासून गुप्त ठेवण्यासारखें रहस्य ? " मी खोंचून विचारलें.

" काय मी उत्तर देऊं ? पुन्हा माझं दुर्दैव आतां आड येणार! कृपा करा आणि मला तेवढी गोष्ट विचारूं नका. ह्या पायांपासूनहि काहीं दिवस लपवून ठेवण्यासारखं तें रहस्य आहे. " माझ्या पायांला स्पर्श करून ती ह्मणाली.

हें उत्तर ऐकून विचलित झालेली माझी दृष्टि व वृत्ति तिच्या लक्ष्यांत आली असावी, कारण लगेच तिनें आणखी पुढील शब्द उच्चारले.

" आजच माझी ताई गेली ना ! आणि आजच आपणालाहि इतकी घाई कराविशी वाटते—" इतके बोलत असतां पुन्हा तिची चर्या पालटली आणि ताईच्या आंठवणीनें ती पुन्हा मान फिरवून खिडकींतून समोर दिसणाऱ्या एका इमारतीकडे अर्थशून्य नजरेनें पाहत अश्रु गाळूं लागली.

तिनें मला हा खरोखरच पेच टाकला. या पेंचानें माझें तोंडच बंद झालें. त्यामुळें माझी मनोवृत्ति पुनश्च क्षुब्ध होत आहे असें जाणून ती म्हणाली—

" मागं मी आपल्याला सांगितलं नाहीं का, कीं अद्याप मला माहीत असलेल्या गोष्टींच्या इमारतीला जिचा पाया होईल अशी मुख्य खरी एक गोष्ट कळून येईपर्यंत मी कांहींच बोलणार नाहीं म्हणून ? मला आढळून आलेल्या सर्व गोष्टी अशा आहेत कीं, त्यापासून तुम्हाला फायदा तर होणार नाहींच; तर उलट अधिकच गुंतागुंतींत अडकल्यासारखं होईल. "

" तर मग तुला खरी गोष्ट देखिल काय ती माहीत आहे. तूं मला सांगायला टाळीत आहेस झालें " मी मुद्दामच तिला लावून बोललों.

" नाहीं, नाहीं, नाहीं ! मला खरी गोष्ट ठाऊक नाहीं. नुसत्या शंका आणि तर्क आहेत. दुसरं कांहीं नाहीं. "

" ताईच्या मृत्यूबद्दल तुला काय वाटतं ?" मी बोट रिचवण्याचा प्रयत्न केला.

" आत्महत्या. त्यांत वाटायचंच काय आणखी ? "

बाबासाहेबांच्या गुप्त अस्तित्वाची तिला माहिती आहे कीं काय हें मला पाहायाचें होतें. कदाचित् बहिणीची गुप्त गोष्ट बहिणीला माहीत असावयाची.

" मृत्यूनंतर बाबासाहेबांच्या चेहऱ्यांत पडलेला फरक तुझ्या ध्यानांत आहे ना ? तूं कित्येक वेळां पाहिला असशील. तुझ्या लक्ष्यांत आला देखिल असेल "

मी काय म्हणतों आहे आणि त्याचा रोंख कोणीकडे आहे हें समजण्याकरितां तिनें माझ्याकडे एकदा पाहिलें आणि म्हणाली—

" मी पुष्कळ वेळां त्याच्या चेहऱ्याकडं पाहिलं आणि त्यांच्या चेहऱ्यांत मृत्यूनंतर पडलेला फरकहि माझ्या लक्ष्यांत आला. पण त्याचं काय ! तसं नेहमींच होतं मागाहून. "

" होय. परन्तु त्या प्रेतावर सरकारला जेव्हां परीक्षण म्हणून प्रेत तपासणी करून उत्तर द्यावें लागलें, तेव्हां डॉक्टर नियोगींनीं ' नुकतेंच चार तासांपूर्वी जिवंत असताना. त्यांना पाहिलें त्याच्यापेक्षां आता मृत्यूनंतर ते दहा वर्षांनीं अधिक म्हातारे आहेत ' असा शेरा दिलेला तुला ठाऊक नसेल ? "

" तें नाहीं माझ्या लक्षात; पण त्याचं तरी काय ? आपलं बोलणं माझ्या नाहीं ध्यानांत आलं ? " तिनें विचारलें.

" त्याचेंहि खूप महत्व आहे. " मीं मोघमच म्हटलें. त्या प्रकरणाचें गुह्य तिला माहीत असावें. तिच्या या नाटकी वर्तनाचा मला अचंबा वाटला.

" तें कसं ?" तिनें विचारलें.

परंतु ज्या अर्थी तिनें आपल्याला ठाऊक असलेल्या गुप्त गोष्टी व बाबासाहेबांच्या घरांत राहण्याचें कारण मला सांगावयाचें टाळलें होतें त्या अर्थी मीहि तिला माझ्या मनांतल्या गोष्टी न सांगण्याचा निश्चय केला. अशा प्रकारच्या गोष्टींमुळें आमच्या दोघांच्याहि मनात पुनः तेढ उत्पन्न होऊं लागली. मी तिला पुनः पुनः स्पष्ट बोलण्याविषयीं विनविलें. परंतु ज्याचे नांव ते. ती म्हणून आपल्या निश्चयापासून ढळली नाहीं.

" नका हो ! आजच माझ्यावर तुमच्या प्रश्नाला उत्तर देण्याची पाळी आणूं नका. माझ्यावर पुन्हा रोष करूं नका. माझ्यासंबंधीं भलते विचार मनांत आणू नका. निरनिराळ्या गोष्टींची सांगड जुळविणारा दुवा मला अजूनहि सांपडलेला नाहीं. आणि म्हणून मी कांहींच बोलायचं धाडस करीत नाहीं. कृपा करा. आणि मला तसले प्रश्न फिरून विचारूं नका. " माझ्याकडे पाहिल्यावर मनांतली चलबिचल पाहून ती पुन्हा म्हणाली—" माझ्यावर रागाऊं नका. "

माझ्या कस्तुरनें एकवार निश्चय केल्यानंतर तो तिला बदलावयास लावण्याचें सामर्थ्य माझ्या नव्हे — कोणाच्याहि अंगांत नाहीं हें मला ठाऊक होतें

ती उथळ मनाची, लेंच्यापेच्या निश्चयाची स्त्री नव्हती. समाजाच्या निष्कारण निंदेला अगर गैरवाजवी मताला भीक घालणारी ती नव्हती. एखाद्या प्रश्नाचा पूर्ण विचार घरून तो तिच्या मनाला पटल्यावर त्याच्याबद्दल अन्यथा भाव तिच्या मनांत उत्पन्न करण्याची कोणाचीहि प्राज्ञा नव्हती. अंबुताईचा स्वभाव अगदीं याच्या विरुद्ध होता. तिला स्वतःचें असें मतच नव्हतें. ती कस्तुरप्रमाणें मनाची खंबीर व गंभीर नव्हती. कस्तुर समाजाच्या व स्त्री जातीच्या मर्यादेच्या बंधनांना तोडून टाकणारी नव्हती, पण तिच्या ठिकाणीं वस्तुज्ञानाचें, स्वतंत्र परीक्षणाचें व स्वमतानुसार प्रामाणिक वर्तनाचें आणि शेवटीं निश्चयाचें बळ वास करीत होतें.

" बरें पण, या बाबतींत आपली एकमेकांना मदत होईल, तेव्हां आपण दोघे मिळून आतां इथून कामाला सुरवात करूं." मी तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला; " मला तर असें वाटतें कीं हीं सर्व जवळजवळ सात रहस्यें आहेत आणि तीं एकमेकांवर अवलंबून आहेत. आरंभीं जरी ह्या रहस्यसमूहास ' दुधारीसुरी 'च कारण झाली असली तरी खरीं रहस्यें एकाहून एक गहन आहेत त्यांतलें एक जरी उलगडेल तरी बाकीचीं सर्व एकामागून एक उलगडत जातील. "

" तर मग ताईच्या आत्महत्येचा बाबासाहेबांच्या मृत्यूशीं संबंध आहे असं आपलं म्हणणं आहे कीं काय ! " तिनें चाणाक्षपणें विचारिलें.

" यांत काय संशय ? पण ताईनें आत्महत्या केली, हें मात्र तुझें म्हणणें मला मान्य नाहीं. " मी पुन्हा एकवार तिच्या पोटांत शिरण्याचा प्रयत्न करूं लागलों.

" तर मग तिच्या आत्महत्येशीं दुसरी कांहीं मसलत आहे कुणाची तरी असं मत आहे आपलं ? "

मी होकारार्थी मान हालविली.

" मग काय तिला मुद्दाम पाण्यांत ढकलून तिचा कुणी खून केला ? तशा कांहीं खुणा आपणास आढळल्या कीं काय ? " तिनें डोळे विस्फारीत घाबरून आश्चर्यानें प्रश्न केला.

" नाहीं, खुणाबिणा कांहीं नाहींत. माझीं सर्व अनुमानें तर्कावर रचलेली आहेत. "

" कोणता तो तर्क ? "

माझी सर्व अनुमानें व सर्व शोध तिला कळविण्यास मी अनमान करूं लागलों. कारण मध्यंतरीच्या सर्व गैरसमजुती आतां नाहींशा होऊन एकमेकांविषयीं एकमेकांची मनें माफ शुद्ध झाल्यावरसुद्धां तिनें माझ्याकडे आपल्या मनांतल्या गुप्त गोष्टी सांगूं नयेत याबद्दल मला वाईट वाटूं लागलेच. पुन्हा निराशाहि होऊं लागली.

" आतांच मी सांगितलें ना कीं, माझीं सर्व अनुमानें तार्किक आहेत म्हणून. तेव्हां नुसता तर्क तुला सांगून काय करायचें ? तो तर्क जरी मी तुला सांगितला तरी देखिल फार विस्मय वाटेल. तूं कदाचित् त्या तर्काला जुन्या गुलबकावलींतील अथवा हातीमताईच्या अगर दहा राजपुत्रांच्या गोष्टींतली एखादी गोष्ट मानशील तेव्हां कशाला तुला सांगूं ? " माझ्या अपेक्षेप्रमाणें माझ्या ह्या भाषणानें तिची उत्सुकता खूपच वाढली.

" असेना का तर्क. ऐकूं द्या तर खरा. " ती म्हणाली.

" मी एक विलक्षण गोष्ट पाहिली आहे. " मी हळू आवाजांत बोलूं लागलों. " तुम्ही ताई कोणा तरी पुरुषाबरोबर मध्यरात्रीनंतर कोणाचीहि जाग नसतां मरीन लाईनपासून बॅकबेपर्यंतच्या समुद्र कांठीं फिरावयास जात असते असें माझ्या नजरेस आलें आहे. "

" काय ? " एकदम दचकल्यासारखें करून ती ओरडली. व त्याबरोबर आतां घरांतील कोणी माणूस आंत येईल असाहि भयोत्पादक विचार माझ्या मनांत आला.

" काय ? आपण प्रत्यक्ष स्वतःच्या डोळ्यांनीं त्या दोघांनां पाहिलं होतं. कीं काय ? "

" मी त्यांना पाहिलें एवढेच नव्हे तर त्यांचें संभाषण सुद्धां ऐकलें आहे !" माझ्या भाषणाचा तिच्यावर झालेला तो विद्युत्परिणाम पाहून मी पुढें बोललों.

" तर मग तुम्हाला सर्व माहीत आहे ! खरी गोष्ट आपणाला ठाऊक आहे तर ! मग माझ्यापाशीं आपणास सांगण्यासारखं गुह्य कांहीं नाहीं." इतकें म्हणून आपला पदर हातांत धरून व माझ्या पायांपाशीं बसून ती पुढें म्हणाली "क्षमा करा हो मला ! माफ करा ! माझ्याबद्दल भलतेसलते कुविचार मनांत आणूं नका. माझ्यावर रागाऊ नका. मी आपल्यापुढें पदर पसरत्यें मला टाकूं नका —हाय ! हाय ! ताई ग ! "

ती पुन्हा धाड्कन् जमिनीवर पडलीच निश्चेष्ट झाली. माझें तिच्यावर अतोनात प्रेम होतें. तिला पडलेली पाहून मी धांवून गेलों. माझें डॉक्टरीचें ज्ञान त्या वेळीं कुठच्या कुठें गेलें. कांहींच सुचेना. ती माझी आकृती असूनहि तिच्या भोंवतालीं पसरलेलें रहस्यांचें जाळें कोणालाहि उलगडतां येण्यासारख नव्हतें. उलट तें अधिकाधिक घट्ट होत चाललें होतें. मी देखिल तिच्या शेजारीं मट्कन् धावून बसलों. तोंच ही गडबड ऐकून म्हातारा गडी आंत आला व त्यानें तिला शुद्धीवर आणण्याची खटपट चालविली. त्याला मीहि मदत करूं लागलों, व ती उठल्यावर, आतां कस्तुरची आई हळु हळू शुद्धिवर येत आहे असें गड्याकडून कळल्यामुळें कस्तुरच्या आईचीहि भेट घेण्याचा मी निश्चय केला कस्तुरनें कांहीं वेळानें डोळे उघडले. पण फिरून " ताईग ! " असें म्हणून ती बेशुद्ध झाली.

# प्रकरण २४ वें

## केलेल्या कामाचा आढावा !

अबुताईच्या मृत्यूवर कोरोनरच्या ऑफिसमध्यें जी ज्यूरी भरली तिनें एकमतानें "आत्महत्या" असा निकाल देऊन टाकला. कारण शरीरावर दुखापतीच्या जखमा नाहींत अगर अन्यप्रकारचा पुरावा नाहीं तेव्हां आत्महत्येशिवाय दुसरा निकाल देण्यास कांहीं आधारच नव्हता.

संजीवन आज कित्येक दिवस कुठें बाहेर होता; हें पूर्वी सांगण्यांत आलेलें आहेच. परंतु वर्तमानपत्रांतून अबुताईच्या मृत्यूची हकीगत त्याच्या कानांत पडण्याबरोबर कोरोनरच्या ऑफिसकडे तो ठेवल्यासारखा हजर झाला ! अर्थात् मी जरी त्याठिकाणीं होतों. तरी तपासणी खलास होऊन निकाल वगैरे देऊन ऑफिसमधून बाहेर पडून बाजूला गेल्यावरच आमच्या संभाषणाला सुरवात होणें शक्य होतें. ह्या हल्लींच्या दौऱ्यांत त्याला फारच श्रम पडल्याचें स्पष्ट चिन्ह त्याच्या चेहऱ्यावर दिसत होतें. रात्रौ जागरणें झाल्यामुळें जसे होतात तसे खोल व काळवंडलेले डोळे, शरीरयष्टि वाळून किडकिडीत झाल्यासारखी, मिळून एकंदरींत त्याची सर्वच प्रकृति खालावलेली दिसत होती.

आम्ही बाहेर पडल्यावर एका हॉटेलांत फराळ केला व नंतर राजाबाई टॉवरकडील अगदीं एका बाजूच्या कोपऱ्यांत गवतावर आसन ठोकून बोलावयास सुरवात केली.

"कसें काय मोहन ! आहे कीं नाहीं मजा या ज्यूरीच्या निकालाची ? संजीवन म्हणाला "आत्महत्या असा निकाल बाहेर पडला. उद्यां इंग्रजी वर्तमानपत्रांतून आत्महत्याच्या संख्येंत ही एक भर पडेल व त्याची मराठी वर्तमान पत्रांच्या पुरवणीतहि भाषांतरें वाचवयास सांपडतील. या निकालांत कितपत तथ्य असेलसें तुला वाटतें ! "

"मला वाटतें ताईनें आत्महत्या केली नसून तिचा खून झाला आहे. मला वाटतें नव्हे—माझी खात्री आहे."

" अगदीं बरोबर ! टाळी ! " मी टळा दिली. " निःसंशय ही आत्महत्या-नसून खुनाची ही केस आहे. "

" शिवाय बाबासाहेबांच्या खुनाशीं या खुनाचा संबंध आहे या माझ्या तर्काला तुझी पुष्टी आहे का ? " मी विचारलें.

" अलबत् ! " संजीवन ह्मणाला. " नवरा आणि बायको इतक्या थोडया महिन्यांच्या अंतरानें मारलीं जावीत यावरून याच्या मुळाशीं द्वेषाग्नीची ठिणगी असलीच पाहिजे. ह्मातारे बाबासाहेब कसे नेहमीं घाबरलेले असत नाहीं का ? त्यांना आपल्या जीविताचा धोका वाटत होता. आणि त्यावरून त्यांचा कोणी तरी गुप्त शत्रु असला पाहिजे असेंहि वाटतें. "

" बरोबर आहे. " मी ह्मणालों. " पण मित्रा, तूं इतके दिवस कुठें गुंतला होतास तें नाहीं अद्याप मला सांगितलेंस ? "

" मी होतों फिरतीवर; अथवा तीर्थयात्रा करीत होतों ह्मणेनास घटकाभर ! "

" एक डोळा कस्तुरच्या पाळतीवर ठेवून राहिलेल्या एकाच डोळयानें सर्व तीर्थें पाहिलींस ? वस्ताद बुवा तूं ! " मी हांसत ह्मटलें.

" ती तुला असें ह्मणाली कीं काय ? " त्यानें चटकन् माझ्याकडे परतून विचारलें. त्याच्या बोलण्यांत गुप्त गोष्टी उघडकीस आल्याची थोडीशी काळजीची छटाहि होती. " मला नाहीं वाटलें ती मला ओळखूं शकेलशी. पण बायका पुरुषांपेक्षां आत्याच धूर्त. कस्तुरचें तर बोलतांच नये. मला तिनें पाहिलें तर अखेरीस—हं ! " शेवटचे शब्द त्यानें स्वतःशींच उच्चारले होते.

" मग ? पाहिलें म्हणून काय झालें ? त्याची कसली चिंता ? ह्मा सात रहस्यांचा तूं कांहीं तरी छडा लावलास कीं नाहीं तें सांग पाहूं अगोदर ? "

" सात रहस्यें ? " असें आश्चर्यानें ह्मणून तो स्वतःच्या मनाशीं गुंतागुंतीच्या एकंदर प्रश्नांची बेरीज घेऊं लागला.

"बरोबर रे बरोबर ! मोहन, तूं म्हणतोस तें बरोबर आहे" शेवटीं तो म्हणाला "हें एक रहस्यसप्तक आहे खरें ! एकाच रहस्याच्या पोटांत सात रहस्यांचा समावेश

असलेले असलें, किंबहुना आजपर्यंत कोणाच्याहि पाहण्यांत अथवा ऐकण्यांत आलें नसेल. बिचाऱ्या पोलिसांनीं या प्रकरणाला रजा दिली ते सुखी खरे! मोहन, काय आश्चर्य पाहा! ज्यांचा हा धंदा आणि ह्या धंद्याकरितां म्हणून जे पोलीस पगार घेतात ते आपले हात धुवून स्वस्थ; आणि ज्यांचा असल्या गोष्टींशीं मुळींच संबंध नाहीं ते आम्ही आपापला धंदा टाकून मुद्दाम मागें हा उपद्व्याप लावून घेतला आहे! तेव्हां आम्ही शहाणे कीं वेडे?"

ह्या प्रश्नाचें उत्तर देणें मला प्रशस्त वाटलें नाहीं. कारण कस्तुरकरितां म्हणून तर मी हें प्रकरण हातांत घेऊन संजीवनलाहि त्यांत ओढलें होतें.

"पण तूं अगोदर रहस्यसप्तकातलीं सात रहस्यें कोणती तीं सांग पाहूं."

"नाहीं. तूंच सांग अगोदर एकमेकांचे मनांतले हिशेब कितपत जुळतात तें बघूं" मग मीं सांगावयास सुरवात केली.

"पहिलें बाबासाहेबांचा खून करणाऱ्याचा शोध; दुसरें त्यांच्या मृत्यूस कारण झालेली ती दुधारी सुरी अथवा तसल्याच कसल्या तरी शस्त्रानें केलेली जखम; तिसरें डॉ. नियोगींला ठाऊक असलेलें कस्तुरचें गुपित; बाबासाहेबांनीं कस्तुरला धिःकारून तिच्या बहिणीस अंबुताईस पत्नी-पद्याकडे केल्यावरहि कस्तुरचा बाबासाहेबांच्या घरीं राहण्याचा गुप्त हेतु; पांचवें बाबासाहेबांचें मृत्यूनंतर पुनरागमन, सहावें—नळबाजारांत माझ्या जिवावर आलेला—खुनाचा प्रयत्न, आणि सातवें अंबुताईचा मृत्यु. यांतील प्रत्येक रहस्य गूढ होऊन बसलें आहे."

"बरें, मोहन आतां जरा असा ये!" तो मला अधिक जवळ ओढून म्हणाला. "हें पाहा मला खरें सांग. या सात रहस्यांपैकीं कांहींचा तलास तूं लावला आहेस खरें कीं नाहीं?"

त्याच्या मुद्रेवर भावावरून त्याला देखिल खरोखरच पुष्कळशी माहिती मिळाली असलीच पाहिजे हें मी ताडलें. मी त्यांलीं म्हटलें—

" पण माझ्यापेक्षां तुला जास्त माहिती मिळाली आहे, हें खरें की नाहीं ?"

" होय ! मिळाली आहे थोडीसी. "

" सांग तर आधीं मला. " मी उतावळेपणानें म्हटलें. " विशेषत: कस्तुरचा संबंध कोणत्या बाबतींत कशाप्रकारें कितपत येत आहे तें प्रथम मला सांग. मला तिच्याबद्दल जास्त काळजी आहे. नाहीतर मला या प्रकरणाची इतकी चुटपुट लागून राहिली नसती."

" धीरानें घे मोहन ! " सावकाश शांतिपूर्वक संजीवन म्हणाला. " सध्या आम्हाला तिच्या हालचालींकडे लक्ष देतां नये. खरें सांगायचें म्हणजे हें रहस्य फार गूढ आहे, आपल्याला कांहीं सुटायचें नाहीं, असें मी तुला सांगितलें आणि तो विषय हातचा सोडल्यासारखा करून मी गेलों, तो त्याच उद्योगाला एकसारखा लागलों. कांहीं कल्पना बसविल्या, आणि मग त्यांच्या अनुरोधानें एकदम मोहीम सुरू केली, ती हा वेळपर्यंत."

" आणि शेवट काय झाला आपल्या मोहिमीचा ! "

" शेवट ? शेवट—" तो हांसला. " गंमतच आहे ती मोठी पुष्कळ दिवस खटपट केल्यावर माझे प्रयत्न सर्व फुकट होते हें माझें मलाच उमगलें. कारण आरंभीं आपण कांहीं गोष्टी गृहित धरतांना चुकलों होतों. उदाहरणार्थ, बाबासाहेबांचा खून करणारा माणूस म्हणून जो व्यक्ति मी बहिर्मी धरली होती ती व्यक्ति खुनी नव्हती. अर्थात् मुळपासून पुन्हा सुरवात करण्याशिवाय दुसरें गत्यंतर नव्हतें. त्या नवीन पद्धतीनें सुरवात केल्यावर शोधाची दिशाहि अगदीं साफ बदलली. मी नवीन नवीन मिळणाऱ्या माहितीवरून नवीन नवीन तर्क बसवूं लागलों आणि शेवटीं मी योग्य मार्गावर आहे, दिशाभूल झालेली नाहीं अशी माझी खात्री पटल्यावर मला समाधान वाटलें. एक पंधरवडा तर मी नवऱ्याच्या संबंधच कामांत घालविला. झोंप क्वचित्च घ्यावयास मिळे. आणि असल्या गोष्टींत मन घातल्यावर मग असले क्लेश सहन करावेच लागतात. मी कसा आणि किती ठिकाणी फिरलों तें एक माझें मलाच ठाऊक. शेवटीं मला खरें काय तें समजून आलें, पण ते इतकें विलक्षण होतें कीं, त्याच्यावर

माझा कांहीं केल्या विश्वास म्हणून बसेना. ह्या गोष्टीला आतां उणे पुरे दहा दिवस होत आले; पण त्या गोष्टीवर माझा विश्वास म्हणून बसत नाहीं ''

" हं ! तर मग अखेर रहस्याची किल्ली सांपडली म्हणावयाची ? " मी म्हटलें

' असें आतां तरी वाटतें आहे. तथापि माझी सर्व माहिती अद्याप एक देशीच व मोघम स्वरूपाची आहे. अद्याप तिची छाननी झालेली नाहीं ह्या तुझ्या अंबूताईच्या मृत्यूनें माझे सर्व शोध वायफळ ठरविले आहेत. याकरितां मोहन, मी तुला आतां विचारतों कीं अबूताईचा खूनच झाला असें तू कशावरून म्हणतोस तें सांग ना ? ही वेळ थट्टामस्करीनें अथवा उडवा उडवीनें बोलण्याची नव्हे हें तुला मी सांगितलें पाहिजे असें नाहीं. आपण दोघांनीं एकमेकापासून कांहीं एक लपवून ठेवतां नये. खरें काय तें मला सांग. "

मीहि कस्तुरला असेंच सांगत होतों. मलाहि संजीवन तेंच सांगत आहे. कस्तुरनें कांहीं आपल्या अंतराचा मला ठाव लागूं दिला नाहीं. मला ठाऊक असलेली खरी गोष्ट मी संजीवनला सांगून टाकूं काय ? मी सांगावयास कांकू करूं लागलों. कारण संजीवन म्हणजे अशातशांतली व्यक्ति नव्हती. कदाचित् तो या माझ्या—माझ्या मतें महत्वाच्या हकीगतीला मुळीं कस्तटाप्रमाणेंच लेखणार नाहीं म्हणून कशावरून ? कदाचित् त्याला माझें सांगणें पोरकटपणाचें व अविश्वसनीय देखिल वाटण्याचा संभव आहे. अशा अनेक शंका मनांत उपस्थित होऊन मी त्यास माझ्याकडची हकीगत सांगावयास कचरूं लागलों. कारण बाबासाहेब जीवंत आहेत ही गोष्ट दुसऱ्या पोरासहि खरी वाटण्यासारखी नव्हती ! बरें मला तर तें रहस्य उकलावयाचें होतें. आणि म्हणूनच आम्ही त्या बाबतींत एकमेकांपासून अलग न राहतां एकमेकांचें सहकार्य करणें इष्ट होतें, व तसें केलें तरच कांहीं इष्टार्थ साधण्याचा संभव होता. आतांपर्यंत आम्हीं दोघांनींहि अगदीं स्वतंत्रपणें आपआपल्यापरी खटपट चालविली होती. आणि आतां दोघांनींहि सहकारितेनें एकत्र मिळून उद्योग चालविण्याची वेळ येऊन ठेपली होती.

" संजीवन ! सांगतोंच मी आतां. " मी कचरतच म्हणालों. " तूं पुढें माझ्या सांगण्याची टर उडविणार हें तर दिसतेंच आहे, तथापि सांगतों.

गेल्या आठवड्यांत मी एक चमत्कार शोधून काढला आहे. मी त्याला चमत्कार म्हणत आहें, लक्ष्यांत ठेव चमत्कारच तो. तुला तो इतका चमत्कारिक वाटेल कीं तो ऐकल्यावर मी हे सर्व स्वप्नांत बरळतें आहे असेंच तूं म्हणशील, हेंहि मी अगोदरच सांगून ठेवतों. मला त्याची स्वतः उपपत्ति लावतां येणार नाहीं, बरं का ? तथापि मी तो प्रत्यक्ष या माझ्या दोन्ही डोळ्यांनी पाहिलेला आहे, आणि म्हणूनच तर मी तो तुझ्या कानावर घालण्याचें धाडस करीत आहें. बाकी त्या चमत्काराने पूर्वीच्या गोष्टींची गुंतागुंत सुटणें तर लांबच पण ती अधिक मात्र उकलण्यास कठाण होईल "

" इत्तिच्या ! संपलें का ? एवढेंच ? तो चमत्कार—चमत्कार म्हणून आतां ऐकायला–मिळणार–आतां ऐकायला मिळेल म्हणून ऐकतां ऐकतां शेवटीं पहिल्याच नमनाला घडाभर तेल सांगून टाकशील का आतां काय तो तुझा चमत्कार ! ",

" ऐक तर मग. नीट लक्ष देऊन ऐक. मध्यंतरीं एक अक्षरहि बोलूं नको. आणि अखेरपर्यंत ऐकून घेतल्याशिवाय टर उडविण्याची घाई करूं नको " अशा प्रकारचा प्रथम उपोद्घात करून मी त्यास पूर्वी लिहिलेली समुद्र तीरावरच्या दंपत्याची सर्व हकीगत सांगितली.

त्यानें शांतपणें माझी सर्व हकिगत ऐकून घेतली. ऐकत असतां क्षणांत त्याला समाधान झाल्यासारखें त्याच्या मुद्रेवरून वाटे, तर क्षणांत तो गोंधळांत पडल्यासारखा दिसे. एक दोनदां तर त्यानें निराशेचे उद्गारहि काढले;पण माझी गोष्ट संपल्यावर तो लागलीच म्हणाला—

" काय तूं त्याला प्रत्यक्ष पाहिलेंस ? बाबासाहेबाला तूं पाहिलेंस ? "

" होय. बाबासाहेबानांच मी पाहिलें. आणि तें कसें ? "

" कसें ? "

" अंबूताईच्या बरोबर फिरतांना ! "

यावर तो—कांहीं बोलला नाहीं. ऐकत असतां आपल्या हातांतल्या काठीच्या टोकानें तो जमिनीवर भूमितीच्या आकृति काढूं लागला. तो खोल विचारांत मग्न झाला असतां तो असेंच नेहमी करी. ही त्याची एक नेहमींची खोड होती.

मीहि त्याच्या चर्येकडे कौतुकानें पाहूं लागलों. मोठमोठ्या कड पगारांच्या गुप्त पोलीसांना कधींहि न उमगणारी रहस्यें हा माझा साधासाच दिसणारा मित्र मोठ्या शिताफीनें उघडकीस आणतो आणि तीहि निरपेक्ष बुद्धीनें ! असा माणूस आपला मित्र असल्यामुळें व आपला ज्याशीं, अत्यंत निकटचा संबंध आला आहे असें हें सांप्रतचें कुभांडें देखिल ,तो खात्रीनें उलथून पाडणार अशा प्रकारच्या त्याच्या बुद्धिवैभवाच्या अलौकिकत्वाबद्दल कांहींसा कृतज्ञताबुद्धीनें व कौतुकानें मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहूं लागलों.

" मोहन ! " तो अखेरीस म्हणाला; " आतां किती वाजले ? "

मला त्यानें हा प्रश्न केला असला तरी आम्ही दोघांनीहि आपआपल्या घड्याळांत पाहिलें तों अडीच वाजले होते.

" बस्स् ! मला आतांच इथून निघालें पाहिजे. मला जरूरीचें काम आहे, अगदीं–अगदीं नाजूक काम तुझ्या हकीगतीवरून पुन्हा माझ्या कार्यक्रमांत फरक होणार " तो काळजीच्या स्वरानें म्हणाला.

" तुझ्या पूर्वतर्काला कांहीं बळकटी येते काय माझ्या या हकीगतीनें ? "

" हो—य—होय म्हणेनास ! कांहींशी—कांहींशी नव्हे बरीचशी बळकटी यते. एक मुद्दा मला आतांपर्यंत सुटत नव्हता तो आतां सुटूं पाहातो आहे."

" आणि अंबूताईनें स्वतः आत्महत्या केली नसून तिचा खूनच झाला याहि विधानाला बळकटी येते—बाध येत नाहीं ना ? " मी सुचविलें

"तें ऐन्हांशी कांहीं एक मला विचारूं नकोस. मला आतां निघालें पाहिजे. परळवरून चिंचपोकळीकडच्या बाजूला तूं येतोस ? "

" अगदीं एका पायावर. कदाचित् माझी तुला मदत होईल " माझ्या हकिगतीला माझ्या अपेक्षेच्या बाहेर त्यानें महत्व दिल्यामुळें मीहि स्वतःला नामिक गुप्तरहस्यशोधक समजूं लागलों

" हो ! होईलहि ? " त्यानें म्हटलें.

आतां तर मला अधिकच जोर आला.

तथापि वरळ परळकडे जाण्यापूर्वी आम्ही प्रथम प्रिन्सेसस्ट्रीटवरच गेलों. सजीवनचें इथें काम काय होतें कोण्|स ठाऊक. तो खालच्या एका हॉटेलांत शिरला. मी मात्र तडक वर गेलों तो कस्तुरला भेटलों. मला इकडे यायलाच पाहिजे होतें. आपोआप मनांतलें साधलें.

कस्तुर मला भेटली. नुकत्याच झालेल्या आमच्या भेटीचा परिणाम तिजवर काय झाला आहे तें मला पाहावयाचें होतें. म्हणूनच इतक्या घाईत असूनहि मी इकडे यावयास मुद्दाम तयार झालों होतों.

बोलण्यास सुरवात झाल्यावर मी तिला थोडक्यांत सांगितलें कीं, कांहीं झालें तरी माझ्या प्रेमांत अंतर येणार नाहीं. आपण मी विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं तेव्हां आपल्यावर कदाचित् माझा रोष होईल असें तिला या वेळीं वाटणें साहजिक होतें व ती तिची भीति कायम राहणें श्रेयस्कर होणार नाहीं असें समजून मी तिला भेटलों.

एकांतांत मी पुन्हा माझें मनोगत तिला कळविल्यावर तिच्या चेहऱ्यावरील अनेकविध दुःखांच्या योगानें पडलेल्या आळ्यांतील कांहीं धागे दूर झाले. तिनें शेवटीं इतकेंच म्हटलें--

" मला क्षमा असावी !

माझ्या मनांतला एक शेवटचाच पडदा अद्याप खोलावयाचा राहिला होता. तो खोलण्याची आतां वेळ आली आहे असें मला क्षणोक्षणीं वाटत होतें. तो खोलण्यास विलंब लावण्यांत मी ठकपणा करतों आहें असें माझें मन मला खात होतें. मी स्वार्थामुळें हा वेळ काढीत होतों काय ! अजूनहि थोडा वेळ थांबावें असें मला वाटलें आणि ओंठावर आलेले शब्द मी आंत कोंडले, आणि तिच्याकडे प्रेमार्द्र दृष्टीनें पाहत मी निघालों. कारण खालून संजीवनचा खुणेचा शब्द माझ्या कानीं आला.



## प्रकरण २५ ब.

### पुनः संशय !

आम्ही ट्रामामधून चाललों होतों. जाईपर्यंत संजीवन ट्राममध्यें थोडीशी डुलकी घेत होता आणि परळला उतरल्यावर तर तो मला आपल्याबरोबर येऊं देईना. इतक्यांत त्याचे मन बदललें. मला त्याबद्दल वाईट वाटलें. पण मी तसें वर दिसुं दिलें नाहीं. मलाहि त्याच्या मागोमाग राहून या रहस्यसप्तकाचें मूळ हुडकून काढावयाचें होतेंच. पण माझें तो बिलकुल ऐकून घेईना.

" मी प्रथम तुला बरोबर घेतलें खरें व माझ्या मनांत तुला बरोबर न्यावयाचें नव्हतें. पण आतां जें कांहीं मला सुचलें आहे, त्यावरून मी एकट्यानेंच या वेळीं तरी कामास लागणें अवश्य आहे. दुसरा कोणीच बरोबर असतां कामा नये. असानेंच आपला कार्यभाग साधला तर अधिक साधेल हें लक्ष्यांत ठेव. यानंतर तुझी मला खरोखरीच जरूर लागेल." तो प्रेमळपणें माझें मन वळविण्याकरितां ह्मणाला.

" कांहीं हरकत नाहीं. मलाहि आतां गेलेंच पाहिजे होतें. दवाखान्यांतील एका निकडीच्या केसीची मला, ट्राममध्यें बसून इथपर्यंत येई तों आठवणच नव्हती. मग झाली. पण ह्मटलें आतां बोलावें कसें ! तेव्हां मला मार्ग सावयास मिळाल तर उत्तमच आहे. पण मी सांगितलेल्या हकीगतीमुळें तुला नवीन नवीन अनेक कल्पना सुचूं लागल्या आहेत. होय असेंच ना ? " मी हसत विचारलें.

" खरी गोष्ट. त्या गोष्टी अत्यंत महत्वाच्या आहेत. माझ्या डोक्यांत कांहीं एका प्रकाराबद्दल नवीनच प्रकाश नुकताच पडूं लागला आहे. पण मला जी अमुक कल्पना येत आहे ती जर खरी ठरली तर मृत्युलोकांतील तें एक अभिनव नवलच मानलें जाईल यांत कांहीं शंका नाहीं." तो ह्मणाला.

" त्याबद्दल मला देखिल शंका नाहीं " मी ह्मटलें; " तूं परत मला केव्हां भेटतोस ? "

" एवढं सांपडतांच तुला प्रथम भेटेन. उद्यां किंवा परवां सकाळीं. मला येथून जराशानें ट्रेननें बाहेरगांवीं एका ठिकाणी जावें लागणार आहे. काय समजलास? तिकडून परतल्यावर मी तुला भेटेन. सध्यां मला फार घाई आहे. बरें तर ! " असें ह्मणून त्यानें शेकहँड केला व तो निसटला. उत्कृष्ट गुप्त-पोलीसास आवश्यक असणारे उत्कृष्ट गुण त्याच्या ठिकाणीं साकल्यानें वास करीत होते. त्याच्या बुद्धीची कुशाग्रता तर कोणाहि बुद्धिवानाला स्तंभित करण्यासारखी होती.

मी तिथून मागें परतलों तो थेट दवाखान्यांत आलों. दवाखान्यांत डॉ. नियोगी आपल्या पेशंट्स्‌नां तपासीत होते. त्यांची मुद्रा अगदीं त्रासून गेल्यासारखी दिसत होती. कोणी तरी स्त्रीरोग्यानें आपली घरगुती लांबलचक कंटाळवाणी कथा सांगून डॉक्टरसाहेबांस जेरीस आणलें असावें.

मी गेल्यावर तिची केस मला समजावून सांगत असतां डॉ. साहेब ह्मणाले-" इतःपर आतां या असल्या स्त्रीरोग्यांनीं दुसरा एखादा डॉक्टर पाहिल्यास बरें. मला त्याची पर्वा नाहीं. सगळयांचा रोग मूळास एकच. अपचन, जागरण, आहारविहारांतील अनियमितपणा आणि इतर कारणांमुळें स्नायूंवर परिणाम होऊन अशक्तता उत्पन्न झालेली आहे. तात्पुरती आजारीपणा कळण्यापुरती हकीगत सांगावी. त्याला सास्वा नणदांच्या इतिहासाची कशाला माझ्या कानापाशीं कटकटक विनाकारण ! "

नंतर बोलतां बोलतां विषय बदलून मी डॉक्टरसाहेबांस अंबूताईच्या मृत्यूवर ज्यूरीनें दिलेलें मत ' ताजी बातमी ' ह्मणून सांगितलें. तें ऐकून त्यांची वृत्ति एकदम पालटली. करुणार्द्रतेची व सहानुभूतीची छटा त्यांनीं आपल्या चेहऱ्यावर दर्शविली.

" गेली बिचारी अंबूताई ! काय तिनें ह्याक ओढिले ! तारुण्यांत वैधव्य ! ह्मणूनच मला वाटतें झालें तें एका अर्थी बरें झालें. असून तरी काय करणार होती ? आतां, पुनर्विवाहाची जरीच धूम निघाली आहे खरी, पण ती आपल्याला कांहीं पसंत नाहीं. व आमच्या पसंतीनापसंतीचें आतांच्या तरुणपि-

तीक महत्त्वहि नाहीं. कारण आह्मी आतां मागें पडलों. आह्मी कर्ती माणसें नव्हे. असो. अखेरपर्यंत अझूनहि पोलीसांस कांहीं कसलाच सुमाबा लागत नाहीं ना ? हें पाहा, मोहन ! मला तर असें वाटतें कीं, बाबासाहेबांची वागणूक अखेरोअखेरीस जरा चमत्कारिक-ह्मणजे एकलकोंडेपणाची अशी झाली होती. त्यांना आंतून कसली तरी भीति वाटत होती. पण त्यांनीं ती अखेरपर्यंत कोणापाशींहि बोलून मात्र दाखविली नाहीं. कसें वाटतें तुला ? खरें की नाही ? "

" होय, मला देखिल त्याबद्दल राहून राहून नवलच वाटतें. "

" अझून नाहींच कांहीं निष्पन्न झालें ? " डॉक्टर म्हणाले. " त्या नोकराचा—गंगारामाचा पाठलाग करावयाचें पोलीसानीं सोडूनच दिलें वाटतें ! का ? "

" गंगारामाच्या मागें होते पोलीस कांहीं दिवसपर्यंत, परंतु निष्पन्न नाहीं झालें कांहीं त्यापासून. तो निरपराधी असल्याबद्दल पोलीसांची खात्री आहे. "

" आणि तुझ्या मित्राचे संजीवनाचे प्रयत्न कुठपर्यंत आले ? पोलीसना मदत करण्याचें तर त्याचे ब्रीदच. चहाचा धंदा नांवाला आपला खरा धंदा म्हणजे डिटेक्टिव्ह्चा—बिनपगारी डिटेक्टिव्ह्चा ! " डॉक्टर हंसून म्हणाले, " होय ना ? तो काय म्हणतो ? आढळला का त्याला गुन्हेगार कोण तो ? "

" त्याला कशाचा तरी मागमूस लागला असावा असें मला वाटतें. "

" काय ? कशाचा मागमूस त्याला लागला ? ऐकूं तर खरें ! " डॉक्टरनीं खुर्चीवरून टेबलावर वांकून विचारलें. त्यांनीं दडवण्याचा प्रयत्न केला तरी त्यांच्या प्रश्नांत उत्सुकतेची झांक स्पष्ट दिसत होती. बाबासाहेबांचे डॉक्टरसाहेब जिगर दोस्त; तेव्हां त्यांच्याबद्दलची चौकशी ते नेहमीं उत्सुकतेनेंच करीत हें मला ठाऊक होतें.

" त्याची स्वतःची खात्री झाल्याशिवाय दुसऱ्याला—मला देखिल तो कांहीं एक समजूं द्यावयाचा नाहीं. "

" मुंबई शहर म्हणजे सरकारचें—पोलीसचें केंद्रस्थान. मोठमोठे डोक्याचे पोलीस कामास हजर आणि अशा प्रकारचे हे दोन्ही खून जर करणारास

पचून गेले तर मग कहरच झाला म्हणावयाचा. हें लाजिरवाणेंच नव्हे काय ? "
" अँ ? कोणास–"

" पोलीसांस. "

" पोलीसांस लाजिरावें नव्हे ? मला आशा वाटत होती कीं, तुझ्या संजीवनाला थोडेंबहुत तरी यश येईल. पण नाहीं दिसत कांहीं चिन्ह ! बरें एकंदरीत दुनिया झुकती है हेंच खरें म्हणावयाचें ! "

" एकावर एक हे दोन खूनच झाले आहेत हें खरें आहे. " मी म्हणालों. " कोरोनरच्या ज्यूरीनें जरी " आत्महत्या " म्हणून निकाल दिला असला तरी वस्तुस्थिति अगदीं भिन्न आहे असें मला तरी वाटतें. "

" भिन्न ? कशी ती ? ' डॉक्टरनीं भुंवया फिरवून विचारलें.

" हे दोन्ही खून एकाच हेतूनें—अथवा एकाच व्यक्तीनें—अथवा थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्या दोन्ही खुनांचा संबंध अगदीं असलाच पाहिजे!"

" कां तो ? कशावरून ? "

" असलाच पाहिजे. पुष्कळांचें असें मत आहे. "

" पुष्कळांचें असो. पण तूं कशावरून म्हणतोस ? " भुवया अधिकच वक्र करून डॉक्टरसाहेब म्हणाले. या प्रकरणांतील प्रत्येक गोष्टींत ते मूळपासूनच लक्ष घालीत असत.

" ज्या ठिकाणीं तिचा खून अथवा आत्महत्या म्हणा झाली त्याच्याच आसपास ती मध्यरात्रीनंतर एका विचित्र माणसाबरोबर फिरत असे असें लोक बोलतात '

' लोक बोलतात ' हे शब्द मी मुद्दाम भरीस घातले, मी " आपल्या नव्याच्या भुताबरोबर " असेंच म्हणणार होतों, परंतु विचित्रमाणसाबरोबर हे शब्द अचानक माझ्या तोंडाबाहेर पडले.

" विचित्र माणसाबरोबर ? ! " त्यांचें आश्चर्य अधिकच वाढलें. " पाहण्यांत त्या विचित्र माणसास ओळखण्याइतकें जवळ जाऊन पाहिलें नाहीं ? "

आतां मात्र माझ्यावरच पाळी आली. पण मला ती चुकवावयाची होती.

"जवळ जाऊन कोणी पाहिलें नसावें असें वाटतें. नाहीं तर बिंग बाहेर फुटलें असतें. अथवा पाहाणारांच्या ओळखीचाहि तो माणूस नसेल कदाचित्; परंतु मला वाटतें आतां पुन्हां पोलिसतपास मात्र जारीनें सुरू आहे."

"कोण बरें असावा हा विचित्र माणूस!" स्वतःशींच विचार करीत व डोकें खाजवीत डॉक्टरसाहेब ह्मणाले. "अबुताईचें तर आपल्या नवऱ्यावर अतोनात प्रेम होतें असें निदान मला तरी वाटतें. परंतु असला खुनासारखा प्रसंग आणि त्यांत गुरफटलेली एखादी तरुण विधवा असली ह्मणजे मग कुटाळ लोकांच्या जिभेला हाडच राहत नाहीं. मला वाटत असल्या लोकांच्या कुजक्या मेंदूंतून निघालेल्याच ह्या काल्पनिक गोष्टी असाव्यात."

"हें तर खरेंच, परंतु वरील गोष्टींतही कांहीं तथ्य असावें असें माझें मत आहे."

"याला आधार काय?"

"पुष्कळ आहेत आधार!" मी उत्तरलों.

"तर मग ज्यूरीचें मत तसें कां?"

"पोलीसांच्या मागचा तगादा चुकविण्याकरितां. पोलीसचैच हे सर्व खेळ आहेत. नाहीं तर काय?"

"पण मला नवल वाटतें तें असें कीं, त्या बिचाऱ्या गरीब विधवेला ठार मारून मारणारानें मिळविलें तरी काय?" कींव आल्याचें दर्शवून कळवळ्यानें डॉक्टरसाहेब ह्मणाले.

"मागाहून त्या माणसाला तिचा कंटाळा आला असेल, असें लोक ह्मणतात." मी मुद्दामच सांगितलें.

"अरेरे! मोहन, तुझ्या तोंडांतून तरी त्या विधवेबद्दल असले शब्द येतां नये होते. नवऱ्याशीं प्रेमभावानें वागणाऱ्या त्या स्त्रीला नवरा वारल्यानंतर इतक्या थोड्या अवधींत असले कुविचाराचे ढंग सुचतील हें संभवनीय तरी

आहे काय ? का ह्मणतों मी असें ? कारण बाबासाहेबांच्या मैत्रीमुळें तिचें वर्तन माझ्या नजरेस पडेच की नाहीं ? स्त्रियांचा स्वभाव मी पूर्णपणें ओळखतों. नुसता चेहरा पाहिला पुरे, कीं ही स्त्री कसल्या वर्तनाची आहे हें मी बिनचूक सांगूं शकेन. आणि ह्मणूनच ह्मणतों कीं, बिचाऱ्या अंबूताईच्या मनांत असले पापी विचार स्वप्नीं सुद्धां आले नसताल ! आतां तिचा नवरा वयानें जास्त-- आणि दुसऱ्या लग्नाची बायको ह्मणून लोकांस जीभ सैर सोडण्यास हवीतशी संधि मिळाली. खरें ना मी ह्मणतों हें ? "

" माझें स्वत:चें कुठें तसं मत आहे ? ते लोकांचे मत जी ज्याला भेटे त्यानेंच तिचा खून केला असावा असें आपलें माझें नुमत अनुमान आहे. पण त्या माणसाशीं तिचा वाईटबरा संबंध असलाच पाहिजे असें कांहीं मी ठासून सांगत नाहीं. "

" तसें जर असेल तर पोलीसनीं चौकशी केल्यावर कांहीं तरी सुगावा लावला असता. त्यांनीं या प्रकरणाकडे डोळेझाक केली हें बरें नाहीं झालें. असो. कसेहि झालें तरी बिचारी लोकांच्या चर्चेचा विषय होऊन गेली. फार वाईट झालें. तिच्या आईनें बोलावल्यावरून मी एकदा तिला औषध द्यावयास स्वत:च जाणार होतों. पण तूं स्वत: ह्मटलें तिची काळजी घेत असतील. एक दोनदां तूं माझ्याकडे गोष्ट काढली होतीस ना तिच्या आजारीपणाची ? "

" होय, पण तुह्मी त्या वेळीं घाईत होतां कसल्या तरी. ह्मणून मीच तिला एक दोनदां साधारण अशक्तता व काळजी दूर होण्याकरितां डोस देऊन काळजी दूर करण्याकरिता दूर फिरावयास जाण्याचा वगैरे सल्ला दिला होता. "

डॉक्टर त्याचसंबंधींच्या कसल्या तरी विचारांत गर्क होऊन समोरील हिरव्या भिंतीकडे पाहत बसले होते. मी क्लॉककडे पाहून म्हटलें,—

" आपला बोरीवलीस जाण्याचा वेळ झाला नाही ? "

" नाहीं ! आज मी येथेंच राहणार आहें. ती मागल्या खेपेस आलेली राज घराण्यांतली स्त्री आतां चांगली सुधारली असून त्यांच्याकडून आज ताज-महाल हॉटेलमध्यें जेवण्यास येण्याकरितां आग्रहाचें निमंत्रण आहे, तेव्हां

तिकडे मला मोठ्या नाइलाजानें गेलें पाहिजे. आजचा दिवस मी मुंबईंतच काढणार आहे. मी असलीं आमंत्रणें बहुतेक कधीं पत्करीतच नाहीं. आणि आता मला हा डॉक्टरीचा त्रासहि झेपत नाहीं आमची कांहीं सरकारी नोकरी नाहीं कीं आपली वीस पंचवीस वर्षें सुखानें संपल्यावर बसतो आहे खात पेनशन्. आतां पुढें शिलकीवर सगळा कारभार. पण तो पूर्वींच्याप्रमाणें थाटांत चालला पाहिजे. पूर्वींचे ओळखीचे जुने स्नेही वगैरे यावयाचे जावयाचे; त्यांच्या इतमामाप्रमाणें त्यांची तरतूद तर ठेवली पाहिजे ? तेव्हां उत्पन्न बंद आणि खर्च मात्र पूर्वींप्रमाणेंच. तेव्हां पुढें चालणार कसें या काळजींत मी असतों मोहन, आतांशा काय समजलास ? असलीं जेवणाखाणाचीं श्रीमंती आमंत्रणें आणि नाटकाफाटकाचीं जामणें आतां मला बिलकूल सोसत नाहींत. परंतु धंदास पडला तेव्हां श्रीमंत गिऱ्हाइकांची भीडहि मोडतां नये. तुला हें मी सर्व कां सांगतों ? डॉक्टरीच्या धंद्याचें मर्म तुला कळलें पाहिजे."

खरोखरच डॉक्टरसाहेबांनीं आपलें ब्रम्हचर्याचें आयुष्य घालविलें होतें. बायको ना बिऱ्हाड ! आगा नाहीं पिछा! तारुण्यांत त्यांना सामाजिक आनंदाच्या गोष्टींत भाग घ्यावासा तरी वाटे हल्लीं तर आतां तोहि हळूहळू सुटून आतां डॉक्टरसाहेब बहुतेक समाजापासून होतां होईल तों दोन पावलें दूर राहावयास शिकत होते याच हेतूनें त्यांनीं आपलें ठाणें बोरीवलीस केलें होतें. केव्हां केव्हां ते बुद्ध योग्यासारखें लेण्यांत एकांतवासांत पडून राहणेंच चांगलें असेंहि म्हणत. कदाचित् याच हेतूनें त्यांनीं लेण्याजवळच आपला आश्रम आणला असावा. डॉक्टरसाहेब हे प्रख्यात पुरुष होते आणि थोर लोकांचे स्वाभाविक परंतु क्षुल्लक दोष म्हणजे लहरीपणा हा देखिल त्यांच्या ठिकाणीं होता.

पुढचे दोन दिवस विशेष कांहीं सांगण्यासारखें घडल्याशिवाय असे तसेच गेले. दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं संजीवन आला. आला तो आंग टाकून हुश्श् करून आरामखुर्चीत पडला. तो अगदीं श्रमून गेला होता. मी त्याला खूप प्रश्न विचारले. पण कशाचेंच उत्तर न देतां तो टोपी ठेवून कसल्याशा विचारांत गढून गेला आणि ग्लानीमळें तेथेंच झोंपी गेला.

थोडया वेळानें मी शेजारच्या दुकानांतून फराळाचें मागविलें. आणि तोंड धुवावयास पाणी व पुसावयास टॉवेल जवळच ठेवून त्याला उठविलें.

त्यानें डोळे उघडिले. पण ते लालबुंद झालेले दिसले. यावरून सबंध दिवस सबंध रात्र त्यानें जागरण केलें होतें हें मीं पक्कं ओळखिलें. तो म्हणाला—

" माझें मस्तक भोंवळल्यासारखें होत आहे."

शेवटीं पुढयांत आलेल्या जिनसांचा समाचार आगोदर घेण्यासाठीं मी सूचविल्यावरून तो तोंड धुवून येऊन बसला. समोरचीं डिशिस् रिकामीं केलीं. कॉफीचे कप्सहि रिकामे झाले. आतां त्याला थोडीशी हुशारी आली. पण झोंपेची आवश्यकता होती.तरीहि मीं विचारलें—"कांहीं नवीन सांगण्यासारखें?"

तो प्रथम उत्तर देण्यास कांकूं करूं लागला. पण नंतर म्हणाला—

" होय—आ—हें सांगण्यासारखें, " पण पुन्हा निश्चय बदलून म्हणाला—" पण मला प्रथम कस्तुरला भेटलें पाहिजे आहे. "

" म्हणजे ? " मी विस्मयानें विचारलें.

" म्हणजे बिणजे कांहीं नाहीं. फार जरूरीचें—निकडीचें काम आहे अगदीं. मला तिला एक दोन प्रश्न विचारावयाचे आहेत. "

" कां तिच्याबद्दल कांहीं पुन्हा संशय येतो कीं काय तुला ? "

त्यानें उत्तर दिलें नाहीं. मी त्याला भेटविण्याचें आश्वासन दिलें. मला वास्तविक कस्तूरच्या मनास त्रास देण्याचें जिवावर आलें होतें. परंतु संजीवनाला तर तिला भेटण्याची जरूरीच दिसली. ती निरपराधी होती याबद्दल मला शंकाच नव्हती. अनुदारपणामुळें ती स्वतःच्या रक्षणाकरितां कांहीं बोलत नव्हती; पण संजीवननें अखेरीस आणखी हें काय उपस्थित केलें नवीनच संकट ? त्याला

# प्रकरण २६ वें.

## डॉक्टर सॉल्टवॉटर.

दुसऱ्या दिवशीं पुन्हा मला संजीवन भेटला. त्या दिवशीं त्यांनें मागें मला दिलेलें वचन पूर्ण करण्याचें कळविलें. मला बरोबर घेऊन आल्यास तो तयार झाला. पण त्याच्या या वचनाला किती मिनीटांचें आयुष्य होतें हें मला ठाऊक नव्हतें. लहरीस आले तर तो मधूनच आमची रवानगी करून यावयाचा ! पण त्यानें हातीं घेतलेलें काम, त्याची जबाबदारी व त्याचा स्वभाव हीं मला माहीत असल्यामुळें त्याच्या असल्या वर्तणुकीबद्दल मला कधींहि राग आला नाहीं, कीं आमच्या मैत्रींत अंतर पडलें नाहीं. नाहीं तर मजकडच्या गोष्टी मोठ्या कौशल्यानें काढून घेऊन आपल्या मनांतलें मात्र कांहींच कळवावयाचें नाहीं; अशा वर्तनानें ज्याची समतोल बुद्धि नाहीं असा दुसरा एखादा स्वयंमन्य मित्र असता तर तो पुढे त्याच्याशीं मोकळ्या मनानें वागला नसता; व त्यालाच त्यानें स्वार्थी ठरविलें असतें. मित्राशीं व्यवहार मोठा सांभाळून करावयाचा असतो. आयुष्यांत निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळे मित्र असतात. पण एकमेकांचें मन पारखल्यावांचून केलेली मैत्री फारशी टिकत नाहीं असा याचा अर्थ नव्हे. कारण मैत्री बहुतकरून प्रसंगोपातच होत असते. परंतु दिलजमाई होणें व ती तशीच आजन्म कायम राहणें याला उभयपक्षीं सरळ मनाची आवश्यकता आहे. वारंवार पत्रांवर पत्रें पाठविल्यानें व तीं नाटकी व काव्यमय भाषेंत मित्रप्रेमाच्या अतिशयोक्तीनें भरलेलीं असलीं म्हणजे मैत्री दुणावते असें तर मुळीच नाहीं परंतु अशीहि कित्येकांची अपेक्षा असते. असले मित्र आपणास भावनाप्रधान (Sentimentalist) म्हणवतात पण ते स्वतः स्वयंमन्य असतात हेंच खरें. कित्येक स्वतः आपल्या मित्रास मोठेंसें महत्व न देतां त्यानें मात्र आपणास जीवश्चकंठश्च मित्र मानावें अशी अपेक्षा करितात व तसें त्याच्याकडून वर्तन घडलें नाही तर त्याला आपल्या मैत्रींत घ्यावयास गैरलायक ठरवितात. पण या सर्व स्वयंमन्य मित्रांला मैत्रीचें

पावित्र्य, मैत्रीचा निःस्वार्थीपणा व प्रामाणिक मित्राचें मन यांची पूर्णपणें ओळख नसते. बाहेरून एखादा माणूस आपणाविषयीं उदास दिसेल व आपल्यावरचें मित्रप्रेम त्याला बाह्य साधनांनीं प्रदर्शितहि करतां येणें शक्य नसेल, तरी देखिल त्याचें अंतःकरण मित्रप्रेमानें ओथंबलेलें असणें असंभवनीय नाहीं. अशा मित्राची परीक्षा पाहिजे तर संकटाच्या वेळीं—जरूर असेल तर संकटाची बतावणी करून देखिल—घ्यावी व आपलें काय तें मत ठरवावें. तसें न करतां केवळ स्वतःच्या गैरसमजुतीनें आपल्यावर निष्कपट प्रेम करणाऱ्या किंवा मैत्रीचें प्रदर्शन करण्याची कला अंगीं नसलेल्या प्रामाणिक मित्रास तो " आमच्यासारख्यांच्या मैत्रीस नालायक" असा ग्रह प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष, उघड अथवा प्रच्छन्न रीतीनें करून त्याच्या हृदयाला दुःखाच्या संवेदना होतील असें करूं नये हें बरें. तात्पर्य काय कीं, आमची दोघांची मैत्री असल्या बाष्कळ समजुतींवर उभारली गेली नव्हती. मी परदेशाहून आल्यानंतर एका प्रसंगानें संजीवनची व माझी मैत्री जडली. त्या प्रसंगाची आणखी भर या कथानकांत घालून तें लांबविणें मला प्रशस्त दिसत नाहीं. आमची मैत्री जन्मापासूनची होती अशांतलाहि भाग नाहीं. पण आम्ही दोघांनीं एकमेकांचीं हृदयें ओळखलीं होतीं व म्हणूनच एकमेकांचा गैरसमज होण्यासारखें कांहीं होत नसे, व झालेंच तर तेंच मनांत घेऊन कुजवीत न बसतां एकमेकांस प्रत्यक्ष विचारून आम्ही दिलसफाई करून घेत असूं. आम्हाला त्याकरितां तिसऱ्या एखाद्या (mutual) मित्राकडे तिऱ्हाइतीकरितां तें प्रकरण नेण्याची कधींच पाळी आली नाहीं. असें नसतें तर संजीवनच्या वर्तणुकीनें मला कधींच तो अप्रामाणिक, स्वार्थी, आपलपोट्या, एकलकोंड्या, कार्यसाधू, असा वाटला असता व आमची मैत्री इतर कित्येक मित्रांप्रमाणें पाण्यावरच्या बुडबुड्यासारखी क्षणार्धांत फुटून गेली असती !

एवंच प्रसंग आलाच तर परत मागें जाण्याची मनांत तयारी करूनच मी त्याच्याबरोबर जावयास सिद्ध झालों. मी त्याच्या मागून त्या दिवशीं खूपच फिरलों. तो प्रथम—आमच्या दवाखान्यांतून निघाला तो मेडोजस्ट्रीटवर तारापुरवाल्याच्या स्टुडिओंत शिरला. तेथले कांहीं फोटोग्रॅफ्स् पाहून तो पुढें गेला.

त्या दिवशीं त्यानें मुंबईच्या निरनिराळ्या भागांतल्या निरनिराळ्या फोटोग्राफ-रांच्या स्टुडिओंत खेपा घातल्या. नंतर शेवटीं नळबाजारांतून फिरत पायधुणीवरून पुन्हा भायखळ्यापासून नागपाड्याच्या एका कोपऱ्यांत लहानशा एक घरपाशीं तो आला. आमचें हें फिरणें केव्हां पायांनीं, केव्हां ट्रॅममधून तर केव्हां विक्टोरियांतून असें चाललें होतें. रोजचा जर त्याचा असाच क्रम असेल तर मला तो बरोबर नेत नाहीं तेंच बरें असेंहि मला वाटलें मी इतक्यांतच थकून गेलों. त्या घराचा मालक संजीवनला पाहतांक्षणींच पुढें आला. तें घर म्हणण्यापेक्षां तें एक लहानसें दुकानच होतें. तो दुकानदार किराणा जिनसांचा विड्या आगपेट्या, सोडा लेमोनेड, व पानविडे असल्या जिनसांचा व्यापारी होता. दिसण्यांत तो किडकिडीतच दिसला.

" कसें काय शेट ! गर्दीत आहां वाटतें ? " संजीवननें सलामी दिली.

" छे ! कसली घाई ? व्यापाराचें आमचें हें असलेंच किरकोळ धंदेवाल्यांचें."

माझ्याजवळून दूर होऊन संजीवन त्याच्या अगदीं जवळ जाऊन उभा राहिला. माझ्याकडे पाठमोरा होऊन त्यानें आपल्या जाकिटाच्या खिशांतून कांहींसें काढून त्या दुकानदाराला दाखविलें.

" हो ! हो. बरोबर--अगदीं बरोबर. त्यांत मुळींच शंका नको. " असे त्या दुकानदाराचे उद्गार मला ऐकूं आले.

नंतर संजीवननें हळूं विचारलेल्या प्रश्नास त्याच्याकडून खालील उत्तर मिळालें.

" तो ग्रँट्रोडवरच्या सॅलूनमध्यें आतां काम करीत असतो. त्यानें पूर्वीचें काम सोडलें. हा त्याचा नवा धनी श्रीमंत असून त्याचें सलूनहि साहेब लोकांस-देखिल आवडतें. कोटांतलीं वकील्स सोडून देखिल लोक त्याच्याकडे येतात. तिथेंच तो हल्लीं असतो. आपणाला तिथें जास्त माहिती मिळेल. मी नेहमींच सावध असतों ! " असें म्हणून त्यानें डोळे मिचकावले.

ह्या माणसाला मीं पूर्वीं केव्हां तरी पाहिल्यासारखें वाटलें; कुठें कोणास ठाऊक; पण चेहरा ओळखीचा दिसला.

तिथून आम्ही ग्रँटरोडकडे जात असतां वाटेंत मी त्या दुकानदाराबद्दल माहिती संजीवनला विचारली.

" त्या माणसाला आमच्या सध्यांच्या प्रकरणांतील कांहीं माहिती आहे " असें मोघमच त्यानें उत्तर दिलें. इतक्यांत जवळून रिकामी चाललेली, व्हिक्टोरिया बोलावून त्यांत बसून आम्ही निघालों.

ग्रँटरोडवरच्या इष्ट सलूनजवळ गाडी आल्याबरोबर सलूनच्या मालकाला त्याच्या असिस्टंटला भेटण्याची इच्छा दर्शवितांच सलूनमधल्या एका बाजूच्या दालनांत लगेच आपला पोशाख बदलून संजीवनाला हवा असलेला तो माणूस आला. संजीवननें त्याला ज्या ठिकाणीं तो पूर्वी नोकरीस राहत होता त्या ठिकाणची माहिती विचारली. आणि खिशांतून एक फोटो काढून ह्या माणसाची कधीं हजामत केली आहेस कीं काय ह्मणून त्यानें विचारलें.

त्यानें ताबडतोब "होय" ह्मणून उत्तर दिलें. तो पुढें ह्मणाला—

"अहो ! हें तर आमचें नेहमींचें गिऱ्हाईक. तिकडे असताना हे आमच्या दुकानांत केव्हां केव्हां येत असत व इकडे तर बहुतेक नेहमीच येतात. येथें आमचे मालकच स्वतः त्यांना घेतात. आमच्यावर त्यांचें काम सोपवीत नाहींत यांचें नांव 'रणछोडदास !' गुजराथी असून यांना मराठी देखिल उत्तम बोलतां येतें."

" काय ह्मटलेंस नांव त्याचें ? रणछोडदास ? आणि आडनांव ? "

" आडनांव माझ्या लक्ष्यांत नाही. 'पटेल' अथवा 'देसाई' कांहीं तरी असावें ! "

संजीवन तेथून बाहेर पडला. "रणछोडदास ! रणछोडदास !" असें मनांत घोळवीत तो चालला होता. "हेंच नांव मी आज इतके दिवस शोधीत होतो तें. जर मला या कामीं यश आलें तर ह्या सर्व रहस्याचा मोठ्या गमतीनें निकाल होईल मोहन ! " तो मागें वळून म्हणाला, " आतां यापुढें मला एकट्यालाच गेलें पाहिजे. कारण ज्याला भेटावयास मी आतां जात आहें त्यानें माझ्याबरोबर जर दुसऱ्या इसमास पाहिलें तर माझ्याबरोबर बोलावयास त्याला संकोच

वाटल व आपल्याला तर आतां खरी गोष्ट हुडकून काढावयाची आहे. माझा बहुतेक कारभार आतां अगदीं रंगास आला आहे. आतां आपणाकडून जरा देखिल हयगई होऊं देतां कामा नये. या इसमाकडून फारच महत्त्वाची बातमी कळणार आहे. तूं येथेंच बाहेर उभा राहा. मी लवकरच बाहेर पडतों. तुला असें मी वारंवार सांगतों ह्मणून कांहीं वाटत नाहीं ना ?" पुढें जातां जातां त्यानें मला ह्मटलें मी नकारार्थी मान हालविली ती पाहण्यास मागेंहि न वळतां बॅांबे थिएटरकडच्या एका सलूनबारमध्यें तो घुसला. सुमारें अर्ध्या तासानंतर तो बाहेर आला. हा अर्धा तास रस्त्यावर मला फार कंटाळवाणा गेला. परंतु बाहेर आल्यावर त्याचा चेहरा नवीन वेशानें प्रफुल्लित झालेला दिसला. त्याला पाहिजे होती ती माहिती मिळाली असावी.

नंतर त्यानें मला परतावयास सांगून आपण एकटाच पुढें निघाला.

"आज मला आणखी कांहीं हकीगत समजणार आहे. माझे शोध पुरे होण्याच्या रंगास आले आहेत." तो हंसत ह्मणाला. "मी तुला लवकरच येऊन भेटेन."

ट्रॅममध्यें बसून तो दिसेनासा झाला. खरोखरच मोठा विचित्र माणूस ! इथें रिच, तिथें घूस अशा हजार भानगडींची करीत बिनबोभाट त्या कानाची बातमी त्या कानास लागूं न देतां तो आपला मार्ग काढीत होता.

अजमासें दोन तासांनीं तो परत आला. त्यानें आपला पोषाख सगळा बद-लला होता. कृत्रिम रंगानें त्यानें आपला चेहरा पालटला होता. त्यामुळें त्याच्या वयांत इतकें अंतर पडलें होतें कीं, तो सुमारें दहा वर्षांनीं वयानें जास्त दिसत होता.

"काय नवीन माहिती ?" मी त्याला विचारलें.

"माहिती खूबच खूब आणि अतिशय चमत्कारिक. आतां माझ्याबरोबर येशील तर मी तुला गंमत दाखवीन."

"येशील तर ! तुझ्या पुढेंच दोन पावलें मी आहें ह्मणून समज ! तुझ्या परवानगीचीच काय ती खोटी !"

वास्तविक तो श्रमानें थकून गेला होता. परंतु रंगाने मात्र गालांवर बरीच तुकतुकी दिसत होती. आइस्क्रीम व कोल्ड्‌ड्रिंक मागवून फराळ घेतल्यावर त्याला जराशी हुषारी आली. नंतर कांहीं वेळ तो विचार करीत बसला. नंतर समोर-च्या मोठ्या आरशांत पाहून आपला पोषाख नीट साफसूफ केला. आज तो नवीन बूट घालून आला होता. बाहेरून ऐट तर खूपच आणली होती. परंतु खरें पाहतां त्याला फार थकवा आला होता. पोषाख नीट तपासून पाहिल्यावर त्यानें बाहेर पडण्यास मला खूण केली. कुठें आणि काय तें मला त्याने मुळींच कळविलें नाहीं. मात्र एकवार त्यानें खिशांतून एक हँडबिल काढून वाचलें होतें. मी तें ओझरतेंसें पाहिलें. तें एका लेक्चरबद्दल होतें. मी आतापर्यंत पोषाख घालून तयार झालोंच होतों. आम्ही ट्राममधून न निघतां एक व्हिक्टोरिया बोलावून सजीवननें त्यास जलद चालवावयास सांगितलें.

लवकरच आम्ही मेडिकल कॉलेजकडे येऊन दाखल झालों.

संजीवननें दोन तिकिटें दाखविल्याबरोबर आम्ही जे. जे. हॉस्पिटलच्या हॉल-मध्यें जमलेल्या मंडळींत शिरलों. साधारण दर्जाच्या मंडळींतच आम्ही बसलों. प्लॅटफॉर्मच्या एका टोंकाला, आंखुडशी दाढी असलेला, घाऱ्या डोळ्याचा, चपळ व तीक्ष्ण दृष्टीचा, गंभीर चेहऱ्याचा व मध्यम वयाचा असा गृहस्थ बसला होता. त्याच्याच शेजारीं पांढऱ्या केसांचा, जरा उतारवयाचा असा दुसरा एक डॉक्टरी पेशाचाच गृहस्थ बसला होता.

आम्ही गेलों तोंच कार्यक्रमाला सुरवात होत होती. तो उतारवयाचा गृहस्थ उठला आणि म्हणाला—

सभ्य गृहस्थ व सभ्य स्त्रियांनो—

ग्रेटब्रिटन् व अमेरिकेंत प्रसिद्ध असलेले डॉक्टर आणि प्रोफेसर सॉल्टवॉटर यांचा तुम्हाला आज परिचय करून देण्यास मला फार आनंद होत आहे. त्यांचीं पुस्तकें आपणांपैकीं बहुतेकांनीं निदान डॉक्टरी पेशांत असलेल्यांनीं तरी वाचलीं असतीलच. वैद्यकीच्या ज्या भागाचा त्यांनीं स्वतंत्र अभ्यास केला आहे व जे शोध लावले आहेत, ते अद्याप इकडे उपलब्ध नसल्यामुळें मी व

माझ्या इतर स्नेही डॉक्टर मंडळींनी त्यांना आमंत्रण देऊन बोलाविलें आहे. कॉलेजच्या विद्यार्थ्यांनींहि त्यांना बोलावण्यांत फार उत्सुकता व कळकळ दाखविली होती. तथापि हें व्याख्यान नुसत्या डॉक्टरी पेशाच्या लोकांकरितां न करतां मुद्दाम जाहीर व्याख्यान केलें आहे, याचें कारण सर्वांस त्याचा फायदा घेतां यावा हेंच होय."

नंतर त्यानीं थोडक्यांत व्याख्यानाचा विषय व व्याख्यात्यांचा थोडा परिचय करून देऊन व्याख्यात्यांस बोलावयास उठण्याविषयीं विनंति केली व टाळ्यांच्या गजरांत ते बसले आणि व्याख्याते उठले. हें सर्व काम इंग्लिशमध्येच चाललें होतें हें निराळें लिहावयास नकोच.

डॉक्टर सॉल्टवॉटर हे स्नायुसंबंधीच्या रोगावरचे पहिलेच जगविख्यात डॉक्टर असल्याचें ठाऊक होतेंच त्यांच्या व्याख्यानानी जगांत चळवळ उडवून दिली होती. मीहि त्यांची बहुतेक पुस्तकें वाचलीं होतीं. त्यामुळें मी त्यांचें व्याख्यान ऐकावयास अगदीं तयार झालों. Nervous Disorders वरचे त्यांचे शोध आह्मी कित्येक दिवस ऐकत होतों. त्यांनीं त्या शोधपरंपरेचा व प्रयोगांचा सर्व पूर्वेतिहास कथन केला आणि नंतर प्रत्यक्ष प्रयोगास सुरवात केली.

सुमारें वीस बावीस वर्षांची एक स्त्री—दिसण्यांत सुस्वरूप कांहीं ह्मणता येण्यासारखी नव्हती—पुढें आणून खुर्चीवर बसविण्यांत आली. मध्यम स्थितींतल्या गरीब कुटुंबांतली ही स्त्री असावी. बाहेर येण्याबरोबर प्रथम तिनें श्रोतृवृंदाकडे नजर फेंकली आणि नंतर ती डॉक्टर व्याख्यात्यांकडे वळून बसली डॉक्टरनीं आपली खुर्ची तिच्या शेजारीं नेली.

डॉक्टरनीं लोकांना प्रथम तिच्या रोगाची भावना सांगितली. तिचे दोन्ही डोळे शाबूत असून पाहण्याचें काम मात्र एकच डोळा करीत असे. या प्रकाराला वैद्यकांत "Hemianopsil" असे ह्मणतात. ह्या प्रकारानें कित्येक भिषग्वरांस कोडें घातलें होतें; तेव्हां सर्वजण लक्ष देऊन तो प्रयोग पाहूं लागले.

डॉक्टरनीं प्रथम तिला समोर आपल्याकडे पाहण्यास सांगून तिच्या मस्तकाच्या डावेबाजूस अजमासें कानाच्या जवळ एक पेन्सिल धरली, आणि

आणणा सर्वांप्रमाणें डोळ्याचे बुबुळ न हालवितां तिला तिथें पेन्सिल असल्याचे ओळखतां येतें असें व्याख्यात्यांच्या निदर्शनास आलें. नंतर त्यांनीं तोच प्रयोग तिच्या मस्तकाच्या उजवे बाजूस केला. परंतु तिनें आपल्याला ती पेन्सिल दिसत नसल्याचे स्वतःच स्पष्ट मोठ्यानें कबूल केलें त्यांनी ती पेन्सिल मागें पुढें सरकवून पाहिली, तरी आपल्याला दिसत नसल्याचें ती स्त्री सांगत होती. तथापि समोर पाहण्याची शक्ति त्या स्त्रीच्या त्या एका डोळ्यांत होती हें त्यांनीं सिद्ध करून दाखविलें. आणि आपल्याकडच्या डॉक्टरी यंत्रांनीं ( Glass Hemisphere वगैरे ) तिची दृष्टि दुसऱ्या बाजूस कुठपर्यंत पोंचते तें बरोबर मापून सांगितलें.

नंतर व्याख्यात्यांनीं तिला जावयास सांगून आंत निजून राहावयास सांगितले.

नंतर त्यांनीं वरील प्रयोगाचें स्पष्टीकरण केलें. त्यांत स्नायूसंबंधींची ह्मणजे पाठीच्या कण्याच्या आरंभापासून तों तहत मेंदूच्या आवरणापर्यंत स्नायूंचा कसकसा संबंध आहे याबद्दलची माहिती देऊन त्या मेंदूच्या आवरणापाशींच तिला इजा झालेली आहे असें प्रतिपादिलें. हें त्यांचें विवरण इतके उघड होते कीं, तें डॉक्टरोचा अभ्यास न करणाऱ्या इतर लोकांला चांगलें समजलें.

दुसरी केस् होती हिस्टेरियाची. या बाबतींत देखिल पुष्कळ डॉक्टर हात टेंकतात ! हा रोग फेंफऱ्यासारखा असून तो पुरुषांपेक्षां स्त्रियांसच अधिक होतो. ह्या स्त्रीबरोबर तिची आई आली होती. हिचा पोषाख नीटनेटका असून ही कुलीन् घराण्यांतील असावी असें मुद्रेवरून दिसत होतें. तिला पुढें आणली. पण तिचे दोन्ही हात कांपत होते. तिला व्याख्यात्यांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें ती कशींतरी अडखळत अडखळत देत होती. हिच्या रोगाची भावना ह्मणजे सदांचा कपाळशूळ, वारंवार अकस्मात् झीट येऊन लांकूड होऊन पडणें, डाव्या हाताचें स्पर्शज्ञान अजीबात नाहींसें झालें होतें ! कांहीं प्रश्नांचीं उत्तरें तिला देतां येईनात. शेवटीं व्याख्यात्यांनीं जेव्हां तुझा बाप कोठें आहे व काय करतो ? ह्मणून विचारलें, तेव्हां तिनें " गेले हो ! माझे बाबा ! " असें ह्मणून

मोठ्यानें किंकाळी मारली व मोठ्यामोठ्यानें रडूं लागली. नंतर त्यांनीं एक स्पर्शयंत्र ( Anthropometric instrument ) घेऊन त्यानें तिच्या संवेदनाहीन हाताला स्पर्श केला.

त्याबरोबर " अगबाई ग माझ्या हाताला काय धरतां हो ? " असें तिनें भिऊन विचारलें ! नंतर व्याख्यात्यांनीं तिला बोलण्यांत दुसरीकडे गुंतवून तिकडे तिचें लक्ष पूर्णपणें वेधलें आहे असें पाहतांच त्याच यंत्रानें तिला नकळत तिच्या हाताला स्पर्श केला. त्याबरोबर तिनें चट्कन् आपला हात मागें ओढून घेऊन दुःखाची एक आरोळी मारली. त्यावरून व्याख्यात्यांनीं ताडलें कीं स्पर्श ज्ञानरहितपणाचा उगम देखिल त्या हिस्टेरियांत आहे.

हा प्रयोग झाल्यावर ह्याचेंहि त्यांनीं स्पष्टीकरण केलें आणि सांगितलें कीं, हा रोगसुद्धां कांहीं एका पद्धतीनें खात्रीनें बरा करितां येईल. ती पद्धत मात्र त्याच ठिकाणीं त्याच वेळीं सर्वांस समजून सांगण्यासारखी नव्हती.

नंतर हिस्टेरियाची आणखी एक केस आली. आणि तिच्यामागून अस्कळीत विस्कळीत केस झालेली अशी एक विलक्षण स्त्री पुढें आणण्यांत आली. तिची भावना व्याख्यात्यांनीं " Crise des nerfs " शब्दांनीं केली त्या भावनेंचे लक्षण एकच होतें कीं, तिनें नेहमीं पिशाचबाधा होऊन आंगांत आल्याप्रमाणें सर्वांगाला आळे पिळे घ्यावे आणि नाना प्रकार करावे ! तिनें पुढें बोलावतांक्षणीं आपण होऊनच अशा रीतीनें उडी मारली कीं ती आपल्या पाठीवर पडली, पण तिला त्याबद्दल कांही वाटल्याचें चिन्ह दिसलें नाहीं. नंतर तिनें तालमी पोऱ्याप्रमाणें कमान टाकल्याप्रमाणें आपलें सर्वांग नुसत्या मस्तकावर व पायांच्या आंगठ्यावर तोलून उचलून धरलें; आणि तशा स्थितींतहि नीट राहून आसपास येणाऱ्यास पायांच्या आंगठ्यानीं नव्हे तर मग मागल्या टांचांनीं लाथाळीचा प्रसाद मनमुराद द्यावयास सुरवात केली. इतकें करीत असतां तिचा चेहरा अगदीं काळा ठिक्कर पडून गेला.

हें सर्व त्या स्त्रीचे विचित्र प्रकार पाहून प्रेक्षकवर्गाला कंटाळा येऊन गेला होता, पण हें ओळखून तेवढ्यांतच व्याख्यात्यांनीं तिला मोठ्या शिताफीनें

एकदांची मागें सारली आणि तिच्या जागीं दुसरी एक किडकिडीत, किंचित् पिंगट केसांची व सर्वांच्याहून आंगावरील वस्त्र विशेष झकपक असलेली व सभ्य दिसणारी अशी एक स्त्री पुढें आणण्यांत आली. ती पुढें आल्याबरोबर तिनें सर्वांकडे अशा नजरेनें पाहिलें कीं, आसपास कोणी लोक बसले आहेत याचें तिला ज्ञानच नसावें. तिच्या बरोबर तिची आजी आली होती.

इतक्यांत अध्यक्ष उठून उभे राहिले आणि म्हणाले—

"ही केस नवीन, अत्यंत विलक्षण व फारच महत्वाची असून तिच्या भावनेची चिकित्सा व निदान अत्यंत परिश्रमपूर्वक आपल्या सर्वांच्या पूर्ण परिचयाचे व माझे परममित्र डॉक्टर मिस्टर नियोगी यांनीं केलेलें असल्यामुळें आपल्याला हिच्यांत अधिक औत्सुक्य उत्पन्न होणारें आहे"

डॉ. नियोगींचा नामनिर्देश होतांच मला मोठें आश्चर्य वाटलें त्यांचें आजच्या कार्यक्रमांत आंग होतें तर मला कसें कांहींच कळलें नाहीं ? शिवाय असल्या विलक्षण केसीसमध्यें त्यांनीं अझून लक्षपूर्वक अभ्यास चालविला होता हें मला देखिल ठाऊक नव्हतें.

"डॉ. नियोगी आमच्या खास परंतु तांतडीच्या व आयत्या वेळीं केलेल्या आमंत्रणावरून येथें आलेले आहेत. तेव्हां आतां त्यांना मी ही केस आपल्यापुढें मांडण्यास विनंति करितों" अध्यक्ष बोलले.

बरून आपली पुढें येण्याची नापसंती दर्शवीत लोकलज्यात डॉक्टर नियोगी स्टेजवर आले. डॉ. सॉल्टरॉटरनीं त्यांना हस्तांदोलनानें अभिवादन केलें. नंतर डॉ. नियोगींनी आपली चष्म्याची फ्रेम डोळ्यांवर नीट नेटकी बसवून त्यांनीं विषयास सुरवात केली.

डॉ. नियोगी तेथें तयार होतील व पुढें येतील अशी अपेक्षा नव्हती. परंतु मी संजीवनकडे पाहतो तों भविष्यवाद्यानें आपलें भविष्य खरें ठरलेलें पाहून जशी मुद्रा करावी तशा मुद्रेनें तो एकंदर प्रकाराकडे प्रसन्नतेनें पाहत होता. आम्ही दोघे गर्दींत अगदीं दूर अंतरावर बसलों होतों. व डॉ. नियोगी यांना

लांबचें स्पष्ट दिसत नसल्यामुळें (Shortsighted) त्यांना आम्हाला ओळखतां येण्यासारखें नव्हतें.

" आतांच डॉक्टर डिसोझा यांनीं सांगितल्याप्रमाणें त्यांनीं अगदीं आयत्या वेळीं दिलेलें आमंत्रण स्वीकारून आमचे विद्वान् भिषग्वर्य डॉ. सॉल्ट्वॅाटर यांस भेटण्याकरितां मी तांतडीनें आल्यामुळ व्याख्यानाची पूर्व तयारी मला करतां आली नाहीं, याबद्दल मला दिलगिरी वाटते."

डॉक्टर नियोगींनीं असें प्रास्ताविक भाषण करून केस घेऊन प्रयोग करण्यास सुरवात केली. त्यांनीं बोलून दाखविलें कीं, सर्व देशांतील सर्व डॉक्टरांस वाटतें तशी ही केस कांहीं फार महत्वाची नाहीं.

डॉक्टर नियोगींच्या खुर्चीच्या मागें त्या बाईची आजी बसली होती व तिला विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें ती म्हातारीच देत होती, कारण ती बाई मुकी होती. डॉ. नियोगींनीं त्या बाईच्या रोगाची भावना ठरविली ती अशी होती. तिच्या स्वतःच्या इच्छाशक्तीचा अभाव होता. तिला थोडेसे प्रश्न करून त्यांच्या द्वारें त्या बाईचा पूर्वेतिहास प्रश्नोत्तर रूपानें त्यांनीं श्रोत्यांस समजावून दिला. तो फारच हृदयद्रावक होता. तिचा बाप दारुड्या होता आणि आईला रक्तपित्ती झाली होती. अज्ञान मैत्रिणींच्या थट्टेतल्या गोष्टींनीं सुमारें तेराव्या वर्षाच्या सुमारास त्या मुलीनें मनांत भीति घेतली व त्यामुळें तिला धडकी भरली! त्यामुळें तिला नकळत भयाचें भूत तिच्या पाठीमागें लागलें! त्याचा परिणाम असा झाला कीं, तिनें एकदम अन्न वर्ज केलें! परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं, ती एकांतांत कोणाची जागमाग नसेल तर अन्न खाते. ती कोणा देखत बोलत चालत नाहीं व पराकाष्ठेचें दुःख अथवा आनंद शारीरिक अथवा मानसिक असलें तरी तिच्यावर त्याचा कांहीं परिणाम होत नाही! ती एक ब्रह्मि उच्चारीत नाहीं. तरी ती कोणी आसपास नाहीं अशी तिचीं खात्री होईल तर मात्र ती बोलेल!

" हल्लींच माझ्या शोधांवरून ज्या गोष्टी माझ्या दृष्टोत्पत्तीस आल्या आहेत," डॉ. नियोगी म्हणाले, " त्यांवरून पाहतां या सर्व विचित्र प्रकारांचें मळ

स्वतःच्या इच्छाशक्तीच्या अभावावर आहे. माझें डॉक्टर मित्रमंडळ व त्याच-प्रमाणें विद्वद्वर्य डॉ. सॉल्ट्‌वॉटर यांनाहि अभिमत होईल कीं, ज्या वयास ह्या बाईला ही भीति जडली त्याच्याच अजमासें—चार दोन वर्षांच्या फरकानें देखिल—कांहीं तरी भयंकर कारण उपस्थित झाल्यास ही भावना स्त्रियांस जडते. धडकी, भीति, भयंकर प्रकार असलीं या विकाराला उत्पादक कारणें लागतात. ही भावना जडली कीं रोजचीं नैसर्गिक कृत्यें करावयासहि त्या माण-साला मग भीति वाटू लागते. तीं वेडीं नसतात, पण बोलणें चालणें, खाणे पिणें, असलीं देहधारणेला अत्यावश्यक कार्यें करण्याची देखिल त्यांना लोकां-देखत भीति वाटते ! कांहीं केसीसमध्यें ही भीति कोणतीहि एखादीच गोष्ट करण्यापुरती भरलेली असते; व कांहीं केसीसमध्यें त्याचा मेंदू निर्बल होऊन तीं शहाणीं असूनहि वेडी असतात. त्याना स्वतःची इच्छाशक्तिच नसते. तीं दुसऱ्यांच्या तंत्रानेंच चालतात. मात्र सर्वांच्याच तंत्राने ती चालणार नाहींत. त्यांच्यावर ज्या व्यक्तीच्या इच्छाशक्तीचा परिणाम होईल त्याच्याच अनुरो-धानें तीं चालतील ! व ती व्यक्ति त्यांचा देवच बनते ! व ही एखाद्या व्यक्तीच्या इच्छाशक्तीच्या दुर्बलतेची भावना त्या विद्येचा ज्याने विशेष व्यासंग केला आहे त्यासच जाणवते. ”

नंतर डॉ सॉल्ट्‌वॉटर्‌चे लांबलचक व्याख्यान झाले. त्यांत त्यांनी डॉ. नियो-गींनीं ह्या विद्येचा आस्थापूर्वक व गुप्तरीतीनें अभ्यास करून जगाच्या ज्ञानांत भर घातल्याबद्दल सर्वांतर्फे आभार मानले. डॉ. सॉल्टवॉल्टरनी असेंहि कळ-विलें की डॉ नियोगींनी जर हा व्यासंग व त्यावरील प्रयोग गुप्तपणें केले नसते तर ‘ स्त्रीरोग्यांचा खास डॉक्टर ’ या त्यांच्या लौकिकाला बाध आला असता.

नंतर सभा बरखास्त झाल्यावर आम्ही दोघे बाहेर पडलों.

“ कसे काय झालें लेक्चर ? ” सजीवननें विचारलें.

“ फारच उत्तम ! पण तुला हें ऐकून काय मिळालें बुवा ! ” मीं म्हटलें.

“ स्वस्थ राहा आणि पाहा. ”

तुका म्हणे उगी राहावें ! जें जें होईल तें तें पाहावें हेंच त्याचें उत्तर !

## प्रकरण २७ वें.

### पुच्छ लांबत चाललें !

हीं सात रहस्यें दिसावयास एकमेकांपासून अलग परंतु वस्तुतः एकमेकांशीं अगदीं संबद्ध अशीं होतीं. आणि असें असून प्रत्येक रहस्य पुन्हा अत्यंत बिकट व गुंतागुंतीचें होतें, व ती गुंतागुंत जिवापाड मेहनत करणाऱ्या संजीवनालाहि सुटत नव्हती. मग बापड्या पोटभरू पोलीसांचा पाड काय ?

हल्लीं संजीवन आपल्या नेहमींच्या पद्धतीला विसंगत वागून ह्मणजे मला बरोबर घेऊन फिरत असे. मीहि दवाखान्याचें काम अतिशय त्रासानें लवकर लवकर आटोपून त्याच्या बरोबर जाण्यास जय्यत तयार असें. फिरत असतां तो ज्या ज्या अनेक गोष्टींचा फार बारकाईनें पूसतपास करी, त्यांचा माझ्या दृष्टीनें बाबासाहेब व अंबुताई देशपांडे यांच्या मृत्यूंशीं अर्थाअर्थी मुळींच संबध नव्हता.

संजीवनानें सांगितल्याप्रमाणें मी कस्तुरला माझ्याकडे बोलाविलें होतें; परंतु तिच्या आईनें अंथरूण धरल्यामुळें तिला येतां येण्यासारखें नव्हतें. हें वर्तमान मी संजीवनला कळविल्याबरोबर त्यानें संशययुक्त निराशेनें आपल्या कपाळाला आठ्या घातल्या. त्याला तर मग कस्तुरचीच अंदेशा येत होती काय ? असेल कदाचित् !

रणछोडदासाचें नांव मात्र संजीवनाच्या मनांत सारखें घोळत होतें. खरोखर त्याच्या सर्व शोध चौकशींत तो त्या रणछोडदासासंबंधींच माहिती मिळवीत होता.

एके दिवशीं सायंकाळीं आम्ही फिरावयास दोघेहि निघालों. आज पुन्हा त्यानें आपला पोषाख निराळ्या तऱ्हेनें बदलला होता व मलाहि तसाच साधारण मध्यम वर्गांतील लोकांसारखा पोषाख त्यानें करावयास लावला. त्याचा स्वतःचा पोषाख मोठा मजेदारच होता. कोणालाहि त्याला ओळखतां आलें

नसतें. असें करण्यात त्याला इष्ट हेतु साधवयाचा होता हें उघड होतें. पण तो हेतु कोणता तो मला मात्र कळत नव्हता.

कांहीं वेळानें आम्ही बोरीबंदरवरून, धोबी तलावाच्या मार्गानें सी. पी. टँक-वर व तेथून भुलेश्वर रोडकडे निघालों असतां मध्येंच गर्दींत एक माणूस संजीवनला भेटला. हा म्हातारा साधारण ठेंगू असून त्याचा पोषाख मळकट असून व खालच्या राहणींतील माणूस दिसत होता. त्यानें संजीवनाच्या कानांत कांहीं सांगितलें. त्या बरोबर संजीवन दचकला आणि ताबडतोब डावीकडच्या ट्रामच्या रस्त्याने त्या म्हाताऱ्यासह बोलत निघाला. मी मागून येत आहे याचें त्याला भान देखिल नव्हतें. मी आपला त्याच्या मागून चाललों होतों.

" मला चंदूनें पाठविलें आहे. " तो म्हणाला, " त्याला स्वतःला येतां येत नव्हतें म्हणून ही बातमी देऊन त्यानें मला पाठविलें आहे. "

" मी त्याच्याच निरोपाची वाट पाहात होतों. " उत्सुकतेनें माझ्या मित्रानें म्हटलें, " काय आहे त्याचा निरोप ? "

म्हातारा त्याच्या कानास लागून हळू म्हणाला—

" चंदू, वारला ! "

" वारला ? " संजीवन आश्चर्यानें उद्गारला. " अशक्य ! मी त्याची सारखी मार्गप्रतिक्षा करीत आहें ! "

" मी सांगतों ना ? आज सकाळींच त्यानें मला बोलावून तुम्हाला भेटा-ण्यास सांगितलें. कारण त्याला येण्याला सवड नव्हती. कारण तो अशा प्रकारचा— "

" तें नको " संजीवन त्या म्हाताऱ्याच्या किरकोळ गोष्टीला प्रतिबंध करून म्हणाला—" तें नको मला. मुख्य मुद्द्याची गोष्ट तेवढी सांग "

" त्यानें मला मागाहून सांगितलें कीं आणखी दुसरा निरोप घ्यावयाला तूं संध्याकाळीं ये आणि माझा निरोप घेऊन संजीवनरावांना भेट. त्याप्रमाणें मी आतां गेलों तों चंदू मरून पडलेला ! "

" मग तूं पोलीसला वर्दी दिली असशील ? "

" नाहीं बा ! मी सरळ तुम्हाला भेटायलाच प्रथम आलों. मला वाटतें आपल्या चंदूशेटचा कोणीं तरी दुष्टानें खून केला असावा ! "

" चंदूशेटचा खून ? खरं सांगतोस हें ? "

" तर मग काय मी खोटें बोलतों ? "

इतक्यांत मी पुढें होऊन म्हणालों, " त्या दिवशींचा तो दुकानदार मयत झाला होय ? संजीवन ! "

" असें दिसतें ह्याच्या सांगण्यावरून. आणि तें खरें ठरले तर मग पूर्वीच्या रहस्याच्या गांठीला आणखी एक नवीन गांठ बसली म्हणावयाची ! "

" आपणाला जर खोटें वाटत असेल तर माझ्याबरोबर चला. अद्याप कोणाला कांहीं माहिती नाहीं. मी पोलीसला कळवले पाहिजे होतें खरें, पण असल्या बाबतींत पोलीसापेक्षां तुम्हालाच आधीं कळवावें असें मला वाटलें म्हणून मी तुमच्याकडे आधीं आलों. "

संजीवनचा लौकिक साधारण जनतेंत देखिल पसरला होता.

" चल बरें ! आपण स्वतः जाऊन काय प्रकार घडला आहे तो पाहू ! " संजीवन मला म्हणाला. " जर चंदू खरोखरच मेला—असेल तर मी खात्रीनें सांगतों कीं त्याचा आणि तुझा शत्रू एकच आहे—"

" अं: ? मला नाहीं कळत तो कसा तें ? " मी म्हटले.

" सध्या नाहीं कळलें तरी चालेल, मागाहून लवकरच कळेल. सध्या आपल्याला त्याच्या मरणाचा प्रश्न सोडवावयाचा आहे. त्याला मरण आपोआप आलें कीं कोणी मुद्दाम घडवून आणलें हें आपण प्रथम ठरविलें पाहिजे. तो मारा दारू पीत असे. कदाचित् दारूच्या अतिरेकानेंहि कांहीं तरी भलताच परिणाम घडला असेल. "

" नाहीं. " तो म्हातारा म्हणाला, " चंदूशेट आज दोन दिवसांत मुळींच दारू प्याला नव्हता हें मी खात्रीनें सांगतों. "

" तर तो कसा मेला असें तुला वाटतें ? " संजीवनानें त्याला विचारलें.

" तें कसें मी सांगू ? त्या चाळींतल्या तळमजल्यावरच्या शेवटच्या खोलींत तो मरून पडलेला मला आढळला. मला भीती वाटली; परंतु त्याबद्दल आरडा-ओरडा न करतां दार ओढून मी आपल्याला कळवायाला लगबगीनेंच आलों. "

" चल बरें मोहन, लवकर आपण तिघेहि गाडी करून जाऊं. " असें म्हणून त्यानें एका कॅब्स्टँड्वरील गाडीवाल्यास खूण केली. आम्हीं तिघेहि लवकरच जुना नागपाडा आणि भायखळा यांच्या दरम्यानच्या गलिच्छ वस्तींतील एका गलिच्छ चाळींत जाऊन पोंचलों.

आतां साफ काळोख पडला होता. आम्ही तिघेहि त्याच्या खोलींत शिरलों.

" थांबा ! आंत शिरूं नका. तो आडवा वाटेवरच पडला आहे. त्याला आडकून पडाल नाहींतर ! मी अगोदर दिवा लावतों. " म्हाताऱ्यानें म्हटलें.

म्हाताऱ्यानें पेटीवर काडी ओढली आणि त्या अंधुक प्रकाशांत आम्ही उभे होतों तेथून दोनच हातांच्या अंतरावर संभावित चोरांच्या त्या संभावित नायकाचें—चंदूचें प्रेत पडलेलें पाहिलें ! म्हाताऱ्यानें सांगितलेली हकीगत इथपर्यंत तरी खरी ठरली. अनिष्ट प्रकार बहुतेक खोटे ठरावयाचे नाहींत !

त्याच्या खोलींतला तो केरोसीन तेलाच्या दिव्याचा साधा डबा लावला आणि सर्व खोली न्याहाळून पाहिली. सामानसुमान असें म्हणण्यासारखें कांहीं नव्हतें. एका जुनाटशा तिवईवर एक लहानशी कसली बाटली दिसली. प्रथम आमची नजर चंदूच्या प्रेताकडे गेली. तो जिवंत नव्हता हें तर पहिल्याच दृष्टीला कळून चुकलें. डोळे मिटलेले, हातांच्या मुटी वळलेल्या आणि सर्व शरीर वांकलेलें होतें. यावरून शेवटीं आलेल्या ओढीमुळें तो मेला होता. दातांच्या दोन्ही कवळ्या एकमेकांस चिकटून घट्ट बसल्या होत्या. आणि एकंदरीनें सर्व चिन्हें अशीं होतीं कीं त्याच्या मृत्यूविषयीं मला आरंभापासूनच शंका येऊं लागली. त्याचें किडकिडीत शरीर आणि क्षयरोग्याच्या चेहऱ्या-सारखा फिकट चेहरा काळाठिक्कर पडला होता, आणि एकंदर शरीरांतील

सर्व स्नायु मृत्यूच्या वेळीं आखडून गेल्यासारखे दिसत होते. या सर्व चिन्हांवरून मी ओळखलें कीं त्याचें मरण नैसर्गिक व आपोआप आलेलें मुळींच नव्हतें.

माझ्या नेहमींच्या अनुभवानें मीं ताडलें कीं ह्या व इतर एकंदर चिन्हांवरून त्यानें स्वतःच आत्महत्या केली असावी अथवा दुसऱ्या कोणीतरी त्याची हत्या केली असावी. तथापि माझ्या मतें पहिलेंच अनुमान अधिक बळकट होतें.

माझी ही तपासणी संपल्यावर संजीवन माझ्याकडे वळून ह्मणाला—

" काय डॉक्टरसाहेब आपलें मत ? "

" त्यानें विष खाल्लें ! "

" विष ! त्याच्यावर विषप्रयोग झाला ह्मणतोस ? "

" हो हो ! मग तें विष त्यानें स्वतः घेतलें असेल अथवा तुझ्या म्हणण्याप्रमाणें कोणीं विषाचा प्रयोग त्याच्यावर केला असेल, पण त्याला विष भक्षणानें मरण आलें आहे एवढें खास ! "

संजीवनानें हें ऐकून आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें एक हुंकार दिला. त्यांत कांहीं समाधान तर कांहीं संशय या दोहोंचेंहि मिश्रण होतें. कोणतीहि अडचणीची व विचाराची बाब आली कीं तो असा हुंकार देत असे.

" आपण आतां अगोदर पोलीसला बोलावूं. " मी ह्मटलें. " त्यांच्या शिवाय आम्हाला कांहीं करतां येणार नाहीं. तो तर मेलाच ! "

" मे—ला ! मेला खरा ! पण त्याला मारला कोणी हें आपण शोधून काढलें पाहिजे. "

" अहो राव ! सध्यां आपल्याला असले प्रश्न सोडवायला घरचेच खून आहेत, त्यांत आणखी दुसऱ्यांच्या घरच्या उठाठेवी करण्याची भर नको आहे. चला उठा, उठा पाहूं. त्या बिचाऱ्यानें कसल्या तरी दारुण निराशेनें गर्भगळित होऊन स्वतःच विष खाऊन प्राण दिला असेल. " मी ह्मटलें.

" निराशेनें ? " ह्मताऱ्यानें माझ्या बोलण्यावर ह्मटलें. " चंदूशेटला निराशा आणि भय ह्मणजे काय हें जन्मांत ठाऊक नाहीं. नेहमींचा उद्योगी आणि

आनंदी—खुशालचंद प्राणी तो ! तो जगाला कंटाळून स्वर्गात जाण्याला कधींच उत्सुक नव्हता. तो गमती माणूस होता. शिवाय त्याची राहणी गरीबीची असली तरी त्याची पेढीवर ठेव बरीचशी आहे. पूर्वी त्यानें आपल्या पूर्व वयांत भोगलें आहे इतकें वैभव एखाद्या राजानें भोगले नसेल ! ''

'' कसें कां असेना ! त्यानें स्वतः विष खाल्लें नाहीं, तर त्याला कोणी तरी विष पाजलें असेल ? मी प्रथमच नाहीं का सांगितलें तसें ? '' मी उत्तरलों.

' मला हेंच अधिक ग्राह्य वाटतें अनुमान. त्याच्यावर विषप्रयोग झाला आहे; आणि त्याचा तलास आपल्याला लावायचा आहे. हें रहस्याचें पुच्छ लांबत चाललें ! ''

प्रेततपासणी जी मृत्यूनंतर होते त्यांत बहुधा राम नसतो. मारण्याकरितां म्हणून विष दिलें असलें तर त्याचा तात्काळ परिणाम होईल असेंच तयार करून दिलें जातें हें सर्वाला ठाऊकच आहे बाकी कित्येक वेळां अशा पेयांतून विष देण्यांत येतें की त्याचा संशय देखिल येऊं नये त्याचा तात्कालिक कांहीं एक परिणाम न होतां विष हळू हळू पोटांत साचतें आणि मग त्याचा परिणाम होतो. Antimony हें विष अशा वर्गांतलें आहे. अफीण वगैरेसारखीं गुंगी आणून मारणारीं (Narcoties) किंवा मेंदूवर परिणाम करून मस्तक बिघडून सर्व शरीरातील रक्त बिघडवून सोडून, किंवा उन्माद आणि रक्तपित्ती, अथवा आंकडी आणि मूर्च्छना उत्पन्न करून जीव घेणार देखिल कांहीं चमत्कारिक परंतु भयंकर अशीं विषें असतात. तेव्हा इतर साध्या विषांपेक्षा असल्या विषांच्या परिणामाची परिक्षा करणें फार कठीण पडतें. कारण अशा बाबतींत मुख्य गम अशी असते कीं विष पोटात असूनहि बाहेर विषाची खूण कांहीं एक दिसत नाहीं त्यामुळें विषानें मयताचा प्राण गेला आहे कीं काय हें ठरविण्यास फार मुष्कील पडतें.

चंदूच्या मरणाचा प्रश्न संजीवनाच्या मनांत ठाण वळकावून बसला ! त्याच्या दुकानांत मी त्याला पाहिलें तेव्हां तो आपला उद्योगी, प्रामाणिक व्यापारी

असावा असें मला वाटले होतें. परंतु संजीवनाशीं त्याच्या ज्या कानगोष्टी झाल्या त्यावरून तो दिसतो तसा नसावा असेंहि मला वाटलें. काय असेल कुणास ठाऊक !

त्याच्या आकस्मिक मृत्यूनें संजीवनाच्या आजपर्यंतच्या सर्व शोधांची इमारत ढांसळून पडल्यासारखी दिसली. त्यानें हुंकार दिला आणि त्या गलिच्छ खोलींत तो येरझारा घालूं लागला.

आम्ही दोघे आपापल्या परी विचारांत गढून गेलों होतों. मला तर संजीवनाचा विकत श्राद्ध आंगावर घेण्याच्या खोडीबद्दल मनांतून फार राग येत होता. परंतु बाहेर दाखविण्याची सोय नाहीं ! आणि दाखविला म्हणून विचारतो कोण त्याला ? तो म्हातारा देखिल कंटाळल्या सारखाच दिसत होता.

इतक्यांत संजीवन म्हणाला—

" हें पाहा इथें कांही तरी आहे ! "

मी डोळे फाडून त्याच्याकडे पाहूं लागलों.



# प्रकरण २८ वें.

## आणखी एक खून !

विचारांत गढलेला संजीवन इकडून तिकडे येरझारा घालीत असतां माझ्या समोर थांबून म्हणाला.

" मोहन ! इथें कांहीं तरी काळेंबेरें आहे. त्यांच्या हातून जरी हें कार्य तडीस जाणार नाहीं तरी मुळींच विलंब न लावतां आपणाला पोलीसला आतां बोलावलेंच पाहिजे. "

" कां म्हणून ? "

" कां म्हणून ? कारण त्याचा खून झाला आहे म्हणून. "

" बुद्धिपुरःसर कांहीं विशिष्ट हेतु साधण्याकरितां हा खून झाला आहे म्हणतोस ? "

" यांत काय संशय ? याचें तोंड बंद करण्यात हेतु हा आहेच. " नंतर त्या म्हाताऱ्याकडे वळून संजीवन म्हणाला—

" रणछोडदास नांवाचा कोणी इसम तुला ठाऊक आहे ? "

" रणछोडदास ? " म्हाताऱ्यानें विचारलें. " रणछोडदास ? मला नाहीं आठवत हें नांव ! म्हणजे कोण बरें ? भय्या कीं गुजराथी कीं हिंदुस्थानी माणूस ? कोण कुठला हा ? "

" त्या नांवावर जाऊं नकोस. नांव कसेंहि असलें तरी त्याच्यावरून त्या व्यक्तीला ओळखतां येण्यासारखें नाहीं. नांव गुजराथी असूनहि तो दुसराच कोणी असूं शकेल. "

" नाहीं—नाहींच माझ्या ध्यानांत येत ह्या नांवाचा कोणी माणूस. "

" बरें, चंदूशेठकडे कोणी येत जात असे का ? कोणी म्हणजे परका बाहेरचा कोणी माणूस. "

" छे ! त्याला कोणी भेटायाला येत नसे. मला नक्की माहिती नाही."

" पण जरा थांब; डोकें शांत ठेव. मागची आठवण मनांत आण. आणि नीट विचार करून मला सांग. चंदूकडे रात्रौ कोणी परका माणूस येत नसे कांय ? असेल, विचार कर."

" अं हं. माझ्या लक्षातच येत नाहीं असा कोणी कधीं आल्याचें. त्याची माझी मैत्री, आमच्या दोघांचा चांगला सहवास; पण मला ही माहिती नाहीं.

" बरें ! कांही हरकत नाहीं ! जरा लवकर जाऊन त्या चौकीवरच्या दोन पोलीसना घेऊन ये "

तो निघून गेल्यावर संजीवन माझ्याकडे वळून हळूंच पुटपुटला—

" हा म्हातारा लुच्चा दिसतो. त्याला सर्व माहिती असून तो मला सांगण्याची उडवाउडवी करीत आहे ! "

मी हें सर्व ऐकत असतां ती तिवईवरची उघडी बाटली घेऊन पाहत होतों. तिचा वास घेऊन पाहतां तिला दारूचा (Rum) वास आला आसपास ग्लास वगैरे कांहींच नव्हतें. यावरून पिणारानें ती बाटलीच तोंडास लावली असावी. बाटलीच्या तळास कांहीं बिंदू शिल्लक उरले होते. ते मी तसेच राखून ठेवण्याकरितां बाटलीस बूच लावून जपून ठेवली. कारण त्यांचा पृथक्करण करतांना उपयोग करून घेतां येईल असें माझ्या मनांत आलें.

" संजीवन ! प्रथम मला असें सांग; आपल्या सध्यांच्या रहस्यभेदाशीं या बिचाऱ्याच्या मृत्यूचा संबंध कसा पोंचतों ? मला काय तें स्पष्ट सांग बुवा ! "
" मी जरा त्रासून पण सांभाळून म्हटलें. आणि जर संबंध नसेल; तर उगीच यांत आणखी वेळ दवडण्यांत हांशील काय ? रहस्यांतून रहस्य उत्पन्न झाल्यासारखें हें आपलें पुच्छ लांबतच चाललें ! "

" तूं म्हणतोस तें वाजवी आहे, मोहन ! पण मी अगदीं धिमेपणानें पुढें पाऊल टाकीत चाललों आहें. भारी त्रासदायक हें प्रकरण खरें ! पण आतां खात्रीपूर्वक मी सांगू शकतों कीं मी योग्य रस्त्यावर आहे आणि लवकरच मुक्का-

माला पोंचेन. मध्यंतरीं अनेक वेळा दिशाभूल होऊन मी पायांखालची वाट चुकून सोडली आणि आडमार्गास लागलो पण मुक्काम अगदीं जवळ आला आहे. हें प्रेत, " चंदूच्या प्रेताकडे बोट दाखवून तो म्हणाला, " ह्या चंदूचा मृत्यु मला आणखी चार पावलें माझ्या मुक्कामाच्या जवळ नेणार आहे. म्हणून ही माझी मारी धडपड आहे. उगाच नव्हे कांहीं ? आतां आलें तुझ्या ध्यानांत सर्व ? "

" पण ह्या चंदूच्या मृत्यूचा संबंध आमच्या रहस्याशीं कसा पोंचतो हें कांहीं मला उमगलें नाहीं तुझ्या इतक्या लांबलचक भाषणावरून देखिल ! "

" आतां मग सध्या जरा स्वस्थ राहा. हे पोलीस येऊन काय दिग्विजय लावतात तो पाहू या. " तो हंसून म्हणाला. " ते आतां पाहा केवढी गडबड धडपड करतील. आणि शेवटीं परिणामास भोंपळ्या एवढें ! हा खून करणारा पोलीसांच्या बारशाच्या घुगऱ्या खाल्लेला माणूस आहे ! "

" बरें रणछोडदास हा कोण ? आणि त्याच्याबद्दल तू काय सारखा तपास चालवीत सुटला आहेस तो ? त्याचा तरी काय संबंध ? "

" हां. तें आपल्याला अजून शोधून काढावयाचें आहे. मला आतांपर्यंत जें कळलें आहे, त्यावरून त्याचा संबंध नसेल कदाचित्. परंतु तेंहि एक माझ्या अनुमानांपैकीं अनुमानच आहे. "

" बरें ह्या मनुष्याला भेटण्यांत तरी तुझा हेतु काय होता ? " त्याच्या सर्व खटोटोपीचा अर्थ जुळवून लावण्याच्या प्रयत्नाकरितां मी हा प्रश्न टाकला.

" हं ! हें बरोबर विचारलेंस " तो म्हणाला. " हा माणूस जिवंत असता तर त्यानें मला बऱ्याच गोष्टी सांगून माझें काम अगदींच सोपें केलें असतें. त्यानें मला सर्व कोडीं उकलून दिलीं असतीं ! "

" बरोबर ! त्याच्याकडून तुला बातमी समजणार त्याचक्षणीं त्याचा प्राण घेतला गेला ! "

" पाहा कसा तो ऐनवळीं आमचा कार्य नाश केला! ह्याचें तोंड बंद करून त्याच्या आणि तुझ्या शत्रूनें कारण तो एकच इसम आहे. " इतकें बोलून तो गप्प राहिला. आता पुढें प्रश्न विचारून त्याच्याकडून कांहीं निघणार नाहीं हें मला ठाऊक होतें.

इतक्यांत त्या म्हाताऱ्यामागून दोन पोलीस लगबगीनें आले.

" आम्ही आपल्याला बोलावणें पाठवलें होतें, " संजीवन म्हणाला. ' हा ह्या खोलींतला एक माणूस इथें मरून पडला आहे असें दिसतें. "

" कोण हा ? " त्यांतलों एक पोलीस म्हणाला, आणि त्यानें तो दिवा आपल्या हातांत घेऊन खालीं वांकून तें प्रेत पाहूं लागला.

" याचें नांव चंदू तो एक प्रथम फेरीवाला व्यापारी होता व नंतर त्यानें एक लहानसें भायखळयाच्या बाजूस दुकान घातलें होतें. आपल्या बरोबरचा हा माणूस त्याचा एक मित्र होता. त्याच्याकडून तुम्हास त्याच्याबद्दल विशेष माहिती मिळण्यासारखी आहे. "

" केव्हांसा प्राण गेला याचा ?" शवास स्पर्श करून दुसरा पोलीस म्हणाला.

" त्याचा प्राण जाऊन बराच वेळ झाला. मी त्याचें प्रेत तपासून पाहिलें. मी डॉक्टर आहे " मी म्हणालों.

इतके मी बोलतांच त्यानीं माझें नांव व पत्ता टिपून घेतला. माझ्या बरो-बर माझ्या मित्राचें नांव पत्ता देखिल नोट बुकात दाखल झालें. संजीवनचें नांव ऐकतांच दोघेहि पोलीस चपापले. त्याचें नांव पोलीसांना माहीत होतें.

" तुमचे ठाण्याकडचे इन्स्पेक्टर मि. क्रिअरहँड् नां ? " संजीवननें विचा-रलें " मी त्यांना ओळखतों. "

" होय, होय. " पहिल्या पोलीसनें आतां नम्रतापूर्वक उत्तर दिलें. [आ]पलें नांव आम्ही यापूर्वीं ऐकले आहे. अकस्मात गांठ पडली आपली. "

असें म्हणून संजीवननें पूर्वी प्रसिद्धीस आणलेल्या गुप्त रहस्यांच्या पूर्वीच्या एक दोन केसींचा हकिगत त्यांनीं रसभरित वर्णन करून विचारपूर्वक सांगितली.

संजीवन नुसता हांसला. तो स्वतःच्या नांवाच्या प्रसिद्धीस हपापलेला नव्हता. तसेंच त्याला त्याची कोणी स्तुती केलेलीहि आवडत नसे. स्वतःच्या करमणूकीकरितां म्हणून तो असल्या केसांमध्यें मन घाली आणि त्यांत यश मिळवी. सर्व पोलीस त्याला नांवानें ओळखीत असत, परंतु फार थोड्यांनीं त्याला प्रत्यक्ष पाहिलें होतें.

" आपलें मत काय आहे ? " पोलीसनें विचारलें सि. आय. डी. च्या सार्जंटला कळवून त्याचें मत घेण्याहूनहि संजीवनचें मत त्याला अधिक महत्वाचें वाटलें.

" आकस्मिक मृत्यु आलेला आहे हा, नाहीं ? " संजीवन म्हणाला, ह्याच्यावर विषप्रयोग झाल्यासारखा दिसतो. "

" आत्महत्या ? "

" छे ! हा खूनच असावा ! " संजीवाननें शांतपणें उत्तर दिलें.

" मग त्यांत कांहीं रहस्य असावें असें वाटतें आपल्याला ? " त्या कान्स्टेबलनें विचारलें.

" होय. असाच माझा अंदाज आहे. चला आपण खोली तपासून पाहूं ! चल मोहन तूं देखिल ये माझ्या बरोबर. " तो मला उद्देशून म्हणाला आणि आम्ही सर्वजण त्या खोलीतले सर्व जिन्नस परतून पाहूं लागलो.

बिचाऱ्याची चीजवस्त कांहीं फारशी नव्हतीच. कॉन्स्टेबलच्या कंदीलाच्या मदतीनें आम्ही सर्वांनीं थोडक्याच वेळांत सर्व उलथापालथ केली. सारा कोना कोंपरा उलथून पाहिला.

इतक्या साऱ्या खटपटींत एकच महत्वाची ह्मणण्यासारखी वस्तु सांपडली !

भिंतीस टेंकून ठेवलेल्या एका फळ्याच्या मागें कपड्यांत गुंडळून ठेवलेले कांहीं कागदांचे रुमाल सांपडले. त्यांत विशेष महत्वाचें असें कांहीं दिसलें नाहीं

व्यापाराच्या खरेदी विक्रीचा हिशेब, पेढीवाल्याबरोबर झालेला पत्रव्यवहार, करार वगैरे, व असेच त्याच्या व्यवहाराचे व नवीन दुकानाच्या खर्चाचा व फायद्याचा तक्ता वगैरे सर्व कागद होते. शेवटचा रुमाल सांपडला तो मात्र या सर्वांहून निराळा होता तो कोणाशीं तरी झालेला पत्रव्यवहार होता; म्हणजे कोणाकडून तरी आलेलीं पत्रें त्या रुमालांत त्यानें जपून बाळगून ठेवलीं होतीं. कोणाचीं तरीं असें म्हणण्याचें कारण असें कीं त्या पत्रांवर तीं त्याला पाठविणाराची सही नव्हती ! सर्वच पत्रें वेडया वांकडया अक्षरांत लिहिलेलीं होतीं. त्यांतील एक पत्र संजीवननें उघडलें आणि वाचूं लागला:—

" + + + +—पुष्कळ वर्षांपासून आपला दोघांचा परिचय आहे, तथापि अशी सोन्यासारखी संधी तूं दवडशील अशी मला शंकाहि आली नाहीं. कॉफर्ड मार्केट्कडेच्या हॉटेलांत परवांच्या रात्रीं मी तुझ्याकडे जी गोष्ट काढली आहे, तिचा पुन्हा एकवार विचार करून काय तें ठरव. पूर्वीं तूं माझें एक असलेंच काम आपल्या मदतगारांकडून उत्तम प्रकारें पार पाडलें आहेस; आणि त्याचा मोबदला म्हणून मी तुला शहाजोग धंदा राजरोस चालविण्यास भांडवल दिलें. तथापि आपलीं कामें गुप्त रीतीनें पार पडणार नाहींत अशी तुला वारंवार निष्कारण भीति वाटते पण अशा वेळीं, वास्तविक असे प्रकार उघडकीस आले तर स्वतः माझेंच सर्व प्रकारें कसें नुकसान होईल याचा तूं विचार करावास; म्हणजे तुला स्वतःची भीती बाळगावीशी वाटणार नाहीं. त्या प्रश्नाचा फिरून पूर्ण विचार करून काय उत्तर द्यावयाचें असेल तें दे. उद्यां रात्रीं मुंबादेवीच्या तळयावरील काळोखांतील वैराग्याच्या झुंडीत आसपास कुठें तरी मी असेन तेथें मला येऊन भेट आणि आपला जबाब कळव. मात्र येतांना आणि जातांना मागें आणि पुढें तुझ्या पाठलागावर कोणी नाहीं याची अगोदर खात्री करून घे, तसा कांहीं संशय आला तर मला लांबूनच आपली नेहमींची खुणेची शीळ वाजवून इशारत दे आणि मग दुसरीकडे मी सांगेन त्या वेळीं भेट. कारण तो दुष्ट बहिरीससाणा—संजीवन—आपल्या पाठीवर आहे, यांत शंका नाहीं. या करितां हुशार राहा ! "—" झ. "

" काय विलक्षण तरी एकेक प्रकार ! " मी उद्गारलों. " तें पत्र कोणीहि लिहिलेलें असो. पण तो लिहिणारा चंदूला कसल्या तरी कटांत शामील करून घेऊं पाहत आहे, आणि असें करतानां त्याला तुझी भीति वाटत आहे ! चंदूला मात्र भिण्याबद्दल दोष देण्यास त्याला कांही वाटत नाही ! नाहीं ?संजीवन ! "

संजीवन उत्तरादाखल नुसता हांसला. मी बोललों तें त्याला पटलें तो मनापासून हांसला. नंतर त्यानें दुसरें पत्र उघडलें तेंहि तसेंच वेडया वाकडया बालबोध अक्षरांतलें. पण लिहिण्याचा हातवळा निराळा होता !

" + + + +—तुझी मागणी भारीच भारी दिसते. माझी खात्री आहे कीं ते काम करण्याला तूं चार किंवा अधिक तर पांच इसम पाठविले असशील; त्याच्या तेथल्या सर्व तयारीकरितां लागलेल्या जिनसांची किंमतवार यादी वाचून पाहिली. तरी देखिल तूं मागतोस ती रकम भलतीच दिसते ! शिवाय तुझ्या त्या दगडूचा रागरंग ठीक दिसत नाहीं. त्याच्या कालच्या बोलण्यांत एक प्रकारचा धमकीचा भास झाला. त्याला तूं मजसंबंधीं कांहीं कमजास्त कळवलें तर नाहींस ? पक्कें लक्ष्यांत धरून ठेव कीं आपली सर्वांची अणी एकमेकांच्या हातांत आहे ! आणि आजकालच्या सामाजिक समतेच्या काळांत देखिल ज्याच्यापाशीं दाम तोच करतो इच्छिलेलें काम ! इतराचें कांहीं चालणार नाहीं. त्या दगडूचें तोंड ताबडतोब बंद कर, पाहिजे तर त्याला पैसा दे—लागलीच जरूरी तर शंभर रुपयांपर्यंत मोज; पण मात्र ते मी दिले म्हणून त्याला सांगूं नकोस. तुला माझा मित्र म्हणवतां येईल–पूर्वीच्या प्रमाणें. जास्त मात्र कांहीं बोलायचें नाहीं. काल ठरलेल्या जागीं भेटायचें हें लक्ष्यांत असूं द्या—हुशार ! "—." ह "

" हा तर सोनेरी टोळीच्या दरवडयांच्यासारखा प्रकार दिसतो ! " एक कॉन्स्टेबल् म्हणाला, " हा दगडया कोण ? "

" आलें ध्यानांत माझ्या ! हा दगड्या कोण तो मी सांगतों. तो कुलूप किल्ल्या घेऊन विकावयास फेऱ्या घालतो, तोच हा दाढीवाला पठाणी दगडू. त्याला पूर्वी घरफोडीबद्दल शिक्षा झालेली आहे " तो म्हातारा म्हणाला.

" अझून तो फेरीवाल्याचाच धंदा करितो ? " कॉन्स्टेबलनें विचारलें.

" कालच मी पाहिला त्याला कांदेवाडीच्या बोळांतून फिरतांना "

" ठीक ! " कॉन्स्टेबल म्हणाला. " आपण त्याची गांठ घतली पाहिजे. नर ह्रीं पत्रें लिहिणारा कोण तो शोधून काढण्यावर पुढल्या साऱ्या गोष्टी अवलंबून आहेत. कांहीं असो, एवढे खरें कीं त्या पत्रें लिहिणाऱ्याचें गुह्य ह्या मयताला माहीत होतें आणि त्याच्या जोरावर हा त्याच्याकडून पैसे उकळीत होता. "

" एकंदरींत धंदा ठीक चालला होता ! " मी म्हटलें.

" धंदा ! अहो हा कसला धंदा ? त्याच्याहून किती भयंकर धंदे या मुंबई शहरांत रात्रंदिवस चाललेले असतात ते आम्हा पोलीसानांच ठाऊक ! त्यांची कोठें वाच्यता करण्यासारखी नसते. "

संजीवननें हुंकार दिला; आणि समाधानपूर्वक तो आणखी पत्रें चाळूं लागला. खुनाच्या केसमध्यें मयताच्या संग्रहांतील सांपडलेला लेखी पुरावा फारच महत्वाचा असतो. ह्या केसमध्यें तर ह्या पत्रव्यवहाराला अत्यंत महत्व होतें. संजीवन आणखी एक पत्र वाचूं लागला.—

" आतां या उपर मला मदत न देण्याचा तुझा निश्चय ठाम झाला का ? पूर्वी तूं मला अनेकवार मदत केलीस आणि त्याबद्दल तुला इतका मोबदला मिळाला आहे कीं, त्याच्यावर तुला जन्मभर श्रीमंतींत राहतां आलें असतें; परंतु तूं आपल्या मित्रांवर खैरात करून सारा पैसा उधळून दिलास. तसेंच तुमच्या मंडळींतला तो तमासगीर गोरटिला पोऱ्या, तमाशांतून स्त्रीपार्टीची वगैरे कामें करणारा, त्याला तूं फारच पैसा दिलास; तो आपल्या उपयोगी पडत होता खरा; पण त्या मानानें त्याला मोबदला अवास्तव प्रमाणाबाहेर मिळाला आहे. उद्यां एक पांच रुपयांची नोट ह्यांच्यापैकीं एखाद्याला देण्याची तू नाकारलीस तर ते तुला पोलीसाच्या तावडींत द्यावयाला कमी करणार नाहींत ! मागचें देणें आठवण ठेवणारे ते लोक नव्हत. मी हें आज तुला शेवटचें पत्र पाठवित आहे. मी काय लिहितों तें पुरें लक्ष्यांत घे आणि मग कांहीं

# प्रकरण २९ वें.

## आंधळें दळतें आणि कुत्रें पीठ खातें !

संजीवनच्या हातांतून तें पत्र घेऊन मीं स्वतः पाहूं लागलों. त्याच्यावर प्रिन्सेस स्ट्रीटचा मुक्काम होता. परंतु तारीख नव्हती. मागचीं जीं पत्रें आम्ही वाचलीं होतीं त्यांवर तारीख आणि मुक्काम दोन्ही नव्हतीं. त्या पत्रांतील मजकूर खालीलप्रमाणें होता.

" + + + +—गेल्यारात्रीं कल्याणकडे जात असतां गाडींतून उतरून एका स्टेशनवर मला जे कांहीं आपण सांगितलें त्याचा नीटसा अर्थ मला कळला नाहीं. माझ्यावर कसलें संकट येईल असें वाटत नाहीं. यावयाचें संकट तर येऊन गेलेंच; याकरितां तुम्ही जी आपली मदत देऊं करीत आहां, आणि माझ्या मदतीकरितां म्हणून माझ्या आगेंमागें फिरत आहां, त्यावरून तुमचा हेतु कांहींतरी वाईट असला पाहिजे असेंच मानावें लागतें. म्हणून या उप्पर जर असल्या मजकुराचें पत्र माझ्या हातीं पडेल तर मला त्याबद्दल पोलीसला बातमी देणें भाग पडेल "

—" अंबूताई देशपांडे "

"अरेच्चा !" मी उद्गारलों; "तर मग कोणी तरी हिला आगाऊ नोटीस दिली होती ! हिला मात्र त्याचा अर्थ कळला नाहीं."

" निःसंशय !" माझ्या हातचें पत्र घेत संजीवन म्हणाला. " अंबूताईच्या मृत्यूच्या पूर्वीं थोडेच दिवस अगोदर हा पत्रव्यवहार झालेला आहे. काय सांगूं ! हा माणूस," त्या प्रेताकडे पाहून तो म्हणाला—"मात्र जिवंत असावयास पाहिजे होता, म्हणजे आपल्याला सर्व बित्तंबातमी नक्की करून सातहि कोडीं एका चुटकीसरशीं सुटलीं असतीं."

परंतु त्याचें तोंड कायमचेंच बंद झालें होतें आतां त्या सर्व पत्रांवरून काय निष्पन्न होईल तें पाहावयाचें. नंतर आम्ही लवकरच पोलीसच्या मुख्य ठाण्यावर

गलों व संजीवननें सी. आय्. डी. त्या गोऱ्या सार्जंटची गांठ घेतली. तो खूप वेळपर्यंत बोलत बसला होता

मी त्या मयताचें शरीर व त्यावर झालेला विषाचा परिणाम यांचें सविस्तर वर्णन केलें. स्वत: त्या बाबतींत मन घालण्यापूर्वी डिटेक्टिव्हानें आम्ही दोघांनीं सांगितलेली सर्व माहिती टिपून घेतली. माझें नांव व पत्ता हीं देखिल त्यानें लिहून घेतली. कदाचित् सरकारमार्फत प्रेततपासणीच्या वेळीं मला बोलवावयाचें त्यानें ठरविलें असेल. नंतर आम्ही निघून गेलों.

येतांना तो कांहीं बोलला नाहीं; परंतु वेस्टएंड सिनेमा आतां ज्या ठिकाणीं आहे त्या ठिकाणीं आल्या बरोबर मला पुढें एकट्यालाच घरीं जाण्यास सांगून आपण मागें परतला. आपणाला डंकनरोडकडे जावयाचें आहे असेंहि तो जातां जातां पुटपुटला. त्याच्या मनांत कांहींतरी आलें. मी जेव्हांच्या तेव्हां त्याच्या विचाराप्रमाणें आचरावें असा त्याचा स्वभाव असे.

त्या रात्रीं माझा डोळा लागला नाहीं. गेल्या दोन तीन महिन्यांत जे हे सर्व प्रकार घडले त्यांनीं माझ्या डोक्यांत थैमान सुरू केलें बाबसाहेबांचें तें भूत, अंबूताईचा मृत्यु, आणि शेवटीं संजीवनच्या म्हणण्याप्रमाणें ज्याच्याकडून आम्हाला सर्व रहस्यांची माहिती कळण्यासारखी होती त्या चंदूचा अंत हीं सर्व माझ्या मनांत वावरत होती.

कस्तुरचे चमत्कारिक शब्दहि माझ्या कानांत घुमत होते. त्या शब्दांचा तरी अर्थ काय ? तिला ठाऊक होतें तें तरी काय ? तिचे हात, तिचें मन, तिचें शरीर पापी असेल काय ? नाहीं. हें तर मुळींच संभवनीय नाहीं. तर मग तिच्या बोलण्यांत आणि वर्तनांत पापी हृदयाच्या माणसाच्या ठिकाणीं दिसून यावी तशी साशंकता भीतिग्रस्तता कां ? दुधारी सुरीच्या सातहि रहस्यांचा मी पुनः पुनः विचार केला—मला कांहींच उमगेना. मस्तक मात्र भांबावून गेलें.

दुसऱ्या दिवशीं हॉस्पिटलमध्यें गेल्यावर चंदूचें प्रेत सरकारमार्फत तपासण्याकरितां हजर राहावयाची नोटीस मला मिळाली.

त्या प्रेताची तपासणी आम्ही कशी काय केली त्या हकीगतीचें वर्णन देऊन वाचकांना कंटाळा आणणे नकों नको. एवढें मात्र सांगणें जरूर आहे कीं त्या प्रेताचे कांहीं भाग आम्ही मागून तपासण्याकरितां कापून ठेवले आणि मग सर्व जण हॉस्पिटलच्या लेबोरेटरींत तपासणीच्या उद्योगात गढून गेलों. विषप्रयोगाच्या प्रेताच्या बाबतींत जो निकाल लागावयाचा त्याला मृत्यूच्या पूर्वींच्या कांहीं भावना व मृत्यूनंतरच्या कांहीं भावना यांच्या माहितीची जरूर असते आता मृत्यू पूर्वींच्या भावनांबद्दल आम्हांपैकीं कोणालाच माहिती नव्हती, म्हणूनच आमचें काम अधिक अवघड झालें होतें तपासावयाचे जे शरीरावयव असतात ते पृथक्करण करणाराला जितक्या शुद्ध स्थितींत सांपडतील तितके निर्मळ आणि शुद्ध पाहिजे असतात; अशासाठीं कीं पृथक्करणांत आणि तपासणींत मुळीच संदेह राहूं नये. शिवाय रक्त आणि पोटांतील स्नायु वगैरे हे देखिल त्यांच्यांत बाहेरील विष मिसळून भिनून जाण्यापूर्वीं त्यांच्यातलें कांहीं भाग बाजूस काढून ठेवावे लागतात. तरी देखिल पुढें अडचणी थोडक्या नसतात. कांहीं विषें शरीरांत घुमण्याबरोबर आपलें पूर्व स्वरूप पालटतात, कित्येक त्याचें परीक्षण करण्याचीं द्रव्यें घातल्याबरोबर बदलून जातात. अशा विषाचें परीक्षण निराळ्यारीतीनें करावें लागतें.

अवघे चार तास आह्मी सर्वजण पृथक्करण--परीक्षण करीत होतो. आसिडें वगैरे घेऊन कित्येक वेळा गाळणें (Filteration), उष्णता देऊन वाफ करणें ( Disuilation ) वगैरे अनेक प्रकार करून शेवटीं ठरविलें कीं चंदूच्या पोटांत गेलेलें विष अन्य रोगाचीं चिन्हें बाहेरून दाखविणारें न्यूरोटिक (Neurotic) होतें. तें जवळ जवळ—अगदीं खास तेच असें नसलें तरी नायट्रेट ऑफ अमील ( Nitrate of amyl ) सारखें होतें.

ह्याच्या पुढें कोणासच कांही निश्चितपणें सांगतां येईना. इतक्या जणांनीं इतके तास काम करून शेवटीं इतकाच निष्कर्ष काढला, आणि तेवढ्यावरच आम्हाला भागवून घ्यावें लागलें.

नंतर मला साक्ष द्यावी लागली. वर्तमानपत्रांचे रिपोर्टर्स बसलेच होते. हेंहि लटांबर मागच्या केसींप्रमाणें फार लांबिल आणि बाबासाहेबांच्या खुनाप्रमाणें

कादंबरीसारखें चटकदार होईल, असें पुष्कळांस वाटलें होतें. परंतु माझ्या साक्षींत त्याच्या खोलींत शेजारींच ती दारूची बाटली व त्यांतील तो प्रवाही पदार्थ असलेला मी जपून ठेवला होता तो पुढें करून त्याबद्दलचा सर्व मजकूर कळविला. त्यामुळें मयतानें आत्महत्या केली असावी असें सर्वांचें मत बनूं लागलें.

ज्यूरींतील कांहीं सभासदांचें मत निराळें होतें. त्यानंतर पोलीसनें आपल्या तर्फेची पूर्वी वर्णन केलेलीं पत्रें पुढें आणलीं. हीं पत्रें पुढें आल्यावर पुन्हा प्रेक्षक लोकांत चळवळ दिसूं लागली. परंतु त्या पत्रांवरून कोरोनर आणि ज्यूरी यांनीं ठरविलें कीं चंदूला कोणीतरी कसला तरी गुन्हा करण्याच्या कामावर नेमला होता.

" ही अंबूताई कोण ? " कोरोनरनें विचारलें.

" ती देखिल मयत झाली आहे, " इन्स्पेक्टरनें उत्तर दिलें " थोड्याच दिवसापूर्वी पाण्यांत पडून तिला मरण आलें. आतां आपल्या लक्ष्यांत आली ना ती केस ? "

" बस्स् ! " कोरोनर निश्चयी स्वरानें म्हणाला, " ह्या तिच्या पत्रांचें फार महत्व आहे यामें आपण जी आत्महत्या म्हणून ठरविली ती आत्महत्त्येची केस नव्हे. अंबूताईचा खून झाला आणि त्याच खुनी माणसानें आतां ही आत्महत्या केली. असेंच ठरतें नाहीं का ? "

" पोलीस खटल्याचा असाच अंदाज आहे." इन्स्पेक्टर म्हणाला.

"आंधळें दळतें आणि कुत्रें पीठ खातें !" संजिवन त्वेषानें स्वतःशीं म्हणाला. परंतु त्याचे शब्द जरा मोठ्यानें निघाले.—"पोलीसचा अंदाज आजपर्यंत कधीं खरा ठरलेला कुणी लेकाने पाहिला आहे ? हा पोलीसचा अंदाज जर ज्यूरीनें ग्राह्य मानावयाचें मनांत आणलें असेल आणि बिचाऱ्या चंदूला अंबूताईचा खून करणारा म्हणून ठरवणार असतील तर ठरवोत विचारे ! त्यांचा कोण हात धरणार ?"

कोरोनर आणि त्याची ज्यूरी हा एक फार्स—पोरखेळ आहे असें संजीवनचें असलेलें मत मला ठाऊक होतें, परंतु मला वाटे हें सर्वथैव खरें नव्हतें.

" ठीक ! " कोरोनर म्हणाला; " हें पत्र म्हणजे महत्वाचा लेखी पुरावा आहे. हा मयत इसम, " कोरोनर अंबूताईचें तें पत्र हातांत घोळवीत म्हणाला; " हा मयत इसम तिला बाह्यात्कारी संकटांची सूचना देऊन सावध करण्याकरितां अथवा स्वतःची मदत देण्याकरितां—परंतु वास्तविकपणें तिला पकडण्याकरितां म्हणून तिचा मागून गेला होता. हें पत्र त्याला पोंचल्यानंतर त्यांत तिनें पालीसच्या कानावर हें वर्तमान घालण्याची धमकी त्याच्या जिव्हारीं लागली, म्हणून त्यानें तिचा अगोदर खून साधला आणि नंतर आत्महत्या केली."

" ऐक ! ऐक मोहन ! कसें चाललें आहे तर्कशास्त्रावर वाक्पांडित्य ! " संजीवन मला म्हणाला. " चंदूनें बिचाऱ्यानें स्वप्नांत देखिल आणलें नसेल असलें पातक त्याच्या माथीं लादण्याचें काम चाललें आहे. आणि हें त्यांच्या नेहमीच्या पद्धतीस, लौकिकास आणि वर्तनास साजेसेंच आहे ! नुसती " आत्महत्या " म्हणून निकाल देऊन थांबले असते तर काय यांच्या पदरचे चार चव्वल खर्च झाले असते ? असतीं नसतीं खोटीं नाटीं विधानें यांनीं काय म्हणून करावी बरें ? खरोखरच कोरोनरची ज्यूरी आणि त्यांचीं कोर्टें इंग्लिश कायद्याचा सदुपयोग करीत नाहींत असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. "

संजीवनची ही गुणगुण कदाचित् कोरोनरच्या कानापर्यंत पोंचली असावी. कारण त्याचा चेहरा लाल होऊन तो जिकडून ती गुणगुण येत आहे असें त्याला वाटलें तिकडे म्हणजे आमच्याकडे रागावून पाहूं लागला.

" आत्महत्या म्हणून निकाल त्या वेळीं दिला गेला असला तरी आम्ही ती केस हातांतून सोडलेली नाहीं अद्याप. अंबूताई देशपांडे यांच्या खुनाची चौकशी आंतून चालूच आहे. पूर्वी बाबासाहेब देशपांडे नांवाचा इसम गांवदेवीस त्याच्या राहत्या घरांत मारला गेला ही गोष्ट स्मरत असेलच. ह्या अंबूताईचाच नवरा तो" इन्स्पेक्टर म्हणाला.

मागली आठवण देतांच कोरोनर विचारपूर्वकदृष्टीनें इन्स्पेक्टरकडे पाहूं लागला. बाबासाहेबांच्या खुनाचा उच्चार होतांना मागच्या सर्व गोष्टी ध्यानांत

येऊन प्रेक्षकमंडळींतहि खळबळ उडाली. इन्स्पेक्टरनें आणखीहि कांहीं गोष्टी कोरोनरला कळविल्या.

चंदूची आत्महत्या म्हणजे एक क्षुल्लक केस आहे असें जे समजत होते, त्यानं हि चंदूच्या खुनाचे अबुताई देशपांडे यांच्या खुनाला आणि अंबूताईच्या खुनाचें बाबासाहेब देशपांडे यांच्या खुनाला सूत जमवून कल्पनेचे किल्ले रचाव-यास सुरुवात केली ! सर्वांना यांत विशेष लक्ष घालण्यासारखें कांहींतरी आहे असे वाटू लागलें ! इंग्लिश व मराठी वर्तमानपत्रांचे रिपोर्टर लेखण्या झटझट चालवूं लागले !

"खऱ्या आहेत म्हणतां ह्या सर्व गोष्टी ?" कोरोनरनें त्या इन्स्पेक्टरला विचारलें.

" निःसंशय खऱ्या आहेत. चीफ् इन्स्पेक्टरच्या सांगण्यावरून मी साक्ष देण्याकरितांच मुद्दाम आलों आहे. गांवदेवीच्या खुनाचा तपास मी परिश्रम-पूर्वक केला असून अंबूताई देशपांडे यांच्या खुनाचाहि तपास सुरू आहे "

" तर मग हा मयत इसम संभावित व्यापारी नसून वाईट चालीचा म्हणजे गुन्हेगारीला वाहिलेलाच माणूस होता असें आपल्याला वाटतें काय ?" कोरो-नरनीं विचारलें.

" होय आम्ही तसेच ठरविलें आहे."

" आपलें डोंबल ठरविलें आहे तुम्ही !" संजीवन कुजबुजला. पूर्वी चंदू कसाहि असो, कदाचित् तो चोरांच्या नायकाचा भागीदारहि असेल; पण शवट—म्हणजे अगदीं अखेरीस तो पोलीसांचा स्वतःच हस्तक बनला होता. तो पोलीसांचा कान बनला होता खरें म्हणावयाचें तर ! निदान या शेवटच्या केस मध्यें तर त्यानें पोलिसला मदत करावयाचें काम आपल्याकडे घेतलें होतें. फार उशिरां निवळला. पण पोलीसचा मला मोठा अचंबा वाटतो आणि त्यालाच खुनी ठरवितात हे दीड शहाणे ! खासा न्याय !"

" निकाल पुढें ढकलावा असें वाटतें कां तुम्हाला ? "

" कांहीं जरूरी नाहीं. जो पुरावा हातीं आला आहे त्याच्यावरून झालेली खात्री पाहतां मयताने ' आत्महत्याच ' केली असें खास ठरतें.

नंतर जणूं काय इन्स्पेक्टरच्या दृढ निश्चयाच्या भाषणानें सर्व जज्ज भारले जाऊन त्यांनीं ठराविक शिक्क्याचा " आत्महत्या ' असा निकाल दिला !

' मस्तक भ्रमिष्ट झालें असतां मयतानें विष खाऊन ' आत्महत्या ' केली ' असा ज्यूरीनें एकमतानें निकाल दिला !



## प्रकरण ३० वें.

### वृद्धा नारी पतिव्रता

त्यानंतर भरपूर एक आठवडा लोटला संजीवन कुठेंच दिसला नाहीं. डॉ. नियोगींची प्रकृति ढांसळूं लागली होती; म्हणून त्यांना बोरीवलीच्या खोऱ्यांतील लांब एकीकडच्या आपल्या बंगल्यांत राहावें लागे. ते हल्लीं आपल्या दवाखान्यांत यावयाचे हळूहळूं बंद होऊं लागले होते, म्हणून त्यांच्याकरिता त्यांच्या सर्व केसीस मलाच पाहाव्या लागत. 'नर्व्हस् डिसॉर्डर्स्'च्या केसीस आता मला नीटपणें चालवतां व सुधारतां येऊं लागल्या होत्या. शिवाय डॉ. नियोगींकडे येणारीं कुळें म्हणजे सर्वच समाजांतील वरच्या दर्जाचीं. अर्थात् त्यांची मर्जी राखून आपलीं कामें करावयाचीं, त्यांना नाखुष करावयाचें नाहीं असा डॉक्टरसाहेबांचा परिपाठ होता; तोच मला सुरू ठेवणें प्राप्त होतें. यामुळें मला आतां मुळींच वेळ मिळेनासा झाला.

संजीवन कुठेंच दिसला नाहीं, एवढेंच नव्हे, तर त्याच्यासंबंधीं कांहीं खबर वार्तादेखिल मिळेनाशी झाली. त्याच्या नेहमींच्या जाण्यायेण्याच्या ठिकाणी मीं पत्रें पाठवून जवळच्या ठिकाणीं प्रत्यक्ष जाऊन पाहिलें, पण संजीवनचा मागमूस नाहीं त्याच्या चहाच्या दुकानांत चौकशी केली तों भागीदाराकडून " कुठें बाहेर गेले " एवढेंच उत्तर मिळालें. यावरून त्यानें हातांत घेतलेल्या प्रकरणाचा पाठपुरावा करण्याचा जो त्यानें निश्चय केला होता त्याच्या मागेंच कुठें तरी तो लांब गेला असावा असें मी मनाशी ठरविलें तथापि मला मुळींच कांहींसुद्धा कळविल्याशिवाय त्यानें एकाएकीं असें गुप्त व्हावें याबद्दल मला वाईट वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. आपण मिळविलेली माहिती त्यानें मला कळूं दिली नाही ती नाहींच, पण निदान जातांना तरी सांगावयाचें होतें.

कस्तुर हल्लीं फारशी बाहेर पडत नसे. तिचा पूर्वीचा आनंद, उल्हास, सर्व—थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तिच्यांतलें चैतन्यच निघून गेलें होतें.

वर्तमानपत्रांतून व लोकांच्या तोंडून चद्रूच्या खूनाचा संबध तिच्या बहि-णीच्या खुनाशी जोडलेला तिनें ऐकला होता. त्यामुळें ती अधिकच भाबावून गेलेली दिसे. माझी जेव्हां तिला गांठ पडे तेव्हां तेव्हां ती जिभ आंखडून धरल्यासारखी फार सांभाळून बोले. कदाचित् कमजास्त शब्द मुखाबाहेर पडतील अशी तिला भीती वाटत असावी. अथवा असें तिला वाटत असावें असें आपलें माझें मलाच वाटत असेल.

माझें तिच्यावर उत्कट प्रेम जीवन सर्वस्व माझें तीच, आणि तिच्या नज-रेवरून तर माझी बालंबाल खात्री होई की ती माझ्यापासून कांहीं तरी गुपित चोरून ठेवीत आहे ! अर्थात् अशा स्थितींत आम्हा दोघांमध्यें मनमोकळेपणा असणें संभवनीय नव्हतें. मी तिला एके दिवशी प्रिन्सेस स्ट्रीटवरील तिच्या आईच्या बिऱ्हाडीं भेटावयास गेलो. वर वर्णन केल्याप्रमाणेच तिची स्थिति हुबेहुब आढळून आली. तिचें बोलणें देखिल त्रोटक—अंतःस्थ विचा-राच्या योगानें चांचरल्य सारखें !

तिच्याशी बोलत मी थोडा वेळ बसलो; पण माझें मन घेईना— तिच्याशी पूर्वीप्रमाणें गप्पा मारावयास. मला किंवा तिला कुणालाच मौज वाटेना. ह्मणून मग तिच्या आईला भेटून मी लगेंच मागें परतलों.

ह्या खेपेस तर माझी पूर्वीच्याहि पेक्षां दृढ खात्री झाली की तिला ह्या दुधारी सुरीच्या रहस्याविषयींची माहिती असलीच पाहिजे. बाबासाहेबांचें भूत अथवा मेलेले बाबासाहेब जिवत, या दोहोंतले कांहीहि एक खरें असो पण तेंच सर्वांत विस्मयोत्पादक कोडें होतें. आणि मला स्वयंस्फूर्तीनच वाटत असें कीं तें कोडें कस्तुरला ठाऊक होतें.

त्या रात्रीं अंधुक प्रकाशांत त्या लताकुंजांतील दंपत्याच्या मागून जात असतां त्या म्हाताऱ्याचा खंगलेला, वाळलेला, म्हातारकळेचा चेहरा, अगदीं जिवंत स्थितींतील बाबासाहेबांच्या चेहऱ्याप्रमाणें मी जसा पाहिला होता, तसाच माझ्या ध्यानीं आला. ह्या दुधारी सुरीच्या रहस्यमालिकेप्रमाणें रहस्यें घडणें फारच क्वचित् सर्वच विलक्षण. कशास कांहीं मेळ ! मला कांहींच कळे ना

नव्हतें. मी कांहीं घडलेल्या गोष्टी डोळ्यांनीं पाहिल्या होत्या खऱ्या; पण त्यांचीं कारणें मला मुळींच उमगत नव्हती.

' नायट्रेट ऑफ् अमील ' अशा सारखें विष चंदूसारखा साधारण माणूस आत्महत्येकरितां पैदा करील हें तर मुळींच शक्य नव्हतें. मी खात्रीनें सांगूं शकतों कीं या कथानकाच्या वाचकांपैकीं जे स्वत: कोणी केमिस्ट अथवा डॉक्टरीपेशाचे गृहस्थ नसतील; त्यांना ह्या विषाचें नांवहि ऐकून ठाऊक नसेल ! ह्या गोष्टीवरूनच मी संजीवनप्रमाणें ठरविलें होतें, कीं चंदूचा कोणी तरी गुप्त रीतीनें विषप्रयोग करून खून पाडला असला पाहिजे.

आस्ते आस्ते पंधरावडा गेला, तरी संजीवनची जाग माग कांहीं नाहीं ! दिवसा मागून दिवस जाऊं लागले. दरम्यान विशेष महत्वाचें असें कांहीच घडलें नाहीं. डॉ. नियोगी हल्लीं अंथरूणावर पडून होते त्यांना सार्यॆटिका ( Seitica ) सारखा विकार जडला होता. जांघेच्या वरच्या व कंबरेच्या खालच्या संधी धरल्यासारख्या होऊन ते आजारी पडले होते. एका रविवारीं मी त्यांना भेटावयास गेलों त्या वेळीं ते अंथरुणांत तळमळत कण्हत असलेले माझ्या नजरेस पडले हल्लीं त्यांचा कृपणपणा फार वाढला होता, पैसा नाहीं म्हणून त्यांना काळजी पडली होती, व समाजाबद्दलचा त्यांचा तिरस्कारहि वाढत चालला होता. आणि त्यांच्या वाईटावर असलेले लोक असल्याच त्यांच्या स्वभावाविषयीं ज्या कांहीं तरी गप्पा उठवीत त्या खोट्या नसाव्यात असें मला वाटूं लागलें होतें. परंतु आपल्या धंद्यांतील—डॉक्टरीपेशांतील—माणसांबद्दल त्यांना जो आदर होता तो तितक्याच जोरानें हल्लीं वाढत चालला होता. डॉक्टर म्हणजे मनुष्य जातीस प्राणदान देणारा धन्वंतरीच—दुसरा जन्म देणारा ब्रह्मदेवच—प्रत्यक्ष परमेश्वरच—असें सर्वांनीं मानलें पाहिजे असें त्यांस वाटे. आतां खासगीरीतीच्या संभाषणांत माझ्याकडे त्यांनीं कित्येक वेळां डॉक्टरीपेशास काळिमा आणणारे लोक आपल्या वर्गांत आहेत हें कबूल केलें होतें, पण तें आंतलें बोलणें. बाहेरून डॉक्टरला कोणी दूषण दिलेलें त्यांना सहसा खपत नसे. डॉक्टरला अगर प्रत्यक्ष त्यांना

इतर लोकांनीं कुचेष्टनें पाहिजे तर खुशाल "यमराजाचे सहोदर" म्हणावें. पण प्रत्यक्ष तोंडावर ? तोंडावर त्यांना डॉक्टरला 'जीवदान करणारा दुसरा विधाता' असेंच म्हणावें लागे ! एकदां या डॉक्टरीचा डिप्लोमा मिळाला कीं त्याला माणसाच्या जीवित्वावर हात चालविण्यास अधिकारच मिळाला व तो माणूस सर्वांकडून आदर घेण्यास लायक झाला असें त्यांचें मत असे. चांगल्या डॉक्टराच्या मनाच्या विरुद्ध वागणें हा गुन्हा समजला जावा असें त्यांस वाटे व तसा कायदा पास करण्याचा अधिकार असता तर तसा कायदाहि पास करण्याचा प्रयत्न आपण केला असता असें देखिल ते केव्हां केव्हां गंमतीनें बोलतां बोलतां बोलून दाखवीत असत. त्यांचीं मतें, त्यांचे विचार, त्यांचे आचार कसेहि असोत नर्व्हस डिसीझसूचे डॉक्टर म्हणून त्यांची प्रॅक्टिस अप्रतिम होती आणि त्यांचा लौकिक तर असाधारणच होता ह्यांत बिलकूल शंका नाहीं.

" त्या दिवशींच्या डॉ. सॉल्ट्वाटरच्या लेक्चरला तूं आला होतास ना ? " मी त्यांच्याजवळ बसून दवाखान्यांतल्या केसीसच्या हकीगती सांगत होतों. त्या ऐकत असतां मध्येंच हा त्यांनीं प्रश्न टाकला होता. " पण तूं जाणार हें मला अगोदरच नाहीं कसें कळविलेंस ? " ते पुढें म्हणाले.

"मी जाणार हें मला तरी कुठें ठाऊक होतें तर तें मी तुम्हांला कळवावें ?"

" तर मग कसा गेलास ? "

" माझ्या एका मित्रानें मला नेलें. ? "

" संजीवननें ना ? "

" होय. "

" त्या डिटंविट्व्हनें तुला तेथें नेलें म्हणावयाचें तर ! अँ ? " डॉ. साहेब हांसत म्हणाले. " बरें ! एकंदरींत लेक्चर कसें काय झालें ? मजेदार वाटलें नाहीं ? "

" फारच बाहारीचें ! त्यांतहि सरते शेवटीं तुम्ही स्वतः जी माहिती दिलीत ती तर अत्यंत आश्चर्यकारक होती. डॉ. सॉल्टवॉटर बरोबर आपला पत्र-

व्यवहार सुरू होता व ते तुमचा आणि तुह्मी त्यांचा या नवीन शोधांत सल्ला घेत होतां हें मला ठाऊकहि नव्हतें. सर्वच तुह्मी गुप्त राखले होतें ”

डॉक्टरसाहेब जरासे हासले आणि नंतर ह्मणाले—

“ आजच्या जगात जर कांहीं नवीन शोध लावावयाचे झाले किंवा कांहीं विशेष महत्वाचें संशोधन कार्य करावयाचें असेल तर त्याचा लोकांस सुगावा लागूं देतां नये. मोहन ! मी काय ह्मणतों हें ध्यानांत ठेव. तूं प्रथम विलायतेहून आल्यावर माझ्याकडे राहण्याकरितां ह्मणून आलास, त्याच्या पूर्वी आपली ओळख पाळख कांहीं नाहीं पण इतक्या काळांतल्या सहवासानें तूं माझ्या जिव्याळ्याचा होऊन बसलास. मी माझी सर्व प्रॅक्टिस्—सर्व कारभार तुझ्यावर सध्यां संपविला आहे. आणि लवकरच तूं आतां माझ्याप्रमाणेंच लौकिक मिळविशील असेंहि मला खात्रीपूर्वक वाटू लागलें आहे तेव्हां यशस्वी होण्याची माझी सर्व तंत्रें तुला सांगून टाकणें हें मी माझें कर्तव्य समजतो. तेव्हां आपल्या शोधांत यश येण्याची खात्री झाली, पूर्व तयारी सर्व सिद्ध झाली ह्मणजे त्याचा एकदम पुकारा झाला असतां त्याचा जनमनावर तात्काळ परिणाम होतो. मी एव्हां माझे शोध उघडकीस आणणार नव्हतों. परंतु परवां सर्वच अकस्मात् घडून गाले. मला देखिल तुझ्याप्रमाणेंच लेक्चरला जावें लागणार असें आगाऊ ठाऊक नव्हतें.

“ कसेंहि असेना ? तुमच्या त्या दिवशींच्या व्याख्यानाचा श्रोत्यांच्या मनावर फारच चांगला परिणाम झाला. ' मी हांसत ह्मणालों, “सर्वांनाच ती एक अपूर्व गोष्ट वाटली असून सर्व हॉस्पिटलांतून, डॉक्टर लोकांमधून, मेडिकल निद्यार्थ्यांतून तीच एक गप्पांचा विषय होऊन बसला आहे. ”

“ हं ! असें ह्मणतोस ? माझे शोध ह्याच्याहि पुढें चालले आहेत. शरीरोग्यावर असले प्रयोग गुप्तपणें इतरांस कळूं न देतां करावे लागतात. माझे शोध पुढें पूर्णावस्थेस पोंचतील तेव्हां सर्व जग तोंडांत बोट घालील ! डॉ. सॉल्टवॉटर तर काय जगांतले सर्वच डॉक्टर आश्चर्यानें थक्क होतील. ”

मी हें भाषण ऐकत होतों. तेहि जरा स्तब्धच राहिले. भावी स्थितीचें काल्पनिक चित्र त्यांच्या समोर उभें राहिलें नंतर आह्मीं धंद्याविषयींच्या कांहीं

गप्पा केल्या. त्या सर्व ऐकणें सर्वांलाच कांहीं आवडणार नाहीं. नंतर एकदम डॉ. नियोगी ह्मणाले—

" आतां मी ह्मातारा होत आहें मोहन ! मला वारवार दुखणीं होतात, आणि माझी प्रकृति क्षीण होत चालली त्यामुळे मला त्या मुर्ख बायकांच्या कौटुंबिक कादंबऱ्या ऐकावयाचा कंटाळा येऊं लागला आहे. जरासें डोकें दुखरें किंवा नवऱ्याची वर्तणूक बिघडली, तरी त्यांला वाटतें त्यांत स्नायूचा विकारच आहे ! श्रीमंत बायांचीं असलीं खुळें फार त्रासदायक वाटतात आणि आता धंद्यातून मागें पाऊल घ्यावें असें मला वाटूं लागले आहे. प्रथमारंभीं तुझ्या सारखाच मी एका नामांकित डॉक्टरकडे प्रॅक्टिस् मिळाविण्याकरितां होतों, तेव्हांपासून आतांपर्यंत मी पुष्कळ त्रास सोसला. आतां लवकरच मला घरीं बसावें लागेल. मला ही धंद्याची यातयात आतां सोसत नाहीं. "

" छे ! छे ! इतक्या लवकर ! इतक्या लवकर आपण धंद्यांतलें आंग काढूं नये आणि तुम्ही तसे म्हटलें तरी कुळें तुम्हाला थोडींच घरीं बसूं देणार ? "

"तें कांहीं नाहीं. मला ती दगदग आता मुळींच सोसत नाहीं. ओय्-य्-य् " डॉक्टर विव्हळूं लागले "हें पाहिलंस मोहन ! कशी कळ येते ती ! मला आतां जास्त दिवस आयुष्य नाहीं असें वाटतें ! आपला नांवलौकिक असेपर्यंतच घरीं बसलेलें बरें. माझ्या मागून तूं माझ्या इतकाच लौकिक मिळविशील अशी मला खात्री वाटत आहे "

हें शेवटचें वाक्य माझ्या अगदींच अपेक्षेच्या बाहेर होतें. आपली सर्व प्रॅक्टिस डॉ. नियोगी माझ्या स्वाधीन करतील ही कल्पना कधीं माझ्या स्वप्नांत देखिल आली नव्हती. परंतु तसें होईल तर केवढें तरी छान होईल असें मला वाटलें. असली संधि फारच थोड्यांना मिळते. त्यांचीं सर्व कुळें माझ्या ओळखीचीं झालीं होती आणि त्यांच्यातर्फे मी कळकळीनें आणि परिश्रमपूर्वक काम करीत असें ही गोष्ट खरी; पण डॉ. नियोगी मला आपली प्रॅक्टिस लावून देतील असें मला कधींच वाटलें नव्हतें. मी डॉक्टरसाहेबांना मनांतल्या मनांत पुष्कळ अभीष्ट चिंतिलें. खरोखर डॉ. नियोगी आरंभापासून माझे आश्रयदाते आणि

हितकर्तें होते. मला वाटतें ईश्वर फार दयाळू आणि न्यायी आहे. कारण ज्यांचें मूळ हीन त्यांचा परिणाम तेजस्वी करण्याचा ईश्वराचा नियम आहे असें माझ्या मनाला वाटे मात्र त्याला स्वतःच्या उद्योगाचें साहाय्य आहे. माझ्या स्वतःच्या आयुष्यावरून मला वाटे "God helps those that help themselves." स्वतःच्या पायांवर उभे राहणाऱ्यांनाच ईश्वर आपला हात देतो. मागची पुढची सर्व आठवण होऊन मला त्या वेळीं माझें सर्व जीवित डोळ्यांपुढें दिसूं लागलें आणि मी परमेश्वराचे अनंत आभार मानले.

" माझ्याकडे येणारे सर्व स्त्रीरोगी मोहन ! तुला ओळखतात." डॉ. नियोगी पुढें म्हणाले; " तेव्हां माझीं कुळें कोणाकडे जातील तर तीं तुझ्याचकडे ! दुसऱ्या अनोळखीच्या परक्या डॉक्टरांकडे असले स्त्रीरोगी सहसा जावयाचे नाहींत. मात्र त्यांनीं आपलीं कौटुंबिक कथानकें सांगून जसा मला नको जीव करून टाकला तसा मात्र तुला त्रास देऊं नये अशी माझी ईश्वरापाशीं मागणी आहे ! " इतकें म्हणून विव्हळत असतांच डॉ. नियोगी जरासे हंसले.

" तवढें मात्र एक वाईट आहे खरें या धंद्यांत. मला इतक्यांतच आपण म्हणतां या गोष्टीचा बराचसा अनुभव आला. बऱ्याचशा बायकांकडून घरगुती गोष्टी ऐकण्याचा मला प्रसंग आला. त्या प्रथम सांगत नाहींत. त्यांच्या ठिकाणीं लज्जा ही आहेच. परंतु नाइलाज होऊन त्यांना सांगावें लागतें. वैद्याकडे आणि डॉक्टरकडे कांहीं एक लपवून न ठेवतां सांगितलें पाहिजे असें त्यांना खरोखरच वाटत असतें. आणि बऱ्हंशीं तें खरेंहि असतें, पण लज्जचा पगडा असा कांहीं विचित्र आहे कीं प्रथम तो किल्ल्याच्या तटापेक्षा देखिल दुर्भेद्य असतो; पण सहवासानें तो कांचे पेक्षां देखिल पारदर्शक होतो ! प्रथम हीं कुळें तुम्ही वयस्क म्हणूनच तुमच्याकडे बोलत असतील असें मला वाटे; परंतु शेवटीं मला देखिल तुमच्याकडे जशा त्या निर्भीडपणें सांगत तशा निर्भीडपणें जरी नाहीं तरी हळूहळू आपल्या गोष्टी सांगूं लागतात. "

डॉ नियोगी हांसले.

" मोहन ! बायकांचा स्वभाव मी जाणतों ! तुला अजून त्यांच्या स्वभावांची पारख झालेली नाहीं. जगांत बायकांच्या स्वभावाचेंच नव्हे, तर इतरहि बऱ्याच गोष्टींचें ज्ञान तुला अद्याप मिळावयाचें आहे. तुला जेव्हां बायकांचा स्वभाव पूर्णपणें कळेल, तेव्हां तूं त्यांचा माझ्याप्रमाणेंच तिरस्कार करूं लागशील. आज तुला बायकांच्या चाळ्यांची मौज वाटत आहे. उद्यां तुला त्यांचा राग येऊं लागेल. मला हा खुळा समाज ' स्त्रियांच्या प्रगतीचा विरोधक' म्हणून ओळखतो ! असेनहि तसा मी कदाचित् ! पण मला, तसें बनायला तरी ह्या स्त्रियांच्या स्वभावाचा अनुभवच मूळ कारणीभूत झाला आहे. "

" आज या एवढ्या मुंबई शहरांत या धंद्यांत स्वानुभवानें अधिकारी वाणीनें तुमच्या इतकें दुसरा कोणीहि बोलूं शकणार नाहीं. आणि या तुमच्या अनुभवावरून तर मला माझ्या धंद्यांत पुढें फारच त्रास सोसावा लागेल अशी भीती वाटूं लागते ! " मी पुढच्या स्थितीविषयीं जरासें भिऊन म्हटलें.

"भीती वाटूं लागते !" माझ्या डोळ्यांकडे डोळा लावून डॉक्टर आंथरुणावरूनच म्हणाले—"भीती वाटते—कोणाची बायकांची ! आणि लग्नहि करावेंसें वाटतें ! अँ ? हंः ! त्या पोरीवर—कस्तुरवर तुझें प्रेम बसलें आहे ! चालायचेंच ह्या वयांत हे प्रेमाचे खेळ. हे असेच सर्वांचे चालतात. त्या खेळांचें कांहीं चालूं न देण्याला धीराचे मनोनिग्रहि, आत्मसंयमी व दृढनिश्चयी पुरुष लागतात. परंतु माझ्या सहवासांत तुला जो कांहीं बोध झाला असेल आणि माझ्या कुळांच्या सहवासांत जो कांहीं अनुभव आला असेल त्यावरून तरी हें लग्नाचें वेड आणि प्रेमाचें खूळ तुझ्या डोक्यांतून उतरावयास लागेल तर बरें होईल असें मला वाटतें. "

"कस्तुरवर माझें प्रेम होतें, आहे व पुढेंहि असेल व तिच्याशीं लग्न करावयाचेंहि माझें ठरलें आहे. पण त्यानें काय वाईट होईल मला समजत नाहीं. " मी स्पष्टपणें व धीटपणेंच उत्तर दिलें.

" तर मग प्रॅक्टिस्ची आशा करूं नकोस डॉक्टरनें जन्मभर ब्रह्मचारी राहिलें पाहिजे ! तो ब्रह्मचारी असल्याबद्दल स्त्रीरोग्यांची खात्री झाली पाहिजे !

त्याशिवाय त्या कधींहि जवळ येणार नाहींत. त्या आपल्या घरगुती गोष्टी सांगतील त्या आपण दुर्लक्षपूर्वक ऐकावयाच्या ! तसेंच एकंदर चालीरीतींत त्यांना संशय येईल असली वर्तणूक दिसूं द्यायची नाहीं. पोशाख व खाणेंपिणें हीं साधीं ठेवायचीं. त्यांच्याशीं वाजवीपेक्षां फाजील भाषण वगैरे करायाचें नाहीं. त्यांचीं संगत सहवास होतां होईल तों टाळावयाची व आपल्या वर्तनांत धार्मिकता असल्याचें दाखवायाचें. श्रीमंत कुळ नसेल तर पुष्कळ वेळां गरीब बाया बापड्यांस धर्मार्थ फुकट औषधें द्यावयाचीं. नाटकें, सिनेमा, जलसे वगैरे ख्यालीखुशालीच्या व चैनीच्या जितक्या गोष्टी असतील तितक्या वर्ज करावयाच्या असें कडक ब्रम्हचर्य पाळल्याचें लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आलें, तरच त्या अविवाहित ब्रम्हचाऱ्याकडे स्त्रीरोग्यांचें पाऊल पडेल, नाहींतर नाहीं. तरी देखिल पडेल—पण तें खालच्या दर्जाच्या म्हणजे वारांगनांसारख्या बायका येतील, पण कुलशीलवान बायका येणार नाहींत. मी तुझ्याएवढा असतां मला तुझ्याचसारखें वाटे, पण मी लवकरच आयुष्यक्रमांत फरक केला. आणि अविवाहित राहून ब्रम्हचर्य पाळलें, तेव्हांच बाबा ! या पदवीला पोंचलों. नाहींतर काय ! गल्लीकुचींतला डॉक्टर बसला आहे पाटी लावून ! ”

मी हें व्याख्यान लक्ष्यपूर्वक ऐकलें आणि मग उत्तरादाखल नुसतें स्मित केलें. त्यावर आमचें भाषण डॉ. नियोगीच्या धंदा सोडण्याच्या विषयाकडे लागलें ते लवकरच म्हणजे सहा महिन्यांत मुंबई शहर सोडून शेवटचें आयुष्य बालविण्यास बनारस, कलकत्ता वगैरेकडे जाणार होते.

मी पुढच्या आयुष्यक्रमाविषयीं विचार करीत मुंबईस आलों. तों टेबलावर पाकीट पाहिलें. अक्षर संजीवनचें होतें. त्यांत पुष्कळ दिवस पत्र न पाठविल्याबद्दल व सांगितल्याशिवाय गेल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून त्याच दिवशीं आपण येणार असल्याचें त्यानें कळविलें होतें. मी दवाखान्याचें काम केलें आणि बिऱ्हाडीं येतों तों संजीवन माझीच वाट पाहात बसलेला मला आढळला.

मी त्याला रहस्यभेद कथनाविषयीं पुष्कळ आग्रह केला. कुठें कुठें गेलास ? काय काय केलेंस ? म्हणून विचारलें, पण उत्तर म्हणून नाहीं. कितीहि —

लग मित्र असला तरी अखेरपर्यंत मूकवृत्ति धारण करावयाची हा त्याचा स्वभावविशेष. इकडे तर काम चालूंच असावयाचें आणि जीभ मात्र बंद ! हेच गुण कार्यकर्त्यास आणि विशेषेंकरून डिटेक्टिवास आंगांत आणावे व वाढवावे लागतात.

लवकरच त्या रात्रीं सायंकाळीं बोरीवलीस जाण्याच्या तयारींत राहावयास मला त्यानें सांगितलें. मी त्याला त्या दिवशींच सकाळीं तिकडे जाऊन भेटून आल्याचें कळविलें. पण तें सर्व आपणास ठाऊक असल्याचें दर्शवून तो आणखी म्हणाला—

" डॉक्टरसाहेब आजारी आहेत ना फार ? "

मी होय म्हटलें पण आश्चर्यस्तंभित झालों.

" तुला आश्चर्य वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. सर्व मजकूर तुला लवकरच आपोआप कळेल. मी खूण करण्याबरोबर तयारींत अस " असें म्हणून तो निघून गेला.

तो गेल्यावर मी प्रिन्सेस स्ट्रीटवर अंबुताईच्या आईकडे गेलों व तिची प्रकृति किंचित् सुधारत आहे असें पाहून समाधान मानीत कस्तुरची चौकशी केली, तों मी तिला बोलावल्यावरून ती माझ्या दवाखान्याकडे कीं बिन्हाडाकडे गेली असें कळलें.

मी तिला बोलावलें नव्हतें. परंतु कांहीं तरी दगा आहे हें मी तेव्हांच समजलों आणि लगेच सावध होऊन उत्तर दिलें—

"होय, पण तिची वाट पाहून मी इकडे आलों. चुकामूक झाली असेल." असें बोलून मी दवाखान्याकडे जाऊन बिन्हाडींहि पाहिलें तों कस्तुर तेथें नव्हती ! माझ्या तंगड्या कांपूं लागल्या ! दगा झाला हें तर मी ओळखलेंच ! पण [illegible]रला नेली कोठें—कोणी—आणि कशाकरितां हें मला समजेना. इतक्यांत मला संजीवनची खूण ऐकूं आली.

---

## प्रकरण ३१ वें.

### गोपन—स्फोट !

आम्ही दोघे निघालों ते लवकरच बोरीवली स्टेशनवर पोंचलों. स्टेशनवर लांब एका बाजूस बरेच पोलीस जमा झाले होते. त्यापैकीं एक तुकडी आम्हीं उतरल्याबरोबर बोरवली गावाच्या रस्त्यानें निघून गेली व काळोखांत दिसेनाशीं झाली बाकीचे तेथेंच राहिले. संजीवन माझ्याजवळून निघाला अणि त्या पोलीसाशीं कुजबुजत राहिला.

सुमारें अर्धा तासपर्यंत आम्हाला तिथें राहावें लागलें. माझा तर जिवांत जीव नव्हता. कस्तुरचें काय झालें हेंच मला समजत नव्हतें. बरें म्हणून संजीवनबरोबर न येतां मी घरीं राहून तरी काय करणार होतों? मला एकट्याला त्याच्या मदतीशिवाय कस्तुरला शोधून काढतां येणें शक्य नव्हतें. व त्याच्याकडे तर यासंबंधीं बोलण्याची सोयच नव्हती. कारण तो इतक्या घाईंत गुंतला होता कीं मी शेपटीसारखा त्याच्या मागें लोंबकळत राहिलों होतों; तरी देखिल आपल्या मागें काळजींत पडलेला कोणी प्राणी आपल्या एका शब्दाकरिता अगदीं काकुळतीस आला आहे, याचें त्याला भानहि नव्हतें. इतक्यांत ही संधि साधून मी कस्तुरच्या नाहींसें होण्याच्या गोष्टीला सुरवात करणार तोंच " कस्तुर बरोबर तुझें लग्न लागण्याचा वेळ आतां अगदी जवळ आला आहे " असें म्हणून तो हांसला. मला त्याच्या त्या हांसण्याचा मनातून अतिशय राग आला. मी पडलों होतो कोणत्या संकटांत ? आणि याला थट्टा सुचते ? हें प्रेमाचें लक्षण ? का मैत्रीचें ? का सौजन्याचें ? का सहृदयत्वाचें ? कसलें बरें हें लक्षण ? क्रूरतेचें नव्हे काय ?

इतक्यांत त्यानें मला आपल्याबरोबर चालावयास खूण केली. पोलीस तेथून नाहींसें झाले. आम्ही दोघे काळोखांतून चाललों होतों. वाट माझ्या चांगल्या परिचयाची होती. परंतु संजीवन देखिल परिचित् माणसाप्रमाणें झपाझप चालतांना पाहून मला मोठें नवल वाटलें चालतां चालतां आपण

मागेपर्यंत बिलकूल एक अक्षरहि बोलायचें नाही अशी त्यानें मला सूचना करून ठेवली होती. पुष्कळ वेळपर्यंत चालून गेल्यावर डॉ. नियोगींचा बंगला आला पण संजीवन तेथेहि न थांबतां सारखा समोरच पुढेंपुढें चालला होता. ह्या ठिकाणी त्यानें पुन्हा एकवार आपल्यामागून चालण्याची मला खूण केली.

डॉ. नियोगींचा बंगला अगोदरच गांवाबाहेर होता. आणि आतां तर आम्ही बोरीवलीच्या लेण्याजवळ नेणाऱ्या वाटेच्या कांठच्या रानांत शिरत होतो. आतां साडे दहांच्या सुमार झाला होता. केव्हां वाटेनें तर केव्हां आड वाटेनें असे पायाखाली न बघतां आम्ही कसे बसे वाट काढीत होतों संजीवनच्या या निशाचरत्वाचा मला अर्थ कळेना. आम्ही चाललों असतां एका झाळींत शेजारींच काही सुरसुरल्याचें मी ऐकलें. पण संजीवनचें तिकडे लक्ष नव्हतें ! इतक्यांतच फार दूर अंतरावर काळोखात एक भयंकर उंचच उंच कृष्णाकृति उजवीकडून डावीकडे जातांना मला दिसली ! माझे आंग थरारलें व कांटा उभा राहिला संजीवनचें काहीं नाहीं ! होता होता शेवटीं संजीवन एका झोपडीकडे जाऊं लागला. ह्या ठिकाणी त्यानें मला पाऊलाचा देखील आवाज होतां नये अशी इशारत दिली. त्या झोपडीत अंधुक दिवा दिसत होता मला जेथल्या तेथें राहावयास सांगून संजीवन काळोखांत नाहींसा झाला, तो दहा मिनिटांनी आला; आणि फारच जलदीनें परत मागें चालू लागला. या झोपडीत कांहीं खणल्यासारखा आवाज होत होता तो ऐकून मात्र मला भीति वाटली.

तो पुढें आणि मी मागें ! आजमासें पंधरा वीस मिनिटांनीं आम्ही पुन्हा डॉ. नियोगींच्या बंगल्याकडे आलो बंगल्यांत सर्वत्र सामसूम होतें. दारांत त्यांचा नोकरहि नव्हता. सर्वत्र काळोख.

आम्ही दाराजवळ जातों तर कोणी एक स्त्री आंतून हुंदक्यांच्या जोरांबरोबर रागानें बोलत आहे—आपल्या समोरील कोणा तरी पुरुषाचा तिरस्कारपूर्वक धिःकार करीत आहे असें ऐकून आम्ही चकित होऊन गेलो. तिचें बोलणें संप-

त्याबरोबर आंत धडपड झाल्याचा आवाज आला आणि त्याच्या मागून दाब-लेल्या तोंडाचा किंकाळी मारण्याचा प्रयत्नहि ऐकूं आला.

इतक्यांत संजीवन म्हणाला—

" डॉक्टरसाहेब ! दार उघडा, उघडा लौकर. ? "

हे शब्द संजीवन बोलला, असें मी तुम्हांला आतां सांगतों आहें. पण ज्या वेळीं हे शब्द संजीवनच्या मुखा बाहेर पडले त्या वेळीं एकदम दोन पावले मागें सरकून मी काळोखांत कोणी स्त्री उत्पन्न झाली कीं काय हें पाहण्याकरितां डोळे फाडून पाहूं लागलों: इतका हुबेहूब आवाज त्या वेळीं संजीवननें काढला. म्हणून त्याला पुढील प्रश्न डॉक्टरनीं आंतून केला.

" कोण ? चंपी ! "

" होय, तीच पण दार उघडा लौकर. "

" काय आहे ? "

" दार उघडा म्हणजे सागतें. "

" तिथूनच सांग काय तें ? "

" अं हं, नाहीं तर मी जाऊं ? "

" आणखी बरोबर कोण आहे ? "

" कुणी नाहीं. वेळ घालवूं नका म्हणतें ना ? "

" थांब हं ! " असें म्हणून डॉ निरोगीनीं एका हातानें कडी काढली. आंतील दिव्याच्या अंधुक प्रकाशांत आम्हाला काय दिसलें ? डॉक्टर साहेबांचा दुसरा हात कस्तुरनें ओरडूं नये म्हणून तिच्या तोंडांत सारलेल्या बोळ्यावर गुंतला होता.

आम्हाला पाहण्याबरोबर त्या बोळ्यावरचा त्यांचा हात सुटून खालीं आला, आणि विलक्षण रागीट व भयचकित मुद्रा करून डॉक्टरसाहेबांची स्वारी चार पावलें मागें सरकली. ती त्यांची नसली मुद्रा मी स्वतः जन्मांत कधीं पाहिली नव्हती.

इतका प्रकार होत आहे तोंच कस्तुर आमच्या पाठीमागें अगदीं माझ्या-जवळ येऊन बिलगली. ती भीतीनें कांपत होती. एका प्रकारें कस्तुर जिवा-निशीं भेटल्याबद्दल मला बरें वाटलें खरें, पण पुढयांतला एकंदर प्रकाराचा उलगडा मला कसा होणार ? संजीवन हा सारा प्रकार शांतपणें पाहत होता.

मी मागें वळलों आणि म्हटलें—

" हा काय सगळा प्रकार आहे सांग बघूं लौकर ? "

सर्व प्रकाराबद्दल मला निरनिराळे अनेक संशय उत्पन्न झाल्यामुळें मी तिला दटावून विचारलें.

ती आपलें लटलट हालणारें आंग सांवरून थाट उभी राहून मला नीटपणे उत्तरें देण्याची तयारी करूं लागली, पण तितकी तिच्या आंगांत त्या वेळीं शक्ती नव्हती. आणि आह्मी सावकाशपणें आत आल्यामुळें आपल्या पूर्वीच्या भाषणापैकीं कांही भाग आमच्या कानावर पडला असेल अशी तिला भीति वाटत होती.

अशा विचारांत माझ्या प्रश्नाचें उत्तर दिल्याशिवाय स्तब्ध आहे असें पाहून संजीवन पूर्ण शांतपणें पण जोरानें ठांसून तिला ह्मणाला—

" कस्तुरबाई ! गावदेवीच्या खुनाबद्दलची सर्व हकीगत तुह्माला माहीत आहे. आतां ती सर्व सांगण्याशिवाय गत्यंतर नाहीं. सर्व हकीगत स्पष्ट, कांहीं एक चोरून न ठेवतां, मनमोकळेपणानें सांगण्यांतच तरणोपाय आहे. यापुढें आतां ढोंग करून कांहींच फायदा न होतां उलटा तोटा मात्र होण्याचा फार संभव आहे. "

हे शब्द कानांत पडतांच तिनें एकवार डॉ. नियोगीकडे नजर फेंकली; आणि मग निश्चयीस्वरानें तिनें बोलण्यास प्रारंभ केला—

" आतांपर्यंत बाहेर उघडकीस न आलेल्या अशा पुष्कळ गोष्टी मला ठाऊक आहेत खऱ्या ! पण आतां त्या सर्व मी बाहेर टाकीत आहे. ह्या गोष्टीत देवाला ठाऊक आहे—मी अनेक प्रकारें छळ सोसला आहे. आणि आतां मी

सर्व गुप्त गोष्टी जगापुढें मांडीत आहे. आतां ह्यांत गुप्त कांहीं राहावयाचें नाहीं. मी आतां जें बोलणार तें पोटांत ठेवण्यास मला देखिल फार जड झालें होतें. पण आतां ईश्वरसाक्ष–ईश्वरासमोर बोलतें आहें—असें समजून मी आपणास- मोर सर्व कांहीं सांगत आहे " माझ्याकडे पाहत ती म्हणाली " मी आपणास ईश्वरच समजतें."

इतकें बोलून ती थांबली. अझून तिच्या आवाजांत कांपरा होती. तिनें एक श्वास घेतला: आणि पुन्हा नाठ राहून बोलूं लागली.

" ताईचें लग्न झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं ती मामांच्या घरीं वसईजव- ळच्या एका गांवीं गेली होती. तेथें एका रात्रीं तिला कोणी भिवविली; कीं ती आपोआप भ्याली—पण भ्याली एवढें खरें. पुष्कळ आंगारे धुपारे झाले. पण त्या वेळीं कांही गुण आला नाहीं. पुढें पुढें ती सुधारल्यासारखी दिसूं लागली. नंतर ती आपल्या नवऱ्याबरोबर राहाण्याकरिता इथें मुंबईस आली. बाहेरून दिस- ण्यांत ती पूर्वीप्रमाणेंच दिसे पण तिचीं वागणूक मात्र भित्रेपणाची व एकक ल्लीपणाची अशी जराशी चमत्कारिकच झाली होती. बाबासाहेबांकडे डॉक्टर—" इतकें म्हणून तिनें. डॉ. नियोगींकडे पाहिलें व जरा अडखळली. पण नंतर तिनें आपली कथा पुढें सुरू केली.

" डॉक्टर नियोगी नेहमीं येत. प्रथम डॉक्टर या नात्यानें बाबासाहेबांला यांची ओळख झाली असेल; पण पुढें हे एकमेकांचे मित्र बनले. बाबासाहेबांचें त्यांच्या सल्ल्यावांचून पान हालेनासें झालें. अर्थात् त्यांच्या नजरेस आमची ताई पडत असेच. फक्त यांचा चंचु प्रवेश झाला पाहिजे होता. बाबासाहेब सीक असले तरी अंथरुणास खिळून नव्हते ते ताईला घेऊन बॅकबेवर फिराव- यास पूर्वीप्रमाणेंच जात. परंतु ही रात्रीं काळोखांत भिते, केव्हां तरी स्वप्नांत आंग टाकते व बळरते इतकीच माहिती बाबासाहेबांस होती. तेवढ्यावरून त्यांनीं तिला ह्या डॉक्टरांस दाखविली. झालें ! तेव्हांपासून तिची स्थिति फारच चमत्कारिक झाली. बाहेरून दिसावयास सणसणीत; परंतु एरवीं मात्र ती अगदींच बिघडली. तिला स्वतः कांहीं समजेनासें होऊं लागलें. मेंदू

अशक्त झाला—मेंदूचा समतोलपणा नाहींसा झाला. एखाद्या लहान मुलाप्रमाणें स्वतःच्या बुद्धीनें नव्हे तर दुसरें कोणी काय सांगेल तें ऐकूं करूं लागली. इतकें असतें तरी हरकत नव्हती. पण ऐकावयाचें ते तरी तिच्या मनास येईल त्याच व्यक्तीचें आणि मनास कोणाचें व काय येतें हेंहि समजण्यासारखें नव्हतें. तिला काय भावना होती तें ह्या डॉक्टरांनीं तेव्हांच ओळखलें. आणि तिची तर वर्तणूक अशी बिघडत चालली होती. माझी ताई खरी पतिनिष्ठ स्त्री होती. पति उतार वयाचा असला तरी एकवार पतिपत्नीचें नातें जडल्यावर त्यांच्याशीं मनोनिग्रहाच्या बाण्यास बाध येईल असें कोणत्याहि प्रकारचें वर्तन करणारी माझी ताई नव्हती. परंतु असें असूनहि ह्या बिघडलेल्या मेंदूमुळें ती लहरी अन्यछंदानुवर्ती बनली खरी. आणि म्हणूनच ती गांवांत नाटका सिनेमांच्या आमंत्रणांस आपल्या मैत्रिणींस नकार देईनाशी झाली. एखादी मैत्रीण प्रत्यक्ष भेटून तिनें गळ घातली की हिला तिचा आग्रह मोडवत असे. परंतु हें सर्व वेळेवर व लहरीवर अवलंबून. ती लवकरच आस्ते आस्ते वहावत चालली आणि तिचा स्वभाव ओळखणाऱ्या एका मनकवडयाच्या कचाट्यांत सांपडली."

"पण ही इतकी हकीगत सांगण्यापूर्वी बाबासाहेबांच्या मृत्यूची खरी हकीगत सांगितली पाहिजे होती." संजीवन मध्येंच म्हणाला. "तें प्रथम सांगा. मी पूर्ण जाणतों कीं तुम्हाला ती सर्व हकीगत माहीत आहे. आणि पुन्हा असेंहि सांगतों कीं अंबूताईनें आपल्या नवऱ्याला मारिलें!"

"अंबूताई–खुनी—तिनें खून केला!" मी उद्गारलों

"हाय हाय!" कपाळावर हात ठेवून मान खालीं घालून दुःखानें कस्तुर म्हणाली "आपण म्हणतां तें खरें आहे. ताई तर आतां मृत्युलोकींच्या मांगांच्या हातांतून निसटून गेलीच आहे, तेव्हां खरी गोष्ट आतां गुप्त ठेवण्याचें काम उरलें नाहीं. ताईनेंच बाबासाहेबांस मारलें! एके रात्रीं बाहेरून कुठूनशी ती घरांत आली, कोणास चाहूल लागूं न देतां माडीवर चढली आणि तिनें पुढचें कृत्य केलें!" तिचें अंग थरारलें.

"पण दुधारी सुरीची जखम! दुधारी सुरी तिला कुठें सांपडली?" मी विचारलें.

"दुधारी सुरी कुठची सांपडणार? बाबासाहेबांच्या टेबलावर अणकुचीदार टोंकांची कातर होती ती आपणा सर्वांच्या पाहण्यांत होतीच. तुह्मांला ती आठवत असेल सुमारें आठ इंच तिची लांबी होती. तिचा हातांत धरावयाचा भाग हस्तिदंती आणि तिचें केस मोरोको लेदरची होती. ती जखम चमत्कारीक असें आपण सर्वांनी ठरवलें पण तरी ती नाहीं कातर आंत भोंसकल्यानंतर बाहेर काढण्याच्या खटपटींत तिने तिची दोन्ही पातीं पसरून पुन्हा जवळ केलीं असावीत त्यामुळें आपणा सर्वांस मोठमोठ्यांस घोटाळ्यांत पाडण्यासारखी ती जखम बनली! त्या रात्रीं मला माडीवर खडबड ऐकूं आली, तेव्हां बाबासाहेबांना कांहीं तरी पाहिजे असेल ह्मणून त्यास विचारण्याकरितां मी खालून वर गेलें. मी वर चढतें आहें तों दरवाजावरच मला ताई दिसली. तें भयंकर कृत्य तिनें ज्या शस्त्रानें केलें होतें, ती कातर तिच्या हातांत, दिसण्यांत मस्तकफिऱ्या माणसासारखी अथवा पिशाच्चानें पछाडल्यासारखी आणि आपली दृष्टि सारखी समोर माझ्याकडे लावून ती तेथेंच उभी राहिली! तो क्षण आणि तो देखावा माझ्या डोळ्यांसमोरून कधींच जायचा नाहीं. मरेपर्यंत मी विसरणार नाहीं ती घटका. तिला बाजू देऊन झटक्यासरशी मी माडीवरून बाबासाहेबांच्या खोलींत शिरलें आणि घडलेला सारा प्रकार प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिला. लागलींच आतां ताईचें रक्षण कसें करावें हा विचार माझ्या मनांत अगोदर आला. तिला माझ्या मागे यावयास कानांत सांगून मी तिला माडीवरून खालीं आणून रस्त्यावर आणली आणि सुदैवानें त्याच वेळीं तिथून एक गाडी चालली होती तिच्यांत बसवून तिला त्या आमच्या मैत्रिणीच्या घरीं मीच पोंचती केली. आधल्या दिवशीं संध्याकाळीं ती तिकडेच रमली होती. नंतर मागील दारच्या परड्यांतील मातीच्या ढिगाऱ्यांत मी ती कातर अनेक वेळां खुपसून तिच्यावरचे रक्ताचे डाग नाहींसे केले; आणि शेवटीं उंचशा जागेवर उभी राहून अंगच्या सर्व जोरानें ती कातर लांब फेकून दिली. ती दुसऱ्या एका बागेच्या कुंपणाच्या झुडपांत जाऊन अडकली. तिथून ती कोणास सांपड-

णार नाही अशी माझी खात्री होतीच. ताबडतोब मी गेल्या वाटेनें आंत आले आणि जागच्या जागीं जाऊन निजलें."

"त्या वेळीं किती वाजले होते ?"

"मी येऊन निजले त्या वेळीं दीड वाजून गेला होता दोन वाजतां गंगाराम उठला आणि त्यानें सर्व प्रकार उघडकीस आणला. पुढे घडलेली सर्व हकीगत आपणास ठाऊक आहेच. ती मी सांगितली पाहिजे असें नाहीं मला अशा प्रसंगीं इतक्या गोष्टी ठाऊक असल्यामुळें व इतक्या गोष्टी मी केल्यामुळें मला काय वाटत असलें पाहिजे तें तुह्माला कल्पनेने जाणतां येईल माझी सर्व वृत्ति संशयाची यामुळें बनली होती."

"सारेंच विलक्षण खरें !" मी उद्गारलों. "कोणताहि प्रकार उघडकीस न येण्याबद्दलची चोख खबरदारी घेतली होती !"

"मी ती काय आणि खबदारी कितीशी घेणार ? तरी आपलें मला सुचलें तेवढें मीं केलें. त्यांत कसूर केली नाहीं. माझी मैत्रीण ताईंच्या अपरात्रीच्या येण्यानें चकित होणार नाहीं व त्याबद्दल कुठें कांहीं बोलणार अशी देखिल माझी खात्री होती शालीचा तुकडा तिथें पडलेला मला प्रथम दिसला नाहीं. पण त्या वेळीं मला कसें सुचलें कुणास ठाऊक, ताईची पांढरी शाल मी घेतली आणि माझी तिने नेली होती. आणि तो तुकडा तिच्या शालीचा पडला असेल. तो पाहून मात्र मोठाच संशय आला नाहीं ?" ती माझ्याकडे वळून ह्मणाली

"पण अंबूताईची असल्या प्रकारची आत्तुरी प्रवृत्ति बनण्याइतका तिचा मेंदू बिघडलेला माझ्या ध्यानांत आला नाहीं. तिचें डोकें बिघडल्यासारखें मला दिसलें खरें, पण नंतर. ह्मणजे बाबासाहेबांच्या मृत्यूच्या पूर्वी बरेच दिवस मी क्वचितच गांवदेवीला जाई, आणि संध्याकाळच्या वेळीं मी जाई तेव्हां ती बहुत करून आपल्या मैत्रिणींकडे. तेव्हां तिच्यांत इतका विलक्षण पडत गेलेला फरक कांहीं माझ्या ध्यानांत आला नाहीं."

"तिच्या हातून जीं कृत्यें घडत ती स्वबुद्धीनें घडत नसत. असें तिचें आचरण आठवड्यांचे आठवडे आणि पंधरवडे देखिल चाले. मला ठाऊक आहे.

सुमारें एक वर्षाच्या पूर्वीच मला तिच्या मेंदूतला हा फरक समजला होता. ” डॉ. नियोगी बोलले.

“ आणि म्हणूनच तुम्हाला आपला दुष्ट कार्यभाग साधतां आला ! ” कस्तुर त्यांच्याकडे वाघिणीप्रमाणें पाहून म्हणाली. “ हा गुन्हा करावयाला तुम्ही स्वत: तिला भाग पाडलंत ! ”

“ मी भाग पाडलं ? ह ! ” डॉ. नियोगी बळेंच हांसून म्हणाले. “ अंमळ-शानें तुम्ही म्हणाल की मी तिच्यावर जादूचा प्रयोग केला ! अरे वा ! बोल-ण्यांत कांहीं तरी तथ्य ! ”

“ जादूबिदूचे प्रयोग कसे असतात ते मला माहीत नाहींत; तथापि मला जे कांहीं समजलें आहे, नव्हे प्रत्यक्ष ताईच्या तोंडून जी हकीगत मी ऐकली आहे त्यावरून तरी अगदीं मी खात्रीनें सांगूं शकतें कीं हा खून तुम्ही करविला अथवा तुम्हींच केला—पुढें हात मात्र तिचे ! एवढाच फरक. त्या रात्रीं आपण स्वत: तिला भेटायला—भेटायला कसल ? तिला तयार करायला—आलां होतांत, इतकेंच नव्हे दरवाजा ढकलून आपण तिला आंत सोडलींत आणि तिला पक्की तयार केल्यावर आपण पोबारा केलात, महाराज ! बरं का ? तिचा मेंदू ठिका-णावर नव्हता, पण तो केव्हां केव्हां जाग्यावर येई, तेव्हा ह्या गोष्टी ती सांगून रडत बसे तुम्ही तिला तिच्या नवऱ्याविषयीं भलभलत्या काल्पनिक गोष्टी सांगून नवराबायकोंत वितुष्ट आणण्याचा शक्य तितका प्रयत्न केला; आणि कित्येक आठवडेपर्यंत तुम्ही तिच्या बिघडलेल्या मेंदूवर पतिहत्येसारख्या भयंकर गुन्ह्याच्या या शिकवणुकीचे सारखे आघात करीत राहिलां होतां. शेवटीं आपल्या रासायनिक प्रयोगांनी आपण तिला वेडाच्या भरांत आणून आपण तिच्यावरून आपला इष्ट हेतु साध्य करून घेतला. ”

“ कुभांड ! शुद्ध कुभांड ! ” डॉ. नियोगी मध्येच म्हणाले. “ मला ह्या प्रकरणांत कांहींच कर्तव्य नव्हतें व नाहीं. त्या रात्रीं मी रमेशच्या बंग-ल्यात होतों. ”

" अर्जीबात खोटें ! " संजीवन ह्मणाला. " आपली स्मृति नष्ट झाली असेल, तिला जरा ठिकाणावर आणली पाहिजेशी वाटते. दुसऱ्या दिवशीं पहाटेला आपण ह्या बोरीवली स्टेशनवर उतरलात. आपण ती रात्र मुंबईंत घालवली. जास्त कशाला सांगू ? ग्रँटरोडवरच्या एका पोलीस इन्स्पेक्टरनें आपणाला साडेतीन वाजतां पाहिलें आहे, इतकेंच नव्हे तर त्याला आपल्या एकंदर हालचालींचा संशय देखिल आला होता, पण प्रत्यक्ष पुरावा हा क्षणपावेतों माझ्याला भरपूर सांपडत नव्हता. डॉक्टरसाहेब ! इथें स्त्रीरोगी नाहींत, मी इतके दिवस स्वस्थ बसलों नव्हतों बरें ! ह्या बोरीवलींत आज कित्येक दिवस तुमच्यावर नजर ठेवून बसलों आहें. आतां घ्या पांच मिनिटांत प्रत्यंतर ! "

" मग तूं काय ह्मणतोस ? " डॉ. नियोगी क्रोधसंतप्त होऊन अंगावर धावून चढल्यासारखे अत्यंत निराशेच्या आवेशानें ह्मणाले, " मला वाटतें तुह्मी सर्व जण मिळून आतां मला खुनी इसम ठरवाल ! अँ ? अरे काय हा गहजब !"

" अरे बाबा ! एवढ्यांत कुठें संपला तुझ्या कृष्णकृत्याची नामावलि ? आपण बिचाऱ्या बाबासाहेबांचा खून करवून थांबला नाहींत डॉक्टरसाहेब, थोड्याच दिवसांपूर्वी आपण माझ्या मित्रावर, डॉक्टर मोहनरावावर मारेकरी धाडलात ठार मारण्याकरितां ! आणि या कामीं आपण आपली बरीचशी किंमत खर्ची घातली आहे ! बक्षिसें—रुपये हजारांनीं वाटले आहेत, काय खरें आहे का हें मी काय ह्मणतों तें ? कीं हें देखिल खोटेंच ? "

" निव्वळ थोतांड ! " डॉ नियोगी बेपर्वाईनें म्हणाले.

" काय ? " मी म्हणालों. " संजीवन, नळबाजारांतला प्रकार यांच्याच सांगीवरून झाला काय ? "

" अरे बाबा ! होय ! तुझा कांटा आपल्या मार्गावरून दूर करण्यांत तर यांचे फार आटोकाट प्रयत्न चालले होते आणि त्याला कारणहि तसेंच जबर होतें, येईल तें तुला पुढें हळूहळू कळून ! "

" बस्स ! माझ्या घरांतून तुम्ही सर्व चालते व्हा कसे ! " डॉक्टर नियोगी ह्मणाले.

" छे ! छे ! डॉक्टरसाहेब, आपल्याकडे आणाखीहि काही पाहुणे यायचे आहेत. तेव्हां आम्ही एव्हांशीच जायला तयार नाहीं, समजलांत ? तसेंच आपल्या इथें आम्ही आलों आहोंत ते मोकळ्या हातांनीं नाहीं जाणार ! उलट पाहुणचाराकरितां आमच्या यजमानाला देखिल बरोबर घेऊन जाणार तों-पर्यंत तुम्हाला मी आणखी एक गोष्ट सांगतों, नाकारावयाची असेल तर खुशाल नाकारा बापडी येथील सोनेरी टोळींतील एकाच नायकाला वश करून घेऊन एक तुकडी अचानक मोहनवर धालण्याचा प्रयत्नहि बराच यशस्वी झाला होता. या कामीं आपण त्या चोरट्यांना लांचहि बराच चारलेली आहे पण आपलीं हीं बिंगें बाहेर पडूं नये याबद्दल आपण घेतलेली काळजी वाखाणण्या-सारखी आहे. परंतु त्याच चंदूनें आपल्या तोंडानें सर्व हकीगत पोलीसांना कळविली. आपणाला हा संशय येण्याबरोबर आपलें गुपित बाहेर पडूं नये म्हणून आपल्याच पैसे चारून पोसलेल्या हस्तकाला यमसदनाला पाठवावयाला चुकलां नाहींत. पण आपला तर्क थोडासा चुकला आणि आपलीं सर्व कार-स्थानें पोलीसला कळविल्यानंतर तो मेला. हा पूर्वीचा बदमाष नंतर साव होऊन तो तुमच्यावर उलटला होता. व पोलीसांचा मदतगार झाला होता "

आतां मला समजलें कीं चंदू हा पूर्वीचा बदमाष, नंतरचा डॉ. नियोगींचा हस्तक व तदनंतरचा पोलीसांचा मदतगार झाला होता. तेव्हांच संजीवन त्याच्या मृत्यूविषयीं इतकी बाराकाईनें चौकशी करीत होता.

डॉ. नियोगींचे ओंठ थरथरूं लागले. बोलावयाचें त्याच्या मनांत होतें, पण तोंडच नाहींसें झालें. त्यांचीं सर्व बिंगें बाहेर पडलीं. आतां आपली धडगत नाहीं हे त्यांनीं जाणलें.

हीं अनेक रहस्यें व त्यांत झालेले अनेक खून या सर्वांचें मूळ कारण डॉ. नियोगींच होत हें समजल्याबरोबर मी विस्मित होऊन गेलों. मला प्रथम प्रथम तें अशक्य वाटूं लागलें; परंतु माझी प्राणापलीकडे आवडती कस्तुर, हिनें माझ्या कडेहि कधीं न सांगितलेली हकीगत जेव्हां ती सांगूं लागली, आणि तिला माझा मित्र संजीवन यानें बिनतोड मेहनत घेऊन लावलेल्या शोधांचा व मिळवि-

लेल्या आणि आतापर्यंत गुप्त राखलेल्या माहितीचा जेव्हां दुजोरा दिला, तेव्हां मात्र माझे डोळे साफ उघडून एक एक रहस्य आपोआपच उकलत चाललेलें मला दिसून येऊं लागलें. तथापि बँकवेवरील रात्रीं फिरणाऱ्या दंपत्याला मी पाहिलें होतें आणि तें लतकुंजांतील दंपत्य कुठलें ? हें अद्याप बाहेर पडलें नव्हतें. मी त्या प्रसंगाची आठवण संजीवनला करून दिली.

त्याबरोबर त्यानें खिशांतून दोन तीन फोटो काढून ते डॉ. नियोगींच्या समोर धरले. डॉक्टरसाहेबांचे पाय उभे राहण्यास कांकूं करीत होते.

" आपण ओळखता का हे फोटो कुणाचे ते ? " संजीवनने विचारलें. मी त्या फोटोंकडे नीट निरखून पाहिलें पण मला ओळखतां येईना. " गेले कित्येक महिने मी आपल्या सर्व हालचालीवर पाळत ठेवून होतों. फोटोग्राफर्स व सलून वाले यांच्या दुकानीं मी हिंडलों आहे. प्रथम आपण निरनिराळ्या सलूनमध्ये जाऊन बाबासाहेब देशपांड्यांचा फोटो दाखवून त्याप्रमाणें हजामत, मिशा, केंस वगैरे करावयास सांगितलें; तें झाल्यावर आपल्या मनाची खात्री करण्या-करितां आपण स्वतःचा फोटो काढून घेतला. तो हा पाहा. इतक्यावरच तुह्मीं कांहीं दिवसपर्यंत बिघडलेल्या मेंदूच्या अंबुताईच्या सौभाग्याचे मालक होण्याचा गुप्त प्रयत्न केला. पण पुढें आपणास तो पसंत पडेना झणून नाट-क्याच्या वेषाचें रंगसामान व केसाचे दाढ्या, मिशा टोप वगैरे मिळतात त्या दुकानांत जाऊन दाढी मिशा वगैरे सामान खरेदी केलेंत. कारण तुह्माला स्वतः ची दाढी होती, परंतु बाबासाहेबांना नव्हती. यामुळें आपणाला फारच दग-दग पडली. आपणाला अंबुताईला भेटतांना दाढी काढून भेटावें लागे, व नेहमींच्या वेळीं दाढी ठेवावी लागे. त्याच कालाच्या सुरवातीपासून आपला ढोंगी खोटेपणा उत्पन्न झाला. झणजे उजेडाच्या वेळीं न येतां अंधुक प्रकाशांत केव्हां तरी यावें, चेहऱ्याला कांहीं तरी बाम, उटणीं, मलमें वगैरे निरनिराळ्या रंगांचीं तेलकट औषधें वगैरे लपेटलेलीं असावीत, म्हणजे बेमालूम बसवलेल्या दाढी मिशांचा कोणास कधींच संशय येऊं नये. ह्या उलाढाली करीत असतां आपण रणछोडदास हें नवीन नांव धारण करून आपला हा पापाचा कारभार

शांतपणें चालविला. मधूनमधून माझ्यावरहि आपण नजर टेवीत होतांच. मला मात्र आश्चर्य वाटत होतें कीं असलीं वेषांतरें करून आपण करणार तरी काय? पण पोखरून—स्वतःच पोखरून टाकलेल्या मेंदूच्या अंबुताईच्या सर्वस्वावर आपला डोळा होता; तेव्हां तिला आपण औषधें देऊन तिचा घाबरलेला मेंदू आपण आपणाला हवा तितका बिघडवून सोडला. आपण जे जे हॉस्पिटल्मध्यें मोठ्या डौलानें आपल्या नवीन शोधाचें जें लेक्चर दिलेंत त्यावरून तर माझी पक्कीच खात्री झाली. मी त्या दिवशीं तेथें हजर होतों आपण आपले प्रयोग गुप्त चालले होते म्हणून जें आपण त्या वेळीं बोललांत तें अक्षरशः खरें, बिचाऱ्या अंबुताईच्या मेंदूवर आपले प्रयोग जारीनें चालले होते. मात्र तो मेंदू पुनः ठिकाणावर येऊं नये अशीच तजवीज आपण ठवली होती. शेवटीं बाबासाहेब अंबुताईला घेऊन बॅकबेवर जात, हें ध्यानांत धरूनं आपण आपली बोरीवली सोडून तिला बाहेर बोलावून आपण एक दोन वेळां बॅकबेवर तिच्याबरोबर फिरलांत. कारण एवढेंच कीं मागील कांहीं गोष्टी जशाच्या तशाच तिच्या नजरेसमोर धराव्यात बाबासाहेब वारलेच नाहींत, असें भासविण्याचा आपला उद्देश होता. आपल्याबरोबर फिरणारे हे आपले पति बाबासाहेबच असून ते जिवंत आहेत, परंतु कांहीं गुप्त कारणास्तव मेल्याचें सोंग करून अज्ञातवासांत राहिले आहेत; अशा प्रकारची समजून आपण तिला करावयास लाविलें. तिची अशी पक्की समजून झाल्याची खात्री झाल्यावर आपण पुढचा खेळ खेळावयास सुरवात केली. आपण मेंदूचे विकार जाणणारे, मेंदूचे विकार सुधारून नाहींसें करणारे व निरोगी मेंदूंत जरूर लागल्यास तसले विकार उत्पन्न करणारे प्रतिब्रम्हदेव असल्यामुळें आधींच कमकुवत झालेल्या मेंदूची अंबुताई तुमच्या जाळ्यांत अचानक मिळाली. तुम्हाला प्रथम तिच्या सौभाग्याचा आणि इस्टेटीचा लोभ सुटला, त्याकरितां तुम्ही यत्न योजीत असतां त्या पायीं बराच पदरचा पैसा खर्च करावा लागला. पैसा खर्च होऊं लागला तसा त्याचा वचपा भरून काढण्याकरितां तिची इस्टेट गिळंकृत करण्याचा आपला निश्चय दृढ झाला. बाबासाहेबांनीं आपल्या इस्टेटीचा लेख करून ठेवला होता आणि त्याला वारस अंबुताई हीच एकटी ठरली होती.

तेव्हां त्या इस्टेटीची मालकी तिला मिळतांक्षणींच तिला बरोबर घेऊन दूर कुठें तरी तिच्यासह जाण्याचा आपला बेत होता. कारण अंबुताईचें सौभाग्य तुम्हाला लाभल्यानंतर व तिच्यासह पळून गेल्यानंतर मग त्या नवीन ठिकाणीं तुम्हाला पूर्वींच्या नांवानें प्रॅक्टिस् करतां येणें शक्य नव्हतें. त्या करितां ही सारी तरतूद चालविली होती. तिचा मेलेला जिवंत नवरा या नात्यानें आपण तिच्याशीं हा आपला बेत चांगला ठरवून ठेवला होता. आपण तिच्या हातून पतिहत्या करविल्यानंतर तिला मेंदू—नव्हे मस्तकच नाहींसें झालें; आतां बोललों काय, क्षणापूर्वी केलें काय, आहों कुठें, करतों काय ? पुढच्या क्षणीं काय करावयाचें आहे याबद्दलचें तिला भानच नाहींसें झालें. अशा स्थितींत तिच्या मेंदूवर आपण ताबा मिळविला, त्याच प्रमाणें तिच्या शरीरावर, इस्टेटीवर व सर्वस्वावर मिळवून तिच्यासह पळून जाण्याचा आपला विचार होता !—"

"तरच वाटतें हें मला एकदां म्हणाले होते कीं, आपण लवकरच कलकत्याकडे अगर बनारसेकडे आयुष्यांतील शेवटचे दिवस काढावयास जाणार म्हणून !" मी म्हणालों.

"व: ! त्यांचा बेत कोणासच कळण्यासारखा नव्हता. आपल्या मार्गांत आलेल्या प्रत्येक इसमाचा कांटा कायमचा दूर करण्यास त्यांनीं कमी केलेलें नाहीं; मात्र मी त्यांच्या तडाक्यांतून बचावलों बिचाऱ्या माणसांतून उठलेल्या अंबुताईला यांनीं अशा रीतीनें नागवलें व तिच्या सौभाग्यावर नव्हे पातिव्रत्यावर गदा घालण्याचा या वृद्धगृहस्थांचा विचार होता व तसा प्रसंग येता तर मीहि त्यांच्या पाळतीवर होतोंच तेव्हांच येऊन त्यांना त्याच घटकेला प्रायश्चित्त दिलें असतें. परंतु दुर्दैवानें कीं सुदैवानें कसेंहि म्हणा तसें न घडतां निराळाच प्रकार घडला. कारण—" इतकें म्हणून तो जरासा थांबला.

"कारण काय ?" मी आश्चर्यमूढ होऊन ऐकत असतां विचारलें.

"कारण, मध्येंच एकदम अंबुताईची मेंदूची शक्ति परत येत असल्याचें चिन्ह दिसलें. एके रात्रीं या डॉक्टरसाहेबांनीं अंबुताईला गांठली असतां अंबु-

ताईनें त्यांचें सोंग ओळखलें व तसें स्पष्ट त्या स्वारीस जोरांत सांगितलें."
नंतर संजीवन डॉ. नियोगींकडे वळून म्हणाला–" नाहीं का डॉक्टरसाहेब ! त्या रात्रीं तिनें आपणाला बजावून सांगितलें कीं तुम्हीं आपल्या हातून आपल्या मवऱ्याचा खून करविला आपण सर्व वर्तमान पोलीसला कळविणार म्हणून ? तेव्हां शिकार हातची सुटते असें पाहतांच आपण तिलाहि समुद्रसमर्पितु करून तिचें तोंड कसें बेमालूम बंद केलेंत !"

"काय हें किटाळ माझ्यावर! अँ ?" चेहरा काळा ठिक्कर पडून गेलेले डॉक्टर नियोगी बोलले. " ती अपघातानें आपोआप समुद्रांत पडली असेल."

"आपोआप पडली ! अं ?" संजिवन तेढिनें व रागानें म्हणाला. "तुम्हीं ढकललींत. तुमच्या मागोमाग मी होतों; झालेला सर्व प्रकार मी पाहात होतों. तावडतोब हात देऊन समुद्रांत एकदम पडणाऱ्या अंबुताईला वांचविण्याइतका जरी मी जवळ नव्हतों, तरी सर्व प्रकार मी पाहत होतों !"

" कोण पाहत होता ?" लालबुंद डोळे करून डॉक्टर नियोगी म्हणाले.

" मी पाहत होतो." संजीवननें धिमेपणानें उत्तर दिलें.

" काय पाहत होतास ?"

" सर्व प्रकार पाहत होतों ?"

" तूं ?"

" होय, होय, मीच !"

" अरे आ !"

" एव्हांच ? नाहीं बुवा आपण एव्हांच जाणार. बाबासाहेबांच्या खुनाच्या रात्रीपासून तों तहत आज ह्या पळापर्यंत मला विश्रांति कशी ती ठाऊक नाहीं. तुम्हाला ठाऊक देखिल नव्हतें कीं तुम्ही आपल्याला जेव्हां अगदीं सुरक्षित अगदीं एकटे समजत होतां, तेव्हां एक परमेश्वर आणि दुसरा मी तुमच्या पाठीवर तुमच्यावर डोळा ठेऊन होतों. तथापि मी कसा येत जात असें आणि काय करीत होतों हें मात्र कोणालाच कळूं देणार नाहीं; कारण माझी पद्धत

मी कधींच कोणाला समजूं देत नसतों. या केसमध्यें मात्र पूर्ण लक्ष घालून आणि चिकाटीनें मला यश मिळालें आहे. डॉक्टरसाहेब ! मी आतां ज्या ज्या गोष्टी तुह्माला बोलून दाखविल्या आहेत त्या सर्व अनेक साक्षी पुराव्यानिशी सिद्ध करण्यास माझी जय्यत तयारी आहे. " इतके बोलून तो जरासा थांबला आणि नंतर डॉक्टर नियोगीकडे पाहून एखाद्या जज्जानें गुन्हेगाराला दोषी ठरवावा तशा स्वरूपानें रागीट मुद्रेनें त्यांना ह्मणाला—" डॉक्टर नियोगी, तुम्ही गुन्हेगार, खुनी आहांत ! "

संजीवनच्या मुखांतून बाहेर पडणाऱ्या अजब परंतु सत्य गोष्टी ऐकत मी स्तब्ध उभा होतों. डॉक्टर नियोगींच्या हृदयावर संजीवनच्या मुखांतून निघणाऱ्या प्रत्येक शब्दाचे कसे वज्राघाताप्रमाणें आघात होत होते व त्यामुळें त्यांना तीव्र वेदना होऊन त्यांना डोळ्यांसमोर काळोख दिसूं लागल्यामुळें त्यांच्याकडे पाहून कस्तुरला विषादयुक्त समाधान आंतून कसें होत होतें; हें मी पाहत होतों. माझ्याप्रमाणेंच तो तिचाहि शत्रु होता. तिच्या बहिणीचा तर त्यानें सर्वनाश केला होता. तिच्या पावित्र्यावर, तिच्या पातिव्रत्यावर देखिल घाला घालू पाहणारा हा पाषाणहृदयी स्वतःला ब्रह्मचारी म्हणवीत होता ! त्यानें कस्तुरविषयीं माझ्याकडे जे जे उद्गार काढले ते ते तिच्याविषयीं माझें असलेलें निर्मळ मन कलुषित करण्याकरितां आणि आमची दोघांची फाटाफुट झाली कीं अंबुताईशीं आपला व्यवहार सुरळीत चालावा; त्यांत खो पडूं नये ही त्या बेरडाची कल्पना. इतकेंहि करून आमचीं दुभंगलेलीं मनें पुन्हा जुळतातसें पाहून यानें माझ्यावरच मारेकरी सोडले. कारण कस्तुरकडून खरी गोष्ट मला कळेल अशी भीती अंबुताईच्या बोलण्यावरून त्याला पडली. मी एकदां बोरीवलीस गेलों असतां डॉक्टर नियोगींच्या घरीं जी बाई होती ती कस्तुर नसून कस्तुर सारखाच साधारणपणें अवाज असलेली अंबुताई होती असें मागाहून मला आढळून आलें होतें. आणि बोरीवलीहून मुंबईस जातांना गाडींत भेटलेली व नळबाजारांत आपल्या बापाला पाहण्याकरितां म्हणून नेणारी बाई म्हणजे चोरांच्या टोळींतले—चंदूचे हस्तक

ीवेषधारी लुच्चे होत. फेरीवाले बनून कुलुपें, कात्र्या; विकून पाळत ठेवणारे 'च ते ठग होत.

" मग का—काय ? तूं माझें-एं---एं--का आय् करणार ? " उसन्या वसनाची ऐट आणून कांपऱ्या आवाजांत डॉ नियोगी म्हणाले.; त्यांचे डोळे रगर फिरत होते. सर्वांग लटलटत होतें. आणि हळूहळू बोलतां बोलतां भिंती- ाशीं जाऊन त्यांनीं भिंतीचा आधार घेतला नसता तर त्यांस उभें राहणें शक्य झालें असतें.

" तें–एं–एं–मग सांगतों " त्यांना वेडाऊन संजीवन म्हणाला. पण अगो- र तुमचीं सर्व बिंगें मला समजलीं आहेत याबद्दल खुद्द तुमची मला खात्री टवून दिली पाहिजे आहे. तुम्ही बाबासाहेब देशपांड्यांचे दिलजान् दोस्त ! म्हणूनच त्या खुळयानें पहिल्या मृत्युपत्रांत आपली सर्व इस्टेट आपल्या बाय- कोला आणि तिनें कदाचित दत्तक न घेतांच ती मेली तर तुम्हाला द्यावी असें लिहून ठेविलें होतें. का ?–तर म्हणे आपल्याला अखेरपर्यंत जिवापाड मेहनत करून औषधपाणी दिलें ! तें मृत्युपत्र झाल्यावर मग ते आपल्या औषधांनीं अधिकच आजारी पडूं लागले. परंतु ते मेल्यावर—नव्हे त्यांना मारल्यावर आपण अंबुताईला दत्तक घेण्याची अगर धर्मादाय वगैरे करण्याची संधि न मिळावी म्हणून तिचें डोकें नासवून तिला भलत्याच नादीं लावलेत आणि शेवटीं तिचा खून केला अशा प्रकारें आपण त्या इस्टेटीकरितां आणि आपल्या पापवासनांकरितां दोन खून पाडून पुन्हा डॉक्टर मोहनवर साखरेचें जाळें पसरून त्याच्यावर मारेकरी घातले. आणि आतां हा त्या इथें कस्तुरला मारून ववध्या खुनाचा प्रयत्न आपला चालला होता. पण रामोशा, तुला ठाऊक नाहीं, कीं, तुला माहीत असलेलें मृत्युपत्र बाबासाहेबांनीं आपल्या मृत्युपूर्वी दोनतीन महिने करून ठेविलें होतें. परंतु नंतर सुदेवानें त्यांची बुद्धि पालटून आपल्या मरणापूर्वीं अजमासें वीसच दिवस चांगल्या शुद्धीन असतांना लिहि- लेलें मृत्युपत्र मला त्यांच्या दप्तरांत सांपडलें आहे. मृत्युपत्र रजिष्टर झालेलें आहे. वर सह्या साक्षी आहेत. आणि त्यांत सर्व इस्टेट आपल्या बायकोच्या

मागाहून तिला तिची व्यवस्थाकरतां येण्यापूर्वी अगर दत्तक घेण्यापूर्वी अगर धर्मादाय करण्यापूर्वी मृत्यु आल्यास अथवा मृत्यूपूर्वी तिनें दत्तक घेतल्याशिवाय कांहीं खर्च करून इस्टेट शिल्लक राहिल्यास तिची सर्व मालकी आपणास व आपल्या बायकोस अखेरपर्यंत अत्यंत प्रेमळपणें मदत केल्याबद्दल आपल्या मेहुणीस–ह्या कस्तुरला दिली आहे. ”

“ कुणाला—मला ? ” कस्तुरनें आश्चर्यानें विचारलें.

“ होय. ” संजीवन म्हणाला.

“ आम्हाला मुळींच नको. ” कस्तुर म्हणाली.

“ खरेंच नको बुवा आपल्याला तिची इस्टेट. ” मी भान न राहून चट-कन् म्हटलें.

“ अहो ! रावसाहेब, स्वस्थ बसायला काय घ्याल ? तुम्हाला यायला कोणी आणलें आहे का कांहीं ? ” डोळे मिचकावून मला संजीवन म्हणाला. माझा उतावळीपणा माझ्या ध्यानांत आला आणि मी खजील झालों.

“ सर्व इस्टेट कस्तुरला मिळावयाची आहे. ” नंतर तो नियोगींकडे वळून म्हणाला. मी मी म्हणणाऱ्या गुप्त पोलीसला देखिल थांग लागूं नये अशा कर्तब-गारीनें आपण हें जुळविलेलें कारस्थान मी उलथून पाडलें आहे. ह्या कस्तुरला इथें आपण कसें आणलेंत सांगूं का ? अथवा नको. आपणच सांगा पाहूं ! ” तो कस्तुरकडे वळून म्हणाला.

“आज सायंकाळीं मला बोलावलं आहे म्हणून सांगून यांच्या (मोहनराव) हातचें मला पत्र घेऊन कोणी एक स्त्री आली. मी घरांत होतें. आईकडे पत्र देऊन ती बाई निघुन गेली. मी दवाखान्याकडे जलदीनें गेलें तों दवाखान्याकडे कोणी नसून तिथें आपण बोरीवलीस डॉ. नियोगींकडे असून तेथें अगत्य लवकर ताबडतोब निघून यावें असें दुसरें पत्र घेऊन एक माणूस उभा होता. मी यांचें अक्षर ओळखिलें आणि कसला प्रसंग असेल कुणास ठाऊक म्हणून धावकन लगबगीनेंच इकडे आलें. मात्र माझें मन संशयांतच होतें. पुढें आलें

तीं ह्या चांडाळांच्या तडाक्यांत मिळालें. हीं पाहावी दोन्हीं पत्रें ! " असें म्हणून तीं पत्रें तिनें संजीवनच्या हवालीं केलीं

मी एकदां बोरीवलीस आलों असतां माझें अक्षर हुबेहूब उतरण्याचा चाललेला डॉ. नियोगींचा प्रयत्न माझ्या झटकन् लक्ष्यांत आल्याशिवाय राहिला नाहीं. त्याचा उपयोग हा असा झाला. हीं पत्रें माझीं नव्हतीं, असें मला देखिल वाटेना. मात्र मी तीं लिहिलीं नव्हतीं एवढेच काय तें.

"कसें काय डॉक्टर साहेब! आपली राक्षसी महत्वाकांक्षा धुळीस मिळाली आहे आतां! आपलें हें कारस्थान उघडकीस आणण्यास मला फारच सायास पडले आहेत. पण माझ्या दृढ निश्चयामुळें मला यश मिळालें.' नंतर शापदेणाऱ्या एखाद्या तपस्वी मुनीप्रमाणें मुद्रा करून तो म्हणाला —" नराधमा! तुझ्या पापांचा पर्वत एवढा मोठा आहे, कीं, सूर्याच्या तेजानें तो जळून जाणार नाहीं, इंद्राच्या वज्रानें चुरून जाणार नाहीं, समुद्राच्या खोलींत बुडूं शकणार नाहीं, अग्नीच्या आणि गंगेच्या पावित्र्यानें पुनीत होणार नाहीं. मग मानव तुला शिक्षा कसली आणि कशी देणार? तथापि आजच्या मानवी जगांतल्या खुनी माणसाला—दोन खून प्रत्यक्ष करणाऱ्या आणि आणखी दोन खुनांचा प्रयत्न करणाऱ्या माणसाला—नव्हे राक्षसाला—कायदा मरणाचीच शिक्षा देणार! चवथ्या खुनाची हीच ना ती सामुग्री?" जवळच असलेल्या विषारी ॲसिड्च्या बाटल्या व क्लोरोफार्मच्या स्पंज्कडे बोट करून संजीवन म्हणाला. " खरोखरच तुझ्यासारख्या नरराक्षसाला देहांत प्रायश्चित!"

या शेवटच्या शब्दांचा त्या पाप्याच्या अंत:करणावर व शरीरावर अगोदरच परिणाम होत चालला होता. तेवढ्यांत संजीवननें शीळ घातल्याबरोबर आठ दहा पोलीस एकदम झाडून तयार झाले!

" तिकडची हकीगत काय?" संजीवननें विचारलें.

" खड्डा खणणारे व सर्व गुन्हेगार कैद!" एका पोलीसाकडून उत्तर आलें. संजीवननें खूण करण्याबरोबर त्यांतले दोन असामी डॉक्टर नियोगीला कैद

करणार तोंच त्यांचे ओंठ हालले, डोळ्यांची बुबुळें गरगर हालली, आवाज मात्र कपलाच झाला नाहीं, तोंड उघडें पडलें होतें, तें झांकून घेण्याची देखिल शक्ति नसल्यामुळें तें तसेंच राहिलें. ताट ते उभे राहण्याचा पयत्न करूं लागले. इतक्यांत त्यांच्या घशांतून घरघर आवाज उत्पन्न झाला. तो त्यांच्या बोलूं पाहण्याच्या प्रयत्नामुळें झाला असावा. त्यां नीं लगेच वेडेवांकडे हातवारे केले. वाऱ्याला पकडल्याप्रमाणें मुठी वळल्या आणि धाडकन् जमिनीवर तेथल्या तेथेंच तें धूड पडलें

पडल्याबरोबर मी धावतच त्याच्याजवळ गेलों, त्यांची कॉलर सैल सोडली आणि कांहीं तात्कालिक औषधें लावलीं; परंतु अवघ्या दहाच मिनिटांत समजून आलें कीं, ते मानवी मदतीच्या आटोक्याच्या बाहेर गेले होते. त्यांना फिट् आली असावी असें मला प्रथम वाटलें होतें; पण वास्तविक प्रकार तसा नसून आपल्यावर आता केस होऊन, जगांत बेअब्रू होणार व शिक्षा होणार, या भीतीचा परिणाम तात्काल त्यांच्या मनावर होऊन जबरदस्त धक्क्यानें घड्याळाचीं यंत्र बंद पडावीं त्याप्रमाणें त्यांच्या हृदयाची क्रिया बंद पडली, नाड्याबंद पडल्या आणि प्राणोत्क्रमण झालें! आपले सर्व प्रकार उघडकीस आले अशी संजीवनच्या मुखजबानींत निघालेल्या मजकुरावरून खात्री झाल्या क्षणापासून पंधरा मिनिटांच्या आंतच त्यांचा अवतार संपला. आणि पृथ्वीला भार झालेल्या पाप्यांपैकीं एक दुष्ट प्राणी कमी झाला.

या डॉ. नियोगींच्या आकस्मिक मृत्यूमुळें सरकारी कोर्टाचें काम व पोलीसची दगदगहि फार वांचली.

लगेच दुसऱ्या दिवशींच्या स्थानिक इंग्लिश व मराठी वर्तमानपत्रांतून " नव्या मन्वतरांतले धन्वंतरी डॉ. नियोगी " हे स्वर्गवासी झाल्याची बातमी छापली जाऊन त्यांच्यावर अनेक मृत्युलेख लिहिण्यांत आले. त्यांचे गुण वाखाणले नाहींत असें एकहि वर्तमानपत्र नव्हतें. कारण मृताचें खरें चारित्र्य फारच थोड्या वर्तमानपत्रकारांस कळतें. तें गुप्तच असतें. सर्वांनीं ' मृताच्या

आत्म्यास शांति ' देण्याबद्दल परमेश्वरास प्रार्थिलें होतें. पण अशा बाबतींत पांचांच्या नव्हे पन्नास हजारांच्याहि मुखीं परमेश्वर उभा राहणार नाहीं. कारण ह्या सर्वांलाच मृताचा आत्मा शांति घेण्यास पात्र आहे किंवा नाहीं याची जाणीव नसते.

असो. तदनंतर पोलीससह सर्व लटांबर तेथून निघालें. पोलीस अधिकारी लागलीच तेथें आले. सर्व खरी हकीगत आतां सर्वांस कळून आलीच होती. डॉ. नियोगींच्या चरित्राची हकीगत फक्त पोलीसांच्या नोंद बुकांत राहिली.

आम्ही सर्व लागलींच घरीं मुंबईस गेलों. त्या दिवशीं कस्तुरचा पुनर्जन्म झाला होता. आम्ही सर्व जण कस्तुरच्या आईकडे गेलों. आमची सर्वांची जेवणें—खाणीं तेथेंच झालीं. आजपर्यंत घडलेल्या एकंदर गोष्टींची मालिका प्रत्येकाच्या मनश्चक्षू समोर येत होती. ह्याच विषयावर गप्पा करतां करतां रात्रींचे साडेबारा वाजून गेले, तरी मला झोंप येत नव्हती. पण संजीवन डुलक्या घेऊं लागला. तेव्हां आम्ही सर्वजण झोंपावयास गेलों.

आतां माझ्या संसाराची हकीगत तुम्हांस सांगावयाची तेवढी राहिली आहे. ती सांगितली कीं मी माझी सध्याची हातांत घेतलेली केस तपासण्यास मोकळा झालों.



## प्रकरण ३२ वें.

### आद्यंत.

कांहीं दिवस लोटल्यावर आमच्या लग्नाचा प्रश्न पुढें आला. परंतु सर्वांसच मी माझ्या व कस्तुरच्या जवळच्या सर्व इष्टमित्रांची परवानगी घेतल्याशिवाय लग्न करावयाचें नाहीं असें कळविलें होतें. माझें अंतरींचें गुह्य मी पूर्वीच कस्तुरला कळविलें होतें हें मागील कथानकावरून समजून आलेंच असेल. तें कळल्यावरहि कस्तुरचा निश्चय ढळला नव्हता. परंतु बाकीच्या माणसांना तें कळवावयाचें होतें. तें मी आज बाहेर फोडावें असें ठरल्यामुळें आज कस्तुरच्या दोन्ही बाजूच्या नात्याचीं व माझे सर्व इष्टमित्र असीं सर्व माणसें संजीवननें सुशोभित केलेल्या त्याच्या मालकीच्या दिवाणखान्यांत जमलीं होतीं. कस्तुरच्या आईचा व तिच्याहि नातलगांचा संजीवन हा इतका प्रिय झाला कीं तो त्यांना आणि त्याला तीं घरांतल्या माणसांप्रमाणें वाटूं लागलीं. आज प्रत्येकाला आपल्याला डॉ. मोहनच्याबद्दल कांहीं तरी अश्रुतपूर्व अशी हकीगत समजणार म्हणून उत्कंठा वाटत होती. सर्वांचें माझ्याबद्दल चांगलें मत असून मी सर्वांस आवडता झालों होतों. कस्तुरचें माझ्याशीं लग्न लागावें असें सर्वांलाच वाटत होतें.

मी सर्वांच्याच पूर्वी संजीवनच्या घरीं आलों होतों. अजून कांहीं माणसें यावयाचीं होतीं. मला त्या दिवशीं संजीवननें बोरीवलीस केलेल्या नाटकाची आठवण होत होती. कस्तुर नाहींशी झाली आणि मी घाबरून गेलों त्या वेळीं संजीवन बोरीवलीस आण्याच्या अगदीं मोठ्या घाईंत आणि म्हणून माझ्या कस्तुरबद्दलच्या प्रश्नास उत्तरच देईनासा झाला. ह्या त्याच्या बेपर्वाईबद्दल मी त्याला मनांतल्या मनांत अनेक प्रकारें दोष दिले होते. त्याला तितक्या क्षणापुरता तरी मी मित्रकाळजी, निष्ठुर, निर्दय मानला होता. पण आतां माझी खात्री होऊन गेली कीं आपल्या मित्राची काळजी घेण्यांत आपल्या सुखाची, आपल्या

जिवाची देखिल पर्वा न करणारा असा कोमल मनाचा आणि सदय मित्र एक संजीवन.

संजीवन दिवाणखान्यांतील टापटिपींत कांहीं उणें अपुरें राहिलें की काय म्हणून पाहत होता. मी त्याला म्हटलें—

"त्या रात्रीं तूं डॉ. नियोगींच्या बंगल्याकडे जाऊन बायकोसारखा आवाज काढलास तेव्हांच त्यानें दार उघडलें हें कसें ?"

"तुला बोरीवलीहून मुंबईस येतांना, तसेंच नळबाजारांत आपल्या बापाला औषध देण्याकरितां बोलावणारी जी स्त्री, ती खरी स्त्री नसून स्त्रीवेषधारी सोनेरी टोळींतील एक गोरटिला, टेंगणा ठुसका व बायकी आवाजाचा तरुण पोऱ्या होता, हें तुला त्याच दिवशीं कळून आलें आहे. त्या लुच्चाकडे कांहीं धोक्याचें चिन्ह अगर आपलें कारस्थान फुटल्याबद्दलचा सुगावा लागल्यास येऊन कळविण्याचें काम डॉ. नियोगीनें संपविलें होतें. हा माणूस त्यांना फारच उपयोगी पडला. चंदूनें आपलें अंग काढून घेतलें तेव्हां हे सर्व त्याचे हस्तक बिघडले खरे, परंतु ह्या दुष्टानें तितक्यांत चंदूला आणि त्यांना फोडून चंदूला विषप्रयोग केला आणि त्याच्या साथीदारांना पैसे चारण्याचा सपाटा चालविला. चंदूला हें तर अगदींच असह्य झालें होतें. त्यानें मरणापूर्वीच सर्व हकीगत पोलीसास व मला कळविली होती. नंतर ह्या परत वश करून घेतलेल्या मंडळींपैकीं कांहीं लोक कस्तुरला मारल्यावर कोणास जाग न लागतां पुरून टाकण्याकरितां रात्रीं खोल खड्डा खणत होते तेथें त्यांना जागच्या जागीं कैद करविलें. कस्तुरला मारण्याकरितां डॉक्टरनें जवळ घेतलेली विषाची बाटली आणि क्लोराफॉर्मचा स्पंज तूं पाहिला होतास. इतकी जय्यत तयारी त्या ठग्याची होती. मला हे त्याचे सर्व बेत पूर्वी कळले होते. मग तुझ्या वेडगळ प्रश्नाला उत्तरें देत कसलीं बसणार ? मला कस्तुरला मारण्यापूर्वी त्याच्या बंगल्याकडे पोंचण्याची कोण घाई आणि त्यांत तुझा आपला एखाद्या लहान पोरासारखा "माझ्या कस्तुरचें काय ?" म्हणून मागें लकडा ! प्रथम मी त्याच्या बंगल्यावरून पुढें जातांना कानोसा घेतला त्या वेळीं त्यानें कस्तुरला

बाहेर काढली नव्हती किंवा तो आपल्याला पडकावयास ज्या स्थितींत पाहिजे होता तशा स्थितींत नव्हता; म्हणून मी पुढें तुला घेऊन गेलों. परत आल्यावर मी त्या फेरीवाल्या चोर तरुण स्त्रीवेषधाऱ्यासारखा आवाज काढला आणि बोललों. तो तुझ्या अक्षराचें (immitation) इमिटेशन् करावयास शिकला होता हें मात्र मला अखेरपर्यंत समजलें नव्हतें; अगदीं आयत्या वेळींच समजलें. पण मी त्या स्त्रीवेषधारी पोऱ्यावर पाळत ठेवून होतोंच. त्याला मी पाहून त्याचा आवाज आणि बोलणें लक्षांत ठेवून त्याचें अनुकरण करण्याचा एक दोनदां प्रयोग खासगी रीतीनें करून पाहिला, तों तो यशस्वी ठरला. माझे एक दोन स्नेही त्या वेळीं फसले. त्या रात्रीं तो ठक डॉ. नियोगींस कांहीं बातमी देण्याकरितां यावयाचा होता. त्याला अगोदरच दुसरीकडे पकडावयास लावून व कैद करून त्याच्या जागीं मी डॉक्टरच्या दाराशीं गेलों आणि त्याची "चंपी" बनलों! नाहीं तर आपल्याला प्रवेश मिळाला नसता आणि पोलीसाकडून बळजबरीनें घर फोडतां येणें शक्य नव्हतें. उलट आपणच दोषी ठरलों असतों. कारण डॉ. नियोगी म्हणजे असामान्य व्यक्ती!"

संजीवनचें हें भाषण आणखीहि लांबलें असतें पण इतक्यांत सर्व मंडळी जमली. संजीवन आलेल्या प्रत्येकास बसावयास देऊन व त्यांच्याशीं बोलत चालत मधल्या वेळांत माझ्याशीं बोलत होता. आलेला प्रत्येक इसम हें त्याचें बोलणें लक्ष लावून ऐकत होता.

झालें. सर्व माणसें जमली. संजीवनची हकीगत संपली आणि सर्वांच्या तर्फे त्यानें मला स्वतःची पूर्वकथा सांगावयास विनंति केली. माझी हकीगत ऐकण्याकरितां सर्वजण चित्रासारखे स्तब्ध बसले. आलेल्या मंडळींत कस्तुरच्या आजोळकडचे व मावशींकडचे नातलग लोक होते. सर्व बहुतेक नवीन पिढींतले शिकलेले तरुणच होते.

माझा पूर्वेतिहास चार शब्दांत सांगून टाकण्यासारखा होता. तशांत मला इतर कलांप्रमाणें वक्तत्वकलाहि उत्तम येत नव्हती. तथापि आतां आपला

शेवटचा कार्यभाग उरकला पाहिजे असा मनाचा धडा करून मी बोला-वयास उठलों.

" सभ्य गृहस्थ व मित्रमंडळी हो !

प्रथम डॉक्टर नियोगींचा सहाय्यक व डॉक्टर या नात्यानें माझा कै. बाबासाहेब देशपांडे व त्यांच्या कुटुंबांतील मंडळी यांच्याशीं आप्यायेच्याचा संबंध आला. पुढें त्या मंडळींशी माझी ओळख वगैरे होत जाऊन आमचा परि-चय वाढत चालला व बाबासाहेबांचे कुटुंब अंबूताई आणि तांची बहीण कस्तुर यांच्याशीं ओळख झाली. पुढें साहजिकच रीतीनें आमचीं—म्हणजे माझें व कस्तुरचें—मनें एकमेकांकडे आकर्षिलीं जाऊन त्यांत प्रेमाचें बीजारोपण झालें. तथापि आम्ही कोणत्याहि प्रकारें लग्नापूर्वीच्या प्रेमास विकृत स्वरूप येईल असें आचरण केलेलें नाहीं; आणि या बाबतींत माझ्यापेक्षां मनाचा जास्त खंबीरपणा कस्तुरनें दाखविलेला आहे हें मी आपल्यापुढें प्रांजळपणें कबूल करतों. आणि कस्तुरप्रमाणेंच जर सर्व स्त्रीजात असेल तर असेंहि म्हणतों कीं समाजांत जे अधःपाताचे कांहीं परिणाम अर्भकाच्या दृष्टीनें दृष्टोत्पत्तीस येतात, ( या ठिकाणीं माझ्या डोळयांत पाणी येऊन डोळ्यांसमोर धुकें पस-रलें आणि घसा घोगरा झाला ) त्याचा दोष स्त्रियांपेक्षां पुरुषांवरच जास्त पडतो हें मी खात्रीनें सांगतों. पुढें आमच्या दोघांच्या मतें आम्ही एकमेकांस अनुरूप असून वडिलांचें मत मिळाल्यास लग्न झाल्यास बरें, असें आम्हांस वाटलें. आमचें हें मनोगत अंबूताईनें ओळखलें होतें. तिनें स्वतः तर आमच्या लग्नाला कबुली दिलीच होती; पण आपल्या इतरहि आप्तेष्टांची कबुली मिळवून देण्याचें तिनें अभिवचन दिलें होतें. परंतु आता आजच्या ह्या प्रसंगास तीहि नाहीं.

आम्ही दोघांनींहि अशा रीतीनें आमचीं मनें जुळल्यावर व एकमेकांच्या शीलांची पूर्ण संकटांच्या प्रसंगीं देखिल विषमस्थितींत पारख पाहिल्यावर स्वतःच्या अनुमतीनें विवाह करावयास सवड असतांहि तुम्हां सर्वांची परवा-नगी घेतल्याशिवाय पुढचा विधि न करण्याचेंच ठरविलें आहे. तेव्हां आपण

विचार करून आपलें अनुकूल प्रतिकूल मत द्यावें अशी विनंति आहे. आपलें एकाचें जरी प्रतिकूल मत पडलें तरी कस्तुरशीं लग्न करण्यास मला लाज वाटेल—मला धैर्यच होणार नाहीं, व मी स्वखुषीनें अविवाहित राहीन. दुसरी वधू शोधणार नाहीं, तसें होणें आतां अशक्य—अस्वाभाविक झालें आहे.

+ + + पुरच्या अनाथ बालकाश्रमांत लहान अर्भकाचा मोठा झालेला मी मुलगा. लहानपणचे दिवस तेथील शिक्षणांत गेल्यावर + + + येथील अनाथ विद्यार्थिगृहांत मला पुढलें हायस्कूलचें शिक्षण मिळालें. माझा मॅट्रिकचा शिक्षक्रम संपल्यावर कॉलेजमध्यें मी गेलों. माझा डॉक्टरीच्या अभ्यासाकडे मूळपासूनचाच कल होता. परंतु पुढें मदत नव्हती, व आर्टकॉलेजमध्ये माझा वर नंबर आला नव्हता. ' अनाथविद्यार्थि ' संस्थेस मिळणाऱ्या देणग्यांतून मला थोडीशी मदत मिळे त्यावर व शिकवण्या वगैरे मिळवून मी कसाबसा मुंबई युनिव्हर्सिटीचा एल्, एम्, ॲण्ड एस. झालों; पण तेवढयावर माझी समाधानी झाली नाहीं. मेडिकल कॉलेजमध्यें पहिल्यावर्षापासूनच मला पहिल्या प्रतीच्या शिष्यवृत्त्या व बक्षिसें मिळत गेलीं व माझा खर्चाचा प्रश्न सुटला. तथापि मला विलायतेस जावयाचें होतें. इतक्यांत या संधीस मुंबईचे सुप्रसिद्ध + + + शेट वारले. त्यांनीं आपल्या अगणित संपत्तीचा बराचसा हिस्सा 'अनाथविद्यार्थीगृह' संस्थेस परदेशांत शिक्षणासाठीं विद्यार्थी पाठविण्याकरितां म्हणून दिला. त्या मदतीनें मी विलायतेस जाऊन पुढच्या पदव्या मिळवून आलों. माझी बाकी सर्व माहिती आपणास आहेच.

अर्थात् या माझ्या पूर्वेतिहासावरून आपणाला आतां कळून आलें असेल कीं मला स्थावर जंगम इस्टेट कांहीं नाहीं. मला आईबाप, बहीण भाऊ, गणगोत कांहीं नाहीं. फक्त संजीवनसारखे जिवासजीव देणारे मित्र देऊन ईश्वरानें मला बाकीचीं नात्याचीं माणसें न दिल्याची उणीव भरून काढून भरपाई केली आहे. माझ्यापेक्षां वडील व सज्जन पुरुष हे माझे सर्वच बाप. परंतु मुख्य बाप परमेश्वर. समाजांतील सर्व वडील स्त्रिया—फक्त कस्तुरशिवाय करून—माझ्या माता व लहान स्त्रिया सर्व बहिणी असें मी मानतो ! स्त्रियांच्या पातिव्रत्या इतकेंच

पुरुषांचें एकपत्नी व्रत मी प्रतिपाल्य व बंधनकारक समजतों. हाच माझा पूर्वेतिहास. माझी कथा संपली. आतां आपण योग्य तो निकाल द्या. माझ्या मनास ही माझ्या अकुल कथनाची तळमळ लागून राहिली होती. आतां माझें मन स्वस्थ झालें आहे. आतां मी आपली सर्वांची रजा घेतो " असें म्हणून व सर्वांस नमस्कार करून मी खालीं बसलों. सर्वत्र शांत होतें.

नंतर कस्तुरचें मत विचारण्यांत आल्यावर सर्वांनीं एकमतानें आमच्या विवाहाला उदारपणें संमति दिली. माझ्या आनंदाला पारावार उरला नाहीं. आजपर्यंत मी जगांत एकटा होतों. आतां माझ्या सोबतीला दुसरें माणूस मिळावयाचें ठरलें.

सर्व हकीगत कस्तुरच्या आईच्या कानावर घातली. तिलाहि आनंदाचें भरतें आलें. म्हातारीचें मन जुन्या वळणाचें होतें; तथापि, मुलीला सुख जेणेंकरून होईल व आप्तेष्टांचा अपवाद जेणेंकरून सहन करावा लागणार नाहीं, असेंच घडल्यामुळें तिच्याहि जिवाला समाधानच झालें. शिवाय तिलाहि माझा लोभ जडलेलाच होता.

* * * *

लवकरच सर्व वर्तमानपत्रांतून ह्या विवाहाची खबर छापून आली. कित्येक वर्तमानपत्रांनीं आमच्या लग्नाची सर्व पूर्व हकीगतहि देऊन आमचें अभिनंदन केलें होतें. कांहीं थोड्याशा वर्तमानपत्रांनी ह्या प्रतिलोम विवाहाबद्दल विशेषतः माझ्यावर ताशेरा झाडला होता. माझें लग्न मुंबईंत झाल्यामुळें तेथें ताशा आणला नव्हता; ती उणीव ह्या ताशेऱ्यानें मागाहून का होईना पण भरून काढली असें मला वाटलें.

* * * *

आतां आमच्या लग्नाला दोन वर्षें होऊन गेलीं आहेत. आम्हां दोघांलाहि मुंबईंत राहणें आवडत नव्हतें हें पूर्वी मी कळविलें आहेच. श्री + + + पूर शहरांत डिस्पेन्सरी उघडून आहें. परंतु माझ्या डिस्पेन्सरीमुळें त्या शहराला ज्यास्त महत्व येऊं लागलें आहे. कारण डॉ. नियोगीच्या मागून Nervous

lisoders चा व बायकांच्या स्नायुसंबंधीं वगैरे सर्व रोगांचा अप्रतिम डॉक्टर म्हणून माझी प्रख्याति आहे. हें शहर मोठेंसें नाहीं. एका जिल्ह्याचें ठाणें आहे. माझी प्रॅक्टिस् फार चांगली चालत असून मी सवडीप्रमाणें मोफत औषधोपचारहि करीत असतों. तथापि आम्ही आमचीं नावें मात्र बदललीं आहेत. कारण लोक मागल्या गोष्टी काढून विनाकारण कुटाळक्या करीत बसावयाचे नाहींतर. म्हणूनच वाचकहो! तुम्हाला मी कुठें राहतों तें गांव याचसाठीं सांगितलें नाहीं.

माझी कमळा आनंदानें आपला संसार थाटून आपल्या छोट्या "डॉक्टरला" कुमारला खेळवीत असते. कुमारला इतर माणसें छोटा 'डॉक्टर' म्हणतात. पण हें नांव त्याला प्रथम ठेवलें आहे संजीवननें कुमारला मांडीवर घेऊन खेळवितांना त्याची आजी आनंदानें गाणीं गात असतां तिच्या डोळ्यांत अश्रू येत असतात. कदाचित् तिला त्याच्या मावशीची आठवण होऊन अंबूताईची मुलें आपल्याला अशीच खेळवावयास मिळणार होतीं त्या सुखाला आपण आंचवलों असें तिला वाटत असेल.

संजीवन मात्र मला वारंवार भेट देण्यांत कसूर करीत नाहीं. त्याचा चहाचा व्यापार जोरांत चालला आहे, व त्या व्यापारावर तो इतका लक्ष्मीवान् झाला आहे कीं महात्मा गांधींच्या चळवळीमुळें आपल्याला चहाचा व्यापार बंद करावा लागला तरी हरकत नाहीं, तो आपणच स्वतः बंद करून दुसरा देशी वस्तूंचा व्यापार उघडायाचा असें तो म्हणत असतो व त्या बाबतींत त्याची खटपटहि चालू आहे. लवकर आमचे संजीवन शेट चहाऐवजीं स्वदेशी मालाचे बडे व्यापारी म्हणून ओळखले जातील. तुम्हाला याबद्दलची खूण एवढीच कीं आतां अगदीं पहिल्या प्रथम जें स्वदेशी मालाचें मोठ्या प्रमाणावर मोठें भांडार उघडेल अथवा एखादी संस्था निघेल, त्यांच्यात प्रमुख आमचे संजीवनशेट आहेत असें खात्रीनें समजा.

